# प्रस्तावना

सुमारें ७०० वर्षांपूर्वी मराठी भाषेंत ग्रंथरचना सुरू झाली तेव्हांपासून पेशवाई-अखेर जसे अनेक संतकवि महाराष्ट्रांत होऊन गेले तशा कांहीं संत-कवयित्रीही होऊन गेल्या आहेत; व त्या सर्वांची उपलब्ध असलेली कविता जर एकत्र करून छापली तर चारपांचशें पृष्ठांचा तो एक मोठा ग्रंथ होईल. ह्या कवयित्री जरी मोठ्या विदुषी नव्हत्या तरी त्या भगवंताच्या एकनिष्ठ उपासिका असल्यामुळें त्यांची कविता फार प्रेमळ आणि हृदयंगम उतरली आहे. शिवाय तींत स्त्रीस्वभावांतील मार्दव, भावनांची उत्कटता आणि भाषेचा साधेपणा हीं वैशिष्ट्यें असल्यामुळें संत-कवींच्या कवितेपेक्षां ही संतकवयित्रींची कविता पुष्कळ बाबतींत अगदीं स्वतंत्र आणि पृथगात्म अशी आहे. या सर्व कवयित्रींची चरित्रविषयक माहिती जुन्या व नव्या मराठी वाङ्मयांत इतस्ततः विखुरलेली असल्यामुळें ती माहिती समजून घेऊं इच्छिणारांस अनेक ग्रंथ धुंडाळावे लागतात व विषयाच्या पूर्वपरिचयाभावीं कोणत्या कवयित्रीची माहिती कोणत्या ग्रंथांत मिळेल हेंही पुष्कळ जिज्ञासूंस माहित नसतें. ही त्यांची गैरसोय दूर करावी या हेतूनें, बहुतेक सर्व प्रसिद्ध संतकवयित्रींची चरित्रविषयक माहिती मोठ्या परिश्रमानें एकत्र करून या ग्रंथांत दिली आहे. ही माहिती ज्या जुन्या नव्या ग्रंथांतून घेतली आहे त्या संदर्भग्रंथांची यादी मी इतरत्र दिली आहे. अलौकिक चमत्कारांच्या कथांस जरी प्राधान्य दिलेलें नाहीं तरी त्या अजिबात वगळलेल्याही नाहींत. साधुसंतांच्या चरित्रांत अलौकिक चमत्कारांच्या कथा द्याव्या कीं देऊं नयेत हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे व त्याचा कायमचा निकाल लावण्याचें काम नुसत्या विज्ञानी पंडितांचें नसून विज्ञानाच्या आटोक्याबाहेरचीं जीं योगादि शास्त्रें आहेत त्यांचीही मदत या बाबतींत घेणें अवश्य आहे. ईश्वर आपल्या एखाद्या एकनिष्ठ भक्तासाठीं, किंवा त्या भक्तावर आपली कृपा आहे हें दाखविण्यासाठी, प्रसंगविशेषीं एखादा अलौकिक चमत्कार करून दाखवितो अशी समजूत अगदीं जुन्या कालापासून जगांतील बहुतेक सर्व धर्मांच्या लोकांत प्रचलित आहे; परंतु ती समजूत बाजूस ठेवून निव्वळ शास्त्रीय दृष्टीनें जरी या विषयाकडे पाहिलें तरी, योग हें एक शास्त्रच असल्यामुळें त्याचीही

साक्ष या बाबतींत विचारांत घ्यावीच लागेल. आणि ही साक्ष तर अलौकिक चमत्कारांच्या शक्यतेस अनुकूल अशीच आहे. योगविद्येंत प्रावीण्य मिळविणाऱ्या मनुष्यास कोणतें अलौकिक सामर्थ्य प्राप्त होतें, हें ज्ञानदेवमहाराजांनीं पुढील ओव्यांत सांगितलें आहे :—

**आइकें देह होय सोनियाचें । परि लाघव ये वायूचें ।**
**जे आप आणि पृथ्वीचे । अंशु नाहीं ॥**
**मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा आलोचु आइके ।**
**मनोगत वोळखे । मुंगियेचें ॥**
**पवनाचां वारिकां वळघे । चाले तरी उदकीं पाउल न लागे ।**
**येणें येणें प्रसंगें । येती बहुता सिद्धि ॥**

—ज्ञानेश्वरी, अ० ६ वा, ओव्या २६८ ते २७०

एकनाथांनींही आपल्या भागवत एकादशस्कंधावरील टीकेंत या सिद्धींचें वर्णन दिलें आहे. ज्ञानदेव आणि एकनाथ यांच्यासारखे थोर सत्पुरुष स्वानुभवाशिवाय असल्या—सकृद्दर्शनीं असंभाव्य दिसणाऱ्या—गोष्टी सांगतील असें म्हणण्यास माझें मन धजत नाहीं. ‘ इलस्ट्रेटेड लंडन न्यूज ’ नामक साप्ताहिकाच्या ता. ६ जून १९३६ च्या अंकांत, योगसामर्थ्याच्या जोरावर जमिनीपासून तीन फूट उंचीवर चार मिनिटें अधांतरीं राहणाऱ्या **सुब्बय्या पुल्लावर** नामक एका मद्रासी योग्याची सचित्र हकीकत प्रसिद्ध झाली आहे ती जिज्ञासूंनीं अवश्य वाचावी. प्रसिद्ध शीख योद्धा महाराज रणजितसिंग याच्या दरबारांत एका योग्यानें स्वतःस चाळीस दिवस-पर्यंत जमिनींत पुरून घेतल्याची हकीकत प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहून एका इंग्रज लेखकानें लिहून ठेवली आहे ती तर इतिहासप्रसिद्ध आहे. असल्या प्रत्यक्ष घडलेल्या व घडणाऱ्या गोष्टींचा उलगडा विज्ञान्यांस करतां येत नाहीं म्हणून त्या गोष्टी खोट्या आहेत असें म्हणण्यापेक्षां असल्या गोष्टी विज्ञानाच्या आटोक्याबाहेरच्या आहेत असें म्हणणेंच अधिक युक्त नाहीं काय ? शिवाय विज्ञान्यांची तरी या बाबतींत एकवाक्यता कोठें आहे ? प्रसिद्ध आंग्ल विज्ञानी सर ॲम्ब्रोज फ्लेमिंग यांनीं १९३५ च्या जानेवारींत, एका शास्त्रज्ञांच्या सभेंत अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत साधुसंत व धर्मसंस्थापक यांनीं करून दाखविलेल्या चमत्कारांवर आपला पूर्ण विश्वास असल्याचें अगदीं स्पष्ट सांगितलें. याच्या उलट हे चमत्कार म्हणजे

निव्वळ गप्पा आहेत असें म्हणणारेही कांहीं विज्ञानी आणि बुद्धिप्रामाण्यवादी असतीलच. अशा स्थितींत, या प्रश्नाचा कायमचा निकाल लागेपर्यंत, चालू वहिवाटीस अनुसरून अलौकिक चमत्कारांच्या कथा संक्षेपानें तरी देणें हें संत-चरित्रकारांचें कर्तव्य आहे असें मला वाटतें. आतां हें कर्तव्य करतांना चमत्कारांचें वाजवीपेक्षां अधिक स्तोम न माजविण्याची खबरदारी घेतली म्हणजे झालें.

ह्या ग्रंथांत आलेल्या १० चरित्रांपैकीं जनाबाई, कान्होपात्रा, प्रेमाबाई व बहिणाबाई यांचीं चरित्रें माझ्या 'महाराष्ट्र कविचरित्रा'च्या निरनिराळ्या भागांत पूर्वीच येऊन गेलेलीं आहेत. तथापि, प्रस्तुत ग्रंथांत तीं चरित्रें उतरून घेतांना नवीन उपलब्ध झालेल्या माहितीच्या आधारानें त्यांत योग्य ते फेरफार केलेले आहेत. या ग्रंथांत ज्यांचीं चरित्रें दिलीं आहेत त्या दहा संत-कवयित्रींशिवाय आणखी दोन तीन कवयित्री होऊन गेल्याचा उल्लेख आढळतो; परंतु त्यांच्या थोड्याशा स्फुट पद्यांपलीकडे त्यांची कोणतीच माहिती उपलब्ध नसल्यामुळें त्यांचा समावेश या ग्रंथांत करितां आला नाहीं. नामदेवांची आई, बायको, सुना व मुली यांच्या नांवांवर कांहीं अभंग गाथ्यांत छापलेले आढळतात, परंतु सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां असें दिसून येईल कीं, ती त्यांची स्वतःची कविता नसून, एखाद्या जुन्या संतचरित्रलेखकानें नामदेवादि संतांचीं चरित्रें वर्णितांना, स्वतः ते अभंग रचून, त्यांच्या शेवटीं स्वनामोल्लेख न करितां, त्या अभगांतील कथानकाशीं ज्या व्यक्तींचा संबंध आला त्यांचाच नामनिर्देश केलेला आहे व त्यामुळें ते अभंग त्या त्या व्यक्तींनीं रचले असावे असे सकृद्दर्शनीं वाटतें. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. असो.

या ग्रंथांत, कवयित्रींच्या चरित्रांबरोबरच त्यांच्या कवितेंतील कांहीं निवडक सुरस वेंचेही दिले आहेत व ते वाचून त्या कवयित्रींची समग्र कविता वाचण्याची वाचकाची प्रवृत्ति होईल अशी आशा आहे.

हें पुस्तक श्री. सौ. मा. महाराणी इंदिराबाई होळकर यांस अर्पण करावें या हेतूनें, पुस्तकाची हस्तलिखित प्रत त्यांच्या सेवेस सादर केली होती. ती पाहून त्यांनीं मदतीदाखल २५० रु. मंजूर केले व आज्ञा केली कीं पुस्तक स्वतःस अर्पण न करितां परमपुण्यशील इतिहासप्रसिद्ध श्री. अहल्याबाई होळकर यांस अर्पण करावें. त्याप्रमाणें त्यांना हें अर्पण केलें आहे. श्री. अहल्याबाईच्या चित्राचा ठसा

व 'देवी अहल्यास्तोत्र' हीं श्री. सौ. महाराणीसाहेबांनींच पाठविलीं. त्याबद्दल व त्यांनीं उदारपणें केलेल्या साहाय्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

शेवटीं ज्या जुन्या नव्या ग्रंथकारांच्या ग्रंथांचा व लेखांचा उपयोग प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याच्या कामीं झाला, त्या सर्वांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून ही प्रस्तावना पुरी करितों.

मुंबई,
ता. २१ जुलै १९३९

ज. र. आजगांवकर

# अनुक्रमणिका

—:O:—

# संदर्भ-ग्रंथ

—:o:—


| | |
|---|---|
| श्रीऋद्धिपुरवर्णन | श्री. यशवंत खुशाल देशपांडे |
| आद्य मराठी कवयित्री | श्री. वामन नारायण देशपांडे |
| भक्तविजय<br>भक्तलीलामृत<br>संतविजय<br>संतलीलामृत | महीपति |
| श्रीज्ञानदेवमहाराजांची आदि | नामदेव |
| गाथापंचक | श्री. त्र्यं. ह. आवटे |
| बहिणाईची कविता | श्री. धोंडो विश्वनाथ उमरखाने |
| 'पूर्वजन्म आणि पुनर्जन्म' ( चित्रमयजगत् ) | कै. प्रो. शिवराम महादेव परांजपे |
| वेणाबाईकृत सीतास्वयंवर —प्रस्तावना<br>समर्थप्रताप—प्रस्तावना | श्री. शंकर श्रीकृष्ण देव |
| समर्थप्रताप | गिरिधर |
| 'समर्थशिष्या वेणाबाई' ( विविधज्ञानविस्तार ) | श्री. 'पुरुषोत्तम' |
| दासविश्रामधाम | आत्मारामस्वामी |
| भक्तलीलामृत | भीमस्वामी रामदासी |
| भारत–इतिहास–संशोधक–मंडळ अहवाल शके १८३३ | |


———

प्रातःस्मरणीया

# देवी श्री अहल्याबाई होळकर



यांच्या पुण्यस्मृतीस समर्पण

— ग्रंथकर्ता

श्री

प्रातःस्मरणीया

जन्म शके १६४७

# देवी श्रीअहल्यास्तोत्र.

मृत्यु शके १७१७

जशा देहु आळंदि या पुण्यभूमी। तशी मानिं चौंढी सती जन्मभूमी ॥
तसें जी करी क्षेत्र माहिष्मतीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ १ ॥
जरी जाल काशीस रामेश्वराला। तसे द्वारकेला तुह्मी वा पुरीला ॥
कुठेंही पहा हो जिच्या दानलीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ २ ॥
नसे भारतीं तीर्थ वा क्षेत्र ऐसें। जिथें ना तिचें एकही कृत्य दीसे ॥
जगीं जन्मुनी जे करी देवलीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ ३ ॥
कुठें अन्नदानें कुठें वस्त्रदानें। कुठें वारिदानें कुठें भूमिदानें ॥
कुठें बांधिल्या भव्यशा धर्मशाला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ ४ ॥
कुठें लाविले मार्गिंही वृक्ष दाट। नदीतीरिं बांधी तसे रम्य घाट ॥
किती मंदिरें बांधिल्या धेनुशाला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ ५ ॥
भुकेला कुणीही पुरीं राहिला न। असें ऐकुनी जी स्वयें घेइ अन्न ॥
जगीं बोलती सत्य हें माय जीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ ६ ॥
हिमीं थर्थरां कांपतांना दिनांना। तृषार्ता तसेही पथीं चालतांना ॥
बघूनी बहू कष्ट होतात जीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ ७ ॥
प्रजेच्या समाधानिं जी शक्ति राही। असंख्या बळें ती तशी येत नाहीं ॥
म्हणूनी प्रजारक्षणीं रंगलीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ ८ ॥
कधींही शिवेना पराच्या धनातें। हरायास इच्छी परा-आपदातें ॥
कुणी शत्रु ना सर्वही मित्र जीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ ९ ॥
कुणी धाकुटे थोरले आप्त कांहीं। स्वधर्मी विधर्मी असा भेद नाहीं ॥
जगीं वाटती सारखे सर्व जीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ १० ॥
कुणी वैभवें जोडिती हस्ति घोडे। धना वेंचुनी बांधिती भव्य वाडे ॥
अशा वैभवाची नसे चाड जीला। नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥ ११ ॥

भवालागिं कोणी परार्थासि सोडी । पराकारणें कोणि संसार मोडी ॥
परी दोनिही साधले अर्थ जीला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥१२॥
कथाकीर्तनें आणि पोथ्यापुराणें । जगीं ऐकती सर्वही कौतुकानें ॥
परी बाणलें सत्य तें एकटीला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥१३॥
जिथें बाल राजा असे नारिसत्ता । तिथें शाश्वती ना जिवा आणि वित्ता ॥
परी त्याहि मिथ्या करी जे वचाला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥१४॥
मुनी तापसी योगि वा देवराय । जिहीं नाडिले मानवां पाड काय ? ॥
अशा जिंकि जी षड्रिपू राक्षसांला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥१५॥
पठाणासी जो काळसा उग्र वाटे । बघूनी जया शत्रुची छाति फाटे ॥
अशा लाजवी राघवा पेशव्याला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥१६॥
अतिस्वार्थि मंत्री तिचा चंद्रचूड । करूं लागला आपलें स्थीर बूड ॥
परि लावि संन्यास घ्याया तयाला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥१७॥
बहू मातले भील विंध्याद्रिमाजी । परी युक्तिनें जी करी त्यांस राजी ॥
जिची राजनीती पटे इंग्रजाला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥१८॥
जिनें मोडिलें बंड चंद्रावताचें । वनीं मार्ग केले खुले पांथिकांचे ॥
जपे सर्वदा जी स्वदेशोन्नतीला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥१९॥
प्रवृत्ती निवृत्ती कशा एक ठाया । स्वयें वर्तुनी दाविलें त्या उपाया ॥
खरें साधलें कर्म निष्काम जीला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥२०॥
सदा देवकाजीं झिजे देह जीचा । वदे ईशनामें जिची नित्य वाचा ॥
कवी पंत सांगे म्हणा धन्य जीला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥२१॥
असंख्यात ते जन्मले आणि मेले । परी जन्मसाफल्य कोणी न केलें ॥
स्वयें उद्धरोनी कुलोद्धार केला । नमस्कार त्या श्रीअहल्या सतीला ॥२२॥

विठ्ठल रामचंद्र बडे,
सेवक, श्रीअहल्या सेवा-सदन,
इंदूर

# महाराष्ट्र संत-कवयित्री



## महदाइसा ऊर्फ महदंबा

ही महाराष्ट्रांतील आद्य कवयित्री होय. कै. वि. का. राजवाडे यांनीं महानुभावांच्या सांकेतिक लिपीचा उलगडा केल्यापासून गेल्या २५ वर्षांत वऱ्हाड–नागपुराकडील कांहीं संशोधकांनीं महानुभावी ग्रंथांचें संशोधन करून त्यासंबंधानें जी महत्त्वाची माहिती प्रसिद्ध केली ती जर प्रसिद्ध झाली नसती तर मराठी आद्य-कवयित्रीचा हा मान ज्ञानदेवभगिनी मुक्ताबाई हिलाच मिळाला असता. परंतु आता ज्ञानदेवपूर्वकालीन वाङ्मयाचा शोध लागला असल्यामुळें महाराष्ट्रवाङ्मयाचा प्रारंभकाल बराच मागें गेला आहे. मुकुंदराजकृत विवेकसिंधूच्या एकदोन पोथ्यांत त्या ग्रंथाचा रचनाकाल शके १११० हा नमूद केलेला असल्यामुळे व हा काल ज्या ओवींत दिला आहे ती ओवी क्षेपक आहे असें अद्याप कोणी सिद्ध केलें नसल्यामुळें, मराठी आद्यकवीचा मान अद्याप मुकुंदराजांकडेच जातो हें निर्विवाद आहे. परंतु शके १११० हा विवेकसिंधूचा रचनाकाल व शके १२१२ हा ज्ञानेश्वरीचा रचनाकाल, यांच्या दरम्यानच्या शंभर वर्षांत मराठी वाङ्मय झालेंच नाहीं अशी कांहीं वर्षांपूर्वी जी समजूत होती ती मात्र आतां, महानुभावी वाङ्मयाच्या शोधामुळे चुकीची ठरली आहे. तथापि, या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे ती ही कीं हें महानुभावी वाङ्मय म्हणजे महाराष्ट्राचें वाङ्मय नव्हे; तें एका विशिष्ट धर्मपंथाचें, आणि त्या पंथाच्या अनुयायांशिवाय इतरांच्या वाचनांत तें येऊं नये म्हणून मुद्दाम सांकेतिक लिपीच्या कडीकुलुपांत ठेवलेलें वाङ्मय होय. महाराष्ट्रांतील सर्व लोकांनीं

तें वाङ्मय वाचावें आणि तें सर्वमान्य व्हावें अशी महानुभावांची इच्छाच नव्हती. या त्याच्या अनिच्छेचें एक कारण असें दिसतें कीं, त्यांनीं आपल्या ग्रंथांत हेमाडपंतांच्या खुनासारख्या ज्या विचित्र आणि भीषण गोष्टी दिल्या आहेत त्याच्या सत्यतेची छाननी सार्वजनिक रीतीनें झाल्यास, सत्याच्या कसोटीस त्या गोष्टी कदाचित् उतरणार नाहींत अशी भीति त्यांना वाटत असावी. शिवाय त्यांच्या कांहीं गद्य लिखाणांत जो कमालीचा अश्लीलपणा भरला आहे त्याचें सार्वत्रिक प्रदर्शन होऊं नये अशीही त्यांची इच्छा असणें स्वाभाविक आहे. महानुभावांच्या कांहीं ग्रंथात मुद्दाम खोटे काल दिलेले असून कांहीं धडधडीत खोट्या गोष्टीही सांगितलेल्या आहेत हें आतां उघडकीस आलें असल्यामुळें त्यांचे ग्रंथ संशोधकांस चांगलेच पारखून घ्यावे लागतील.

महाराष्ट्रांतले मुख्य संप्रदाय तीन; वारकरी संप्रदाय, रामदासी संप्रदाय, आणि दत्त संप्रदाय. हे तीन्ही संप्रदाय वैदिक असल्यामुळें व त्यांत कोणत्याही प्रकारचें गौप्य नसल्यामुळें महाराष्ट्रांतील बहुजनसमाजांत त्या संप्रदायांचे ग्रंथ सर्वमान्य आणि लोकप्रिय झाले. याच्या उलट महानुभाव पंथ हा गुप्त पंथ असल्यामुळें महाराष्ट्रांतील बहुजनसमाज त्या पंथासंबंधानें शेवटपर्यंत साशंक राहिला व मुसलमान राज्यकर्त्यांनीं सरसकट सर्व हिंदूंवर बसविलेल्या झिझिया करापासून महानुभाव मुक्त झाल्यामुळें ही साशंकता अधिकच दृढ झाली. अशा रीतीनें, महानुभाव पंथ हा आज सुमारें ६५० वर्षें जवळ जवळ बहिष्कृतच राहिला आहे व त्यामुळें त्या पंथाच्या वाङ्मयास सार्वत्रिक लोकमान्यता प्राप्त होणें शक्य नाहीं. केवळ वाङ्मय या दृष्टीने मात्र हे महानुभावी ग्रंथ केव्हांही अभ्यसनीयच आहेत; व त्यांचा अभ्यास आतां सुरू झाला आहे ही आनंदाची गोष्ट होय. गेल्या सहासातशें वर्षांत मराठी भाषेंत कसकसा बदल होत गेला, जुने शब्द मागें पडून त्यांच्या जागीं नवीन शब्दांची योजना कशी होत गेली व भाषेस कसें सौलभ्य येत चाललें हें समजून घेण्यास इतर जुन्या कवींच्या ग्रंथांप्रमाणेंच महानुभावी ग्रंथांचाही उपयोग होण्यासारखा आहे. शिवाय, काव्यदृष्ट्याही, भास्कर कवीश्वर महानुभावाच्या 'शिशुपालवधा' सारखे कांहीं महानुभावी ग्रंथ फारच उच्च दर्जाचे आहेत यांत संशय नाहीं. असो. आतां, सर्व-

मान्यतेच्या दृष्टीनें नव्हे तर केवळ कालक्रमानें, जी **महदाइसा** ऊर्फ **महदंबा** ऊर्फ **रूपाई** 'आद्य मराठी कवयित्री' ठरते तिचें संक्षिप्त चरित्र येथें देतों.

देवगिरीचा राजा महादेवराय यानें शके ११८२ ते शके ११९३ पर्यंत राज्य केलें. त्यापूर्वी कांहीं वर्षें, गौतमीच्या म्हणजे गोदावरीच्या दक्षिण-तीरावर 'पुरी' नामक एक नगरी होती. तेथें वामनाचार्य या नांवाचा एक विद्वान् वेदज्ञ ब्राह्मण रहात असे. त्याच्या पत्नीचें नाव महदाइसा. ती प्रज्ञावंत असून तिने वेदशास्त्राचा अभ्यास केला होता. तिला म्हाळसा प्रसन्न होती. ती तिच्याशीं प्रत्यक्ष बोले. महादेवरायाचें पौरोहित्य महदाइसेकडे होतें. राजा तिला भलतेच प्रश्न विचारी. तिला भविष्य स्फुरत असे. एकदां अन्य देशांतले विद्वान् महाराष्ट्रांत येऊन त्यांनीं महाराष्ट्र विद्वानाचा वादात पराभव केला; व महाराष्ट्रीयांकडे अजिंक्यपत्र मागितले. तेव्हां महदाइसेनें त्यांना ( वादात ) अडविले. महादेवरायाने महदाइसेला पांच गांव इनाम दिले. वामनाचार्य व महदाइसा यांचा पुत्र महेश्वर पंडित याच्यापर्यंत हें घराणें महानुभाव पंथापासून अलिप्त होतें. या घराण्याचें गोत्र वगैरे माहिती जरी उपलब्ध नाहीं तरी 'आचार्य' व 'पंडित' या पदांवरून हें घराणें देशस्थ ब्राह्मणाचें होतें असें समजण्यास हरकत नाहीं. महेश्वर पंडिताच्या पत्नीचें नांव वैजाइसा. महेश्वरपंडितास दोन पुत्र; माधवभट आणि वायेनायेक. माधवभटाच्या पत्नीचें नांव आबाइसा. त्यांना चार मुले झालीं. सारंगपाणी, नागदेव आणि वैजोबा हे तीन पुत्र व उमाइसा ही कन्या. महेश्वरपंडिताचा दुसरा मुलगा वायेनायेक याची पत्नी कामाइसा. या दंपतीस एकंदर नऊ मुलें झालीं. पहिलें मूल चरित्र-नायिका **महदाइसा.** दुसरा मुलगा झाला त्याचें नांव आपलो. पुढें क्रमानें सात मुलीच झाल्या त्याचीं नांवें :–सावित्री, गायित्री, मदळसा, म्हाळसा, ळळीताईसा, जाखाईसा व वेल्हाईसा. बायकांच्या कांहीं नांवांपुढें 'इसा,' 'ईसा,' व 'सा' हे प्रत्यय लावण्याची त्या वेळीं चालच असावी असे वाटतें.

महेश्वर पंडिताचा वडील मुलगा माधवभट हा पुरी येथेंच रहात असे व धाकटा मुलगा वायेनायेक हा रावसगांवीं रहात असे. माधवभट अल्पायुषी वारला तेव्हां त्याच्या मुलांबाळांस वायेनायेकानें रावसगांवीं आणिलें. माधव-भटाचे तीन्ही मुलगे मोठे झाल्यावर वायेनायेकानें त्यांचे व्रतबंध केले व

लहानपणींच त्यांचे विवाहही केले. त्याचप्रमाणें त्यानें स्वतःची मुलगी महदाइसा, पुत्र आपलो व माधवभटाची मुलगी उमाइसा यांचेही विवाह केले. पुढें वायेनायेकानें, माधवभटाचे मुलगे सारंगपाणी व नागदेव यांस शिकावयास घातलें; व पुरी येथील शेतीचें काम, माधवभटाचा तिसरा मुलगा वैजोबा याजकडे सोंपविलें. सारंगपाणी यानें रत्नपरीक्षा विद्येंत नैपुण्य संपादिलें. पुढें तो कांहीं द्रव्य घेऊन देशांतरास गेला व तिकडे कांहीं रत्नें खरेदी करून परत स्वदेशीं येत असतां वाटेंत चोरांनीं त्याला लुटलें. महादाइसा व उमाइसा या दोघींनाही वैधव्य आलें. नागदेव हा उनाड निघून, मोकळा कासोटा, ' आडवी वेणी ', व सर्वदा खांद्यावर तलवार, अशा हडेलहप्पी थाटांत राहूं लागल्यामुळें त्याची आई आबाइसा ही वैतागून गेली; व रावसगांव येथें गुंफा बांधून महदाइसा व उमाइसा यांसह राहूं लागली. तेथें, चक्रधराचा शिष्य ' दादोस ' हा येऊन त्या स्त्रियांस ज्ञानदान करूं लागला. पुढें नागदेवही निवळून त्याच्या भजनीं लागला. या दादोसमुळेंच त्या सर्वांना चक्रधराची माहिती होऊन त्याचें दर्शन घेण्याची उत्कंठा लागली. महदाइसेच्या नवऱ्याच्या नांवागावाचा पत्ता लागत नाहीं.

महानुभाव पंथसंस्थापक चक्रधर याचें प्रथमदर्शन महदाइसा व नागदेव यांस ' पाटवध ' येथें झालें. पुढें महदाइसेला चक्रधराचा सहवास वरचे-वर घडूं लागला. " चक्रधराला नाना विषयांसंबंधीं नाना प्रश्न विचारून त्यांचीं त्याजकडून उत्तरें काढून घेणें हा महदाइसेचा नित्याचा एक कार्यक्रमच होऊन बसला." 'इतिहास ' व ' लीलाचरित्र ' या महानुभावी ग्रंथांत जो चक्रधराचा आत्मचरित्रपर भाग आला आहे त्याचें बरेंचसें श्रेय या महदाइसेकडेच जातें. पुढें चक्रधरानें बद्रिकाश्रमाकडे प्रयाण केल्यावर, महदाइसा ऋद्धिपुर येथें चक्रधराचे गुरु गोविंदप्रभु यांच्या सान्निध्यांत जाऊन राहिली. नागदेव हा भानखेडा येथें, चक्रधराच्या विरहानें, डोंगर-पठारावर निचेष्ट होऊन पडला होता, त्याला तिनें गोविंदप्रभूंच्या आज्ञे-वरून ऋद्धिपुरास नेलें. महदाइसेला एकदां सर्पदंश झाला असतां तें विष गोविंदप्रभूंनीं उतरविलें असें ' स्थान पोथी ' नामक ग्रंथांत लिहिलें आहे. गोविंदप्रभु शके १२०८ त समाधिस्थ झाले त्या वेळेपर्यंत महदाइसा

त्यांच्याच सान्निध्यांत होती. त्यानंतर तिनें आपलें शेष आयुष्य नागदेवाच्या सहवासांत घालविलें. हा नागदेव तिचा चुलतभाऊ असून, चक्रधराच्या-मागें यानेंच महानुभाव पंथाचा फार प्रसार केला. महानुभावी वाङ्मयांत नागदेवाचा ‘ भटोबा ’ या नांवानेंही उल्लेख केलेला आढळतो. महदाइसा नागदेवाच्या सान्निध्यांत होती त्या वेळच्या तिच्या कांहीं गोष्टी ‘नागदेवस्मृति’ नामक ग्रंथांत दिल्या असून श्री.वा. ना. देशपांडे यांनीं ‘ आद्य मराठी कवयित्री ’ या आपल्या पुस्तकांत त्या उतरून घेतल्या आहेत, त्यांवरून ही महदाइसा महानुभाव पंथाची मोठी अभिमानी असून त्या पंथाच्या शिकवणीविरुद्ध वर्तन करणारांची ती स्पष्ट शब्दांनीं कानउघाडणी करीत असे असें दिसतें. नागदेवानें तर तिजविषयीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं “ही **म्हातारी** माझ्या धर्माची रक्षक आहे.” नागदेवाची तिजवर इतकी ममता होती कीं, शपथ घ्यावयाची झाली तर तो तिचीच शपथ घेई. तिच्या कवित्वाविषयींही नागदेवास मोठा आदर होता. तिच्या वाणीला त्यानें ‘ सिद्धवाणी ’ म्हटलें आहे.

एकदां महदाइसा नवगावीं गेली असतां तेथे तिच्या पायास व्रण झाला. तेव्हां तिच्या शुश्रूषेसाठीं निंबगांवाहून नागदेव नवगांवास आला. महदाईची व त्याची भेट झाल्यावर, महदाईच्या व्रणावर कांहीं उपाय करावा म्हणून भटोबानें वैद्य बोलाविला. तेव्हां महदाइसा म्हणाली, ‘ नाग-देवा, गोसांव्यांनीं डाग देण्यास किंवा रक्त काढण्यास अनुज्ञा दिलेली नाहीं. औषध घेण्यास मात्र त्यांची परवानगी आहे. परंतु मी कांहीं जगणार नाहीं, मग विनाकारण आज्ञाभंग कां करूं ? ’ तिनें असें सांगितल्यामुळें वैद्याचा निरुपाय झाला. कारण डाग दिल्याशिवाय किंवा रक्त काढल्या-शिवाय, नुसत्या औषधानें व्रण बरा होण्यासारखा नव्हता. पुढें सहा महिने नागदेवानें तिची चांगली शुश्रूषा केली. मग एके दिवशीं ती अगदीं मरणोन्मुख झाली तेव्हां नागदेवानें तिला विचारलें, ‘ रूपाई, तुला चक्रधर आठवतो काय ? ’ महदाइसा म्हणाली, ‘ होय नागदेवा, आठवतो. ’ नागदेवानें विचारलें, ‘ कसा काय आठवतो ? ’ महदाइसा म्हणाली,

---

१ चक्रधरानें.

“ श्रीमुगुटावरी फुटा ( = वस्त्रविशेष ): वारितरंग वज्री घडत असती: म्हणौनि बेलापुरीची लीळा सांघितली: ऐसा आठवतो: ” यावर नागदेव म्हणाला, “ देहपर्यंत उचीत स्मरणा न चुकसीचि: पहीलीया दीवसापासौनि सेवटील दीवसपर्यंत देवो तो तुवांचि धरिला असे: आन देवो तो तुवांचि आठवावा कीं आइ: ” नागदेव इतके बोलल्यावर दुःखानें त्याचा कंठ दाटून आला. मग महदाइसेचें देहावसान झालें. नवगावीं तिचा अंत्यविधि केला. ‘ म्हातारी धर्मरक्षक: प्रीतिरक्षक सुहृदत्व (रक्षक)’ इत्यादि शब्दानीं नागदेवानें मोठा शोक केला.

वरील हकीकतीवरून, नागदेव हयात असतांनाच महदाइसा मृत्यु पावली हें उघड दिसते. पण तिचा मृत्युकाल निश्चित करण्यास मात्र कांहींच साधन नाहीं. कवयित्री महदाइसा मृत्यु पावली त्या वेळीं ती ‘ म्हातारी ’ होती हें वरील उताऱ्यातील ‘ म्हातारी धर्मरक्षक ’ या नागदेवाच्या शब्दांवरून उघड दिसतें. पहिली महदाइसा शा. शके ११९३ च्या सुमारास मृत्यु पावली असावी असें रा. देशपाडे यांनीं दिलेल्या माहितीवरून दिसतें व या महदाइसेचें नांव तिची नात कवयित्री महदाइसा हिला ज्या अर्थी ठेवण्यात आलें त्या अर्थी आजीच्या मृत्यूनंतर नातीचा जन्म झाला असला पाहिजे हेंही ओघानेंच सिद्ध होतें. पण मग जो महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो तो हा कीं शके ११९३ च्या-नंतर जन्म पावलेली कवयित्री महदाइसा, रा. देशपांडे म्हणतात त्याप्रमाणे जर शके १२३४ च्या पूर्वी केव्हां तरी मृत्यु पावली असेल तर त्या वेळीं ती ‘ म्हातारी ’ कशी असूं शकेल? महानुभाव लेखकांनीं लिहिलेल्या ग्रंथांत जीं अनेक कोडीं आहेत त्यांतलेंच हे एक कोडें आहे ! असो. नागदेवाचा मृत्युशक नागदेवस्मृति वगैरे ग्रंथात १२२४ हा दिला आहे, परंतु त्याच ग्रंथांत, शके १२३१ त झालेल्या रामदेवराव यादवाच्या मृत्यूच्या वेळीं नागदेव हयात असल्याचा स्पष्ट उल्लेख असल्यामुळें त्याचा वरील मृत्युशक खरा नसून शके १२३१ ते १२३४ च्या दरम्यान केव्हां तरी तो वारला असावा असें रा. देशपांडे यांचें अनुमान आहे. पण मी म्हणतों, ज्या ग्रंथांत

१ चक्रधर.

नागदेव शके १२२४ त मृत्यु पावला असें लिहून पुढे शके १२३१ त तो ह्यात होता असेंही लिहिले आहे त्या ग्रंथांतला अमुकच कालनिर्देश खरा आणि अमुक खोटा असें मानण्याचें तरी काय प्रयोजन आहे? दोनही कालनिर्देश खोटे, किंबहुना ग्रंथांतील बहुतेक गोष्टीही खोट्या असें कां म्हणूं नये? 'पहिली महदाइसा ही महाविदुषी होती व महादेव यादवानें तिला पाच गांवें बक्षीस दिलीं, हा वृत्तांत बडेजावीचा असल्यामुळें तो बनावट असण्याचा सभव आहे,' अशी कबुली रा. देशपांडे यानीं 'केसरीं' तील आपल्या एतद्विषयक लेखांत दिलीच आहे कीं नाहीं? तेव्हां अशा स्थितींत, 'म्हातारी' होऊन मेलेली कवयित्री महदाइसा शके १२३४ च्या पूर्वी वारली, हें रा. देशपांडे यांचें विधान मी तरी निदान खरें मानणार नाहीं. शके ११९३ च्या पुढें जन्म पावून आणि म्हातारी होऊन जी महदाइसा मृत्यु पावली तिचें वय मृत्युसमयीं कमींत कमी ५० वर्षांचे तरी असलें पाहिजे व या हिशोबानें तिचा मृत्युकाल शके १२४३ च्या पुढें ढकलणें भाग आहे. मग त्यासाठीं नागदेवाचाही मृत्युकाल पुढे ढकलावा लागला तरी हरकत नाहीं. आतां ज्या गोविंदप्रभूंच्या विवाहकालीं कवयित्री महदाइसा हिने आपल्या 'ढवळ्यां' चा पूर्वार्ध रचला त्यांचा निधनशक १२०८ हा निश्चित असल्यामुळे व तो 'गणितानें नक्षत्रासुद्धां बिनचूक उतरतो' अशी ग्वाही रा. देशपांडे यांनीं दिली असल्यामुळें ढवळ्यांच्या पूर्वार्धाची रचना शके १२०८ च्या पूर्वी झाली असली पाहिजे असें मानणें मात्र भागच आहे व त्यामुळें ही महदाइसाच 'आद्य मराठी कवयित्री' असेंही मानणें भाग आहे. मात्र, शके ११९३ नंतर जन्मलेल्या महदाइसेचें वय, शके १२०८ मध्ये मृत्यु पावलेल्या गोविंदप्रभूंच्या लग्नाच्या वेळीं, १०–१२ वर्षांहून अधिक असणें शक्य नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. असो.

आता महदाइसेनें निर्माण केलेल्या वाङ्मयाकडे वळूं. 'धवळे,' 'मातृकी-रुक्मिणीस्वयंवर' व 'गर्भकांड–ओव्या' अशीं तीन प्रकरणें महदाइसेनें लिहिलेलीं आहेत व यांपैकीं पहिलीं दोन प्रकरणें रा. देशपांडे यांनीं 'आद्य मराठी कवयित्री' या पुस्तकात छापलीं आहेत. तिसऱ्या काव्याची मूळपोथी त्यांच्या हातीं न आल्यामुळें 'त्याविषयीं सध्यां कांहींच लिहितां येत नाहीं' असें त्यांनीं म्हटलें आहे. या तिसऱ्या काव्याचे म्हणजे गर्भगीतेचे पहिला व शेवटचा असे दोन चरण त्यांनीं दिले आहेत ते असे:—

**ॐनमो आदिबीजा परमार्थ सहजा :**
**श्रीगुरु आदिराजा नमन माझें ॥**

* * *

**विखयांचे गडदरे त्येजविले दातारें :**
**स्वामी चक्रधरें महदंबेसी ॥**

' गर्भकांड–ओव्या ' असें जरी या प्रकरणाचें नांव असलें तरी वस्तुतः या ओव्या नसून अभंग आहेत. परंतु आरंभीं तरी निदान ओवी आणि अभंग यांत फारसा फरक नसल्यामुळें वरील काव्य ओवीबद्ध असल्याचें लिहिलें आहे. शिवाय येथें ओवी हा शब्द वृत्तवाचक नसून पूर्वी स्त्रीगीतांस ओव्या म्हणत असत त्या अर्थानें हा शब्द येथें वापरला आहे.

महदाइसेचीं दुसरीं दोन्ही काव्यें रुक्मिणीस्वयंवराख्यानावर आहेत. रुक्मिणीस्वयंवर हा विषय महानुभाव कवींचा आवडता दिसतो. कारण, खुद्द महदाइसेनें याच विषयावर दोन प्रकरणें लिहिलीं असून, भास्कर यानें ' शिशुपालवध ' व ' नरेंद्रपंडिता ' नें ' रुक्मिणी–स्वयंवर ' ग्रंथ लिहिला आहे. याशिवाय, महानुभावांचे जे एकंदर ६००० ग्रंथ आहेत असें म्हणतात त्यात रुक्मिणीस्वयंवरावर आणखीही कांहीं ग्रंथ असण्याचा संभव आहे.

महदाइसेच्या ' धवळयां ' चे, ' पूर्वार्ध ' आणि ' उत्तरार्ध ' असे दोन भाग आहेत. कोणत्या प्रसंगानें महदाइसेनें हे धवळे रचले, यासंबंधाची माहिती ' ऋद्धिपुरचरित्र ' नामक गद्यग्रंथांत दिली आहे ती येणेंप्रमाणें :— महानुभावपंथाचे संस्थापक श्रीचक्रधर यांचे गुरु श्रीगोविंदप्रभु हे ऋद्धिपुर येथें रहात असत. एकदां गांवांत लग्नसमारंभांचा धूमधडाका चाललेला पाहून, आपणही लग्न करावें असें गोविंदप्रभूंस वाटलें व तो आपला विचार त्यांनीं आपल्या शिष्यांस बोलून दाखविला. पण इतक्या वृद्ध मनुष्यास आपली मुलगी कोण देतो ? शेवटीं परमेश्वर नायक या नांवाचा मनुष्य गोविंदप्रभूंस आपली मुलगी देण्यास तयार झाला. म्हाइंभटानें लग्नाची सर्व तयारी केली. मंडप उभारला. लग्न लागलें. त्या वेळीं गोविंदप्रभु महदाइसेस म्हणाले, ' अग, कांहीं तरी गाणें म्हण ! ' ती गाणें म्हणेना. प्रभूंनीं तिला

पुनः आग्रह केला. तिनें विचारलें, ‘काय म्हणूं?’ प्रभु म्हणाले, ‘कांहीं तरी म्हण.’ महदाइसा म्हणाली, ‘धवळे * म्हणूं?’ मग नागदेवानें भागवताचे पांच धवळे गाइले. गोविंदप्रभु म्हणाले, ‘पण महदाइसा कांहीं गात नाहीं.’ महदाइसेनें विचारलें, ‘काय गाऊं?’ प्रभु म्हणाले, ‘कृष्ण-रुक्मिणी गजरथतुरे’ या थाटाचें एखादें गाणें म्हण.’ महदाइसा म्हणाली, ‘मला कोठें गाणें रचतां येतें?’ प्रभूंनीं सांगितलें, ‘चक्रधराचे शिरीं धरूनियां चरण’ या शब्दांनीं गाणें सुरू कर म्हणजे तुला काव्यस्फूर्ति होईल,’ मग तो चरण म्हणून महदाइसेनें † गाणें सुरू करतांच तिला काव्य-

---

* धवळे = लग्नसमारंभांत म्हणावयाचीं गाणीं.

† मूळ ऋद्धिपुरचरित्रांत ही हकीकत पुढील शब्दांत सांगितली आहे. भाषा फार जुनी व अगदीं घरगुती आहेः— “म्हाइंभटीं केशवनायकः विठ्ठल नायकः परमेश्वर नायकः रूपनायकः मुख्य आवघे लोक पाचारिलेः ते सर्वज्ञातें पाहात मांडवांतु बैसलेः सर्वज्ञ तयांतें अवलोकितीः मग म्हाइंभटीं आवघेयांसि गंधाक्षत केलेंः विडे दीधलेः बाहीरि मांडवाचां द्वारीं मंगळतुरेंः वाद्यंतरें वाजतिः मग ऐसा अवसरीं लोकु धवळ गातिः रूपदेवोबा चांग बोलाः म्हणेः ते जवळी नसताचि तेव्हळिः सर्वज्ञ काकोसातें भणितिलेंः आमेली (महदाइसा) चांग बोला म्हणेनाः चांग बोला म्हणः मग तेहि चांग बोला म्हणतीलाः आन सर्वज्ञः बाइसातें भणितिलेंः आमेली गायेना भणेः गाये गाये भणेः भाः वाळिवांचा अवसरीं भणितिलेंः आमेलीः गाये म्हणेः गायेना म्हणेः बाइसीं भणितिलें काये गाये जीः आवो कांहीं गाः तरी धवळ गावों जीः नागदेवो भागवताचे पाच धवळ गाइलेः सर्वज्ञें भणितलेंः आमेली हें ना म्हणेः आणिक कांहीं गायेना म्हणेः तरि काये गाये जीः आमेलीः कृष्णरुक्मीणी गजरथतुरें या थाट ऐसें गाये म्हणेः कैसें गायें जीः चक्रधराचे सीरीं धरूनियां चरण ऐसें गायेंः म्हणेः ऐसा वरू दीधलाः मग बाइसा स्फूर्ती जालीः बाइसींः श्रीचक्रधराचे सीरीं धरूनीया चरणुः या पहिलिया कडवेया-पासौनि लागलाः नीरुता जीवीं हें कडवेंपर्यंत भणितिलेंः तें आइकौनि सर्वज्ञ भणितिलेंः होये होये मेली निरूता जीवीं लागलाः म्हणेः तंव इतुका अवसरीं आउसीं सर्वज्ञातें आरोगणेलागि विनवीलेंः भगिजे व्यालियेलागिः जी आरोगणा करा-वेया बीजें कीजो जीः तंव म्हणेः आमेलीः जेविला भणेः भः आमेली हें जेविलेंः

स्फूर्ति झाली व तिनें हे धवळे गाइले. धवळ्यांच्या पूर्वार्धांतील ‘ चक्रधराचे सीरीं धरूनियां चरण ’ येथपासून ‘ लागला नीरुता जीवीं ’ येवढा भाग या प्रसंगीं तिनें रचिला व उरलेला भाग मागाहून पुरा केला. पुढें कालांतरानें महदाइसेनें धवळ्यांचा उत्तरार्ध रचिला त्याविषयीं ‘ नागदेवस्मृतीं’त पुढील हकीकत दिली आहे; “ एकदां म्हाइंभट आणि लक्ष्मींद्रभट यांनीं महदाइसेस म्हटलें, ‘ * आई, रुक्मिणीस्वयंवराचा ( धवळ्यांचा ) पुढचा भाग कां लिहीत नाहीं ? ’ महदाइसा म्हणाली, ‘आतां माझ्यानें काय होणार ? त्या वेळीं गोविंदप्रभूंनीं स्फूर्ति दिली म्हणून पूर्वार्ध रचला. पण आतां मला कांहीं स्फूर्ति होत नाहीं. ’ यावर म्हाइंभट व लक्ष्मींद्रभट म्हणाले, ‘ आम्ही शब्द घडवून देऊं, आणि तुम्ही गा. ’ महदाइसा म्हणाली, ‘ ठीक आहे. ’ मग म्हाइंभट आणि लक्ष्मींद्रभट यांनीं संवादरूपानें शब्द घडवून घडवून पदावलि बांधली व महदाइसा गाऊं लागली. याप्रमाणें म्हाइंभट आणि लक्ष्मींद्रभट यांनीं शब्द घडवून घडवून ( धवळ्यांची ) दुसरी माळ तयार केली व ती महदाइसेनें गाइली. ”

वरील हकीकतीवरून धवळ्यांचा सबंध उत्तरार्ध म्हाइंभट आणि लक्ष्मींद्रभट यांनींच रचला व महदाइसेनें तो फक्त गाऊन दाखविला हें उघड दिसतें. अर्थात् उत्तरार्धाची कर्त्री महदाइसा नव्हे. धवळ्यांची भाषा ज्ञानेश्वरीच्या व तत्कालीन इतर ग्रंथांच्या भाषेसारखीच जुनी असल्यामुळें ज्ञानेश्वरींतले बरेच जुने शब्द त्यांत सांपडतात. या धवळ्यांचें त्रोटक व्याकरण श्री. देशपांडे यांनीं ‘ आद्य मराठी कवयित्री ’ या पुस्तकांत दिलें आहे तें जिज्ञासूंनीं तेथें पहावें. धवळ्यांत ‘ पेरोज ’ सारखा एखादा फार्शी शब्दही सांपडतो. यासंबंधानें श्री. देशपांडे लिहितात, “ अल्लाउद्दीनाच्या

---

आउसीं भणितिलें: कव्हणे ठाइं जेविलेति जी: आमेली: रुक्मिणीदेवीचां राउळीं जेविलें: म्हणिजे रुक्मिणीचेनि हातें: बाइसीं भणितिलें जी तें द्वापरीं कीं: आन हें कलियुग: तें जेविलेया बहुत दिस जाले: कीं जी: या शब्दावरि सर्वज्ञ गदुगदा करि हास्यें केलें. ”

* या शब्दावरून उत्तरार्धरचनाकाळीं महदाइसा वृद्ध असली पाहिजे हें स्पष्ट दिसतें.

स्वारीपूर्वीपासूनच घोडे, मोतीं, अत्तरें, वगैरेच्या व्यापाराच्या निमित्तानें मुसलमानांच्या महाराष्ट्रावर स्वाऱ्या होत असल्यामुळें, व महदाइसेचा प्रत्यक्ष चुलतभाऊच ( सारंगपाणी ) रत्नपारखी असल्यामुळें तिनें ' पेरोज '-सारखा शब्द वापरणें अगदीं साहजिक आहे. ज्ञानेश्वरीपूर्वी १६१ वर्षें लिहिण्यांत आलेल्या ' मानसोल्लासां ' त ' तेजी ' सारखा फार्शी शब्द येतो, तो तरी अशा तऱ्हेच्या दळणवळणामुळेंच. "

महदाइसेच्या धवळ्यांचें, निव्वळ काव्य या दृष्टीनें, काय महत्त्व आहे याचेही विवेचन श्री. देशपांडे यांनीं आपल्या पुस्तकांत केलें आहे. धवळ्यांची भाषा जुनी परंतु फार साधी असून त्यांत उपमाउत्प्रेक्षादि अलंकारांचा अभावच आहे. परंतु "साधें वर्णन, साधी भाषा, व साधे विचार-विकार असूनही एखादें काव्य हृदयंगम कसें होतें, याचा धवळे हा उत्कृष्ट आदर्शच म्हटला पाहिजे. ' गतिशीलता ' हाही त्याचा आणखी एक गुण म्हणून सांगतां येईल. यामुळें या काव्यांत एक प्रकारचें प्रवाहित्व आलें आहे. " असा अभिप्राय श्री. देशपांडे यांनीं दिला आहे, आणि प्रत्यक्ष काव्य वाचल्यावर, तोच बरोबर आहे असें म्हणावें लागतें. या काव्यांत ही जी प्रवाहिता आली आहे तिचें कारण कवयित्रीचें शीघ्रकवित्व. कागद, शाई, आणि लेखणी घेऊन कविता करण्यास जर महदाइसा बसली असती तर तिची कविता इतकी ओघवती झाली नसती. श्रीगोविंदप्रभूंसारख्या अलौकिक वराच्या लग्नाचा प्रसंग आणि त्या प्रसंगीं गाणें म्हणण्याचा खुद्द त्या वरानेंच केलेला आग्रह, यांमुळें अकस्मात् काव्यस्फूर्ति होऊन महदाइसेकडून तेथल्या तेथें जें काव्य रचलें गेलें तें ओघवान् असावें यांत आश्चर्य नाहीं. किंबहुना अशा प्रकारें तात्कालिक स्फूर्तीनें अगदीं अल्पावकाशांत, कागद, शाई व लेखणी यांच्या साहाय्यावांचून, रचलें गेलेलें मराठींतील हें पहिलें व एकच काव्य आहे असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीगोविंदप्रभु म्हणाले, ' महदाइसे, गाणें म्हण, ' आणि महदाइसेनें तत्काळ गाणें म्हटलें. महदाइसेच्या अंगीं जर जन्मजात कवित्वाचा गुण असता तर म्हाइंभट आणि लक्ष्मींद्रभट यांनीं जेव्हां तिला धवळ्यांचा उत्तरार्ध लिहिण्याचा आग्रह केला तेव्हां तिनें ' आतां मला काव्यस्फूर्ति होत नाहीं ' असें सांगितलें नसतें. यावरून, तिच्या हातून झालेली धवळ्यांच्या पूर्वार्धाची रचना हें

श्रीगोविंदप्रभूंनीं तिला दिलेल्या तात्कालिक काव्यस्फूर्तींचेंच फल होय असें म्हणावें लागतें. "धवळ्यांत कांहीं दोषही दृष्टीस पडतात. वृत्तशैथिल्य, विस्कळित रचना, पुनरुक्ति, यमकाभाव, व ढिलाईचीं यमकें हे त्यांतील ठळक दोष होत." (श्री. देशपांडे). परंतु तात्कालिक रचनेंत अशा प्रकारचे थोडेबहुत दोष असणें अपरिहार्यच आहे हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे.

महदाइसेच्या धवळ्यांच्या पूर्वार्धाची रचना शके १२०८ च्यापूर्वी झाली. त्यानंतर पांच सहा वर्षांनीं (शके १२१३ त) नरेंद्र नामक महानुभाव कवीनें लिहिलेल्या रुक्मिणीस्वयंवर ग्रंथांतील कांहीं स्थळांचें धवळ्यांतील कांहीं स्थळांशीं 'आश्चर्यकारक' सादृश्य असून, अशीं स्थळें तीसचाळीस तरी निघतील, असें श्री. देशपांडे यांनीं लिहिलें असून, या सादृश्याचीं पांच उदाहरणेंही त्यांनीं आपल्या पुस्तकांत दिलीं आहेत; व तीं लक्षपूर्वक पाहतां कोणी तरी दुसऱ्याचे कांहीं शब्दसमुदाय बहुतेक जशाचे तसे उतरून घेतले आहेत हें उघड दिसतें; केवळ काकतालीय न्यायानें असें आणि इतकें सादृश्य येणें संभवनीय दिसत नाहीं. धवळ्यांच्या पूर्वार्धाचा जो रचनाकाल श्री. देशपांडे यांनीं महानुभावी ग्रंथांच्या आधारें दिला आहे, तो जर विश्वसनीय असेल तर रुक्मिणीस्वयंवरकर्त्या नरेंद्रानेंच महदाइसेच्या धवळ्यांतून कांहीं पदें जशाचीं तशीं आपल्या ग्रंथांत घेतलीं असावींत हें उघड दिसतें, आणि अनेक जुन्या कवींनीं असा प्रकार केलेला असल्यामुळें यांत आश्चर्य मानण्याचें कांहीं कारण नाहीं.

धवळ्यांवरून तत्कालीन समाजस्थितीविषयीं जी माहिती मिळते ती श्री. देशपांडे यांनीं मोठ्या साक्षेपानें दिली आहे. त्या वेळीं म्हणजे शके १२०० ते १२३४ च्या सुमारास, ऋद्धिपूरच्या बाजूस निशाण, टाळ, मांदळ (मृदंगासारखें एक वाद्य), शंख, तुरे इत्यादि वाद्यांचा उपयोग समारंभांत केला जात असे. घोडे, पालख्या, अंबाऱ्या, हीं वाहनें होतीं. तंबूही होते. मंडलीक, भांडारी वगैरे अधिकारी असत. राजेलोक शरीररक्षक बाळगीत. त्यांना आंगवळे म्हणत. तुरुंगाची व्यवस्था होती. महाराष्ट्रांत इतर देशांतून उंची कापड येई. सोन्याचा भाव पंधरा रुपये तोळा होता. ज्ञानेश्वरींतही सोन्याचा हाच भाव दिला आहे; मात्र ज्ञानेश्वरीच्या पुढील अध्यायांत एके

ठिकाणीं साडेपंधरा हा भाव आढळतो. कडीं, सांखळ्या, कुंडलें, तोडे हे पुरुषांचे व कंकणें, चाळ, रत्नहार इत्यादि स्त्रियांचे अलंकार होते. लग्नामध्यें औक्षण करणें, तैलमर्दन करणें, लोणवाण–केळवण–मूळ न्हाण करणें, रुखवत देणें, वरास बाशिंग बांधणें, वरानें मंडपप्रवेश करितांच त्याला वधूमाय व वरमाय यांनीं ओवाळणें, नृत्यांगनांचें नृत्य करविणें इत्यादि चाली रूढ होत्या व अद्यापही थोड्याशा फेरफारानें सातपुड्यापासून कारवारापर्यंत याच चाली रूढ आहेत. त्या कालीं स्त्रिया पतीचें उच्छिष्ट खात असत, व अद्यापही कांहीं ठिकाणीं खातात. त्या कालीं अंगास चंदनाची उटी व कपाळावर कस्तुरीचा टिळा लावीत. अन्नाला कापुराचा सुवास देत. ‘ ऋद्धिपुरवर्णन ’ ग्रंथांत ‘ ऋद्धिपुरचरित्रा ’ तील कांहीं गद्य उतारे दिले आहेत त्यांत तत्कालीन समाजस्थितीविषयीं बरीच माहिती सांपडते; विशेषतः श्रीगोविंदप्रभूंच्या विवाहसमारंभाचा जो वृत्तांत सदर ग्रंथाच्या १३७ व्या पृष्ठावर दिला आहे त्यांत त्या कालीं लग्नसमारंभांत कोणकोणत्या गोष्टी घडत असत व कोणकोणते सोहळे होत असत यासंबंधाची पुष्कळच माहिती अगदीं खुलासेवार रीतीनें दिली आहे.

महानुभाव पंथांची नुकतीच स्थापना झाली होती, अशा कालीं महानुभाव कवींनीं जे पौराणिक ग्रंथ लिहिले त्यांत महानुभाव संप्रदायाचें वैशिष्ट्य असें कांहीं दिसत नाहीं. इतर मराठी कवींनीं लिहिलेल्या ग्रंथांसारखेच हे ग्रंथ आहेत. उदाहरणार्थ, महदाइसेचे धवळे, भास्करभट्ट बोरीकरांचा शिशुपालवध, नरेंद्रांचा रुक्मिणीस्वयंवर इत्यादि ग्रंथ आणि एकनाथांचा रुक्मिणीस्वयंवर, मुक्तेश्वरी भारत वगैरे ग्रंथ यांत भाषेच्या बदलत्या स्वरूपाशिवाय दुसरा कोणताही म्हणण्यासारखा फरक नाहीं.

आतां महदाइसेच्या ‘ धवळ्यां ’ तील व ‘ मातृकिरुक्मिणी-स्वयंवरां ’-तील कांहीं सुरस उतारे देऊन हा चरित्रलेख पूर्ण करूं. धवळ्यांच्या पूर्वार्धाचीं ८३ कडवीं आहेत. धवळ्यांचें वृत्त कांहींसें अभंगाच्या स्वरूपाचें असून त्याच्या प्रत्येक कडव्याचे चार चरण आहेत. दोन दोन चरणांचे शेवटीं यमक आहे. या वृत्ताला मात्रागणांचा किंवा अक्षरसंख्येचाही निर्बंध नाहीं.

महदाइसेनें धवळे रचले त्या वेळीं गोविंदप्रभूंनीं तिला '**चक्रधराचे** शीरीं धरूनियां चरण ' या शब्दांनीं प्रारंभ करण्यास सांगितलें अशी हकीकत ऋद्धिपुरचरित्रांत दिलेली आहे, व श्री. देशपांडे यांनींही ती ' आद्य मराठी कवयित्री ' या आपल्या पुस्तकांत उद्धृत केली आहे. असें असतां, त्यांनीं सदर पुस्तकांत छापलेल्या धवळयांच्या आरंभीं '**श्रीसर्वेश्वराचे** सीरीं धरूनियां चरण ' हा पाठ आढळतो ! ' चक्रधराचें स्मरण करून तूं धवळे म्हणावयास प्रारंभ कर म्हणजे तुला स्फूर्ति होईल, ' असें गोविंदप्रभूंनीं महदाइसेला सांगितलें व त्याप्रमाणें तिनें '**चक्रधराचे** सीरीं धरूनियां चरण ' या शब्दांनीं धवळयांच्या रचनेस सुरुवात केली असें जर ऋद्धिपुर-चरित्रांत स्पष्ट लिहिलें आहे तर श्री. देशपांडे यांनीं '**श्रीसर्वेश्वराचे** सीरीं धरूनियां चरण ' हा पाठ कोठून आणला ? कदाचित्, ज्या हस्तलिखित प्रतीवरून हे धवळे त्यांनीं छापले त्या प्रतींत हा पाठ असेल; पण मूळपाठ तो नसून '**चक्रधराचे** ' हाच मूळपाठ आहे हें जर वरील हकीकतीवरून त्यांना माहित होतें तर त्यांनीं तोच पाठ स्वीकारावयास नको होता काय ? असो.

आपले आईबाप व बंधु यांचीं आपल्या लग्नासंबंधानें बोलणीं चाललीं आहेत हें ऐकून—

**" रुक्मिणी पुसे सखियांसी वृत्तांतु :**
**काइं वो बोलणें राउळगणांतु :**
**काइ बोले माता-पीता काइ बोले तो रुक्मिया भाई :**
**शिशुपाळें वरिसी ऐसें बोलणें तयांचा वो ठाइं :**
**शिशुपाळु वरु ऐसें आइकिलें बाळां :**
**श्रमु पावली नीन्हां जाली व्याकुळ :**
**स्मरिले कृष्णरावो देवा संकष्टीं पडलीय थोरी :**
**तूं एकुवांचौनिया आनु नाहीं अवधारीं :**
**हृदां धाक तिये लागली चिंता :**
**भक्तबंधु छेदुनी राखैं अनंता :**
**आरतां दानी कृपा करा देवा मासीं द्यावें उधरण :**
**शिशुपाळ-बंदिशाळ चुकवा दाखवा आपुले श्रीचरण : "**

रुक्मिणीनें श्रीकृष्णास लिहिलेली पत्रिका घेऊन सुदेव ब्राह्मण द्वारकेंत गेला त्या प्रसंगाचें वर्णन:—

**" नग्रीं प्रवेसु जाला राउळाभीतरी :**
**ब्राह्मणां आडकाठी नाहीं तीय द्वारीं :**
**ससही दारवठे देखे तथा भीतरी कृष्णमंदिरें :**
**रत्नखचितें रम्यें सरि न पवती मेरुसीखरें :**
**विप्रें देखियला कृष्ण यादवांचा राणा :**
**योगिय-मुनिजन सन्नेधी-चरण :**
**उपविष्ट सिंहासनीं देव किन्नर वोळग करिती :**
**यादवीं परिवारितु सहस्र कनकदंडे लक्षावरि ढळती :**
**सभा देखौनियां बहु उछावो मनीं :**
**तंव विप्रें देवासि घातलें लोटांगणी :**
**राखैं राखैं प्रभुराया तूं स्वामी माझा मी तुझा दासु :**
**करुणाकरांचा रावो जन्म सुफळ देखिले हृषीकेशी :**
**दर्शन देउनि श्री ( शिरीं ) धरियले चरण :**
**पुरे पुरे म्हणे कृष्ण यादवांचा राणा :**
**दिव्यासन घालुनियां देवें विप्रासि करविली पूजा :**
**निवालों कृष्णदर्शनें नेणें मी कव्हणें काह्याचें काज : "**

याप्रमाणें सुदेव–श्रीकृष्णाची भेट झाल्यावर सुदेव कृष्णाला सांगतो:—

**" भीमक-कुमारी सुंदर रुक्मिणी लावण्यरासी :**
**त्रैलोक्यमोहिनी तीया विनती पाठविली तुम्हासी :**
**स्वामी जगन्नाथु भक्ता कैवारी :**
**शरणांगतांचा वेळाइतु तरि बीजें करावें मुरारी :**
**भीमका घरीं देवा सुंदर रुक्मिणी बाळा :**
**रूपें तीया जिंतिलें त्रिभुवन सकळ :**
**तंव रायें पाहियला शिशुपाळु वरु तयाचें नांव न साहे ते कुमरी**
**तुम्ही देवा वरिलेति चौथा दिसीं लग्न अवधारीं : "**

*　　　*　　　*

"ऐसें मान आइकौनि मानवले जगन्नाथु :
दारुकाकरवीं आणविला रथु :
अरूढले कृष्णनाथरावो सरिसा विप्र जो आनंदें निर्भरु:
कव्हणा नेणतां देवो चाले कौंडण्यपुरा वेगवतरु : "

श्रीकृष्णाला रुखवत देऊन विद्याधरी परत आल्या तेव्हां 'श्रीकृष्ण तुम्हांला कसा काय दिसला?' असें रुक्मिणीनें मोठ्या उत्कंठेनें त्यांना विचारलें. तेव्हां :—

"तीया म्हणती देवी सांडा हे मातु :
लागलें प्रेमपिसें जेव्हलि देखिले श्रीजगन्नाथु :
रुक्मिणीपुढां बाळा सांगती वृत्तांतु :
सर्वांगीं न देखों तुमचा वो कांतु :
देखियलें जें आंग तेथौनि न ढळतीचि लोचन :
जाणती भक्तजन रूपें अगाधु गोविंदराणा :
काई रूपें वानूं नंदाचा कुमरु :
तुम्हा पती आम्हां पिता दुजा नाठवे विचारु : "

वरील भाषणांत सर्वसामान्य स्त्रीस्वभावाची व्यक्तता महदाइसेनें मोठ्या कुशलतेनें केली आहे यांत संशय नाहीं. विद्याधरी रुक्मिणीला सांगतात, "श्रीकृष्ण किती सुंदर आहे हें शब्दांनीं वर्णन करून सांगतां येणार नाहीं. ज्या क्षणीं त्याला आम्ही पाहिलें त्याच क्षणीं आम्ही प्रेमवेड्या झालों! बाकी तुझ्या नवऱ्याचें सर्वांगीण दर्शन आम्हांला झालेंच नाहीं. (कारण परपुरुषाचें सर्वांग कुलीन कुमारिकांनीं पाहणें योग्य नव्हे.) परंतु त्याच्या देहाचा जो भाग सकृद्दर्शनींच आमच्या अवलोकनांत आला तोही इतका सुंदर होता कीं त्यावर आमची दृष्टि सारखी खिळून राहिली." इतकें बोलल्यावर, विद्याधरींना शंका आली कीं या आपल्या श्रीकृष्णसौंदर्य-वर्णनामुळें, श्रीकृष्णावर आपण आषक झालों आहोंत, असा संशय रुक्मिणीस कदाचित् येईल. म्हणून, त्या पुढें सांगतात, "बाई रुक्मिणी, तुझा पति आम्हांला पितृस्थानीं आहे; त्याजविषयीं दुसरी कोणतीही भावना आमच्या मनांत नाहीं."

शिशुपाळाला रुक्मिणी देण्याचें ठरल्यावर बहुतेक विवाहपूर्वविधि होऊन, आपला नवस फेडण्यासाठीं रुक्मिणी अंबेच्या देवालयांत जाण्यास निघाली तेव्हां:—

**" आंगवळे सर्वे बहुत दळभारु:**
**तंव तियासवें भाट पढती कैवाडु:**
**वाद्यंत्रें सुडाविलीं तंव विप्रु दावी खुणा:**
**हा पैल देखैं तुझा वल्लभु गोविंदुराणा:**
**अंबिकेभुवनीं प्रविष्ट सुंदरी:**
**पूजा केली देवी पंचमा उपचारीं:**
**दोन्ही कर जोडुनि बोले रुक्मिणी सुललित वाचा:**
**तूं मज वरद होइं वेगीं मेळवीं यादवराजा:**
**अंबिके रायांगणीं उभी ठेली बाळी:**
**तंव विप्रें येतु देखिला वनमाळी:**
**सांवळा कमळनयन देवी पाहें पां लावण्यसिंधु:**
**तंव तीया रुक्मिणी दोन्ही करीं जोहारिले गोविंदु:**
**हंसगति चाले बाळा:**
**आनंदें आंसुवें कांहीं नेदखेचि डोळां:**
**कंपित सासंकित अंगीं रोम स्वेद लल्लाटीं:**
**तंव तिया रुक्मिणी यादवरावो श्रीकृष्णु देखिला थाटीं: "**

धवळ्यांच्या पूर्वार्धाचा शेवटचा चरण असा आहे:—

**" महदाइसीं गोविंदरावो धवळीं आइकवीले:**
**कृपानिधि श्रीप्रभु ब्रह्मकैवल्य:**
**मायावेष धरुनी क्रीडा केली भूस्थळीं सारंगपाणी:**
**भक्तां कैवल्यदानी सर्वेश्वरु नागदेवाचा स्वामी "**

आणि याचा अर्थ:–" महदाइसेनें गोविंदप्रभूला धवळे ऐकविले. हे गोविंद-प्रभु कसे आहेत? तर कृपेचे जणूं सागरच असे हे प्रभु केवळ ब्रह्मस्वरूप आहेत. प्रत्यक्ष विष्णूनें हा मायावी वेष धारण करून भूमंडळावर क्रीडा केली. भक्तांना मोक्षप्राप्ति करून देणारा हा सर्वेश्वर नागदेवाचा स्वामी

आहे." यावरून हें शेवटचें कडवें नागदेवानें रचलें असल्याचें उघड दिसतें. यांत ' धवळे ' असा शब्द नसून ' धवळीं ' असा शब्द आहे. यावरून मूळ शब्द ' धवळें ' असून ' धवळीं ' हें त्याचें अनेकवचन आहे हें उघड दिसतें. धवळें म्हणजे गीत व धवळीं म्हणजे गीतें.

धवळ्यांचा उत्तरार्ध म्हाइंभट आणि लक्ष्मींद्रभट यांनीं मागाहून सवडीनें लिहिला असल्यामुळें त्याची रचना पूर्वार्धाहून जरा अधिक नीटनेटकी दिसते. बाकी इतर सर्व थाट पूर्वार्धासारखाच आहे. पूर्वार्धाचीं कडवीं ८३ व उत्तरार्धाचीं ६५ आहेत. उत्तरार्धाचे शेवटीं कविनामनिर्देश नाहीं. शेवटचा चरण असा आहे:—

**' यादव पांडव महामुनि ऋषि देव :**
**सकळै करिती श्रीकृष्णचरणाची सेवा :**
**देखूनी भीमकारायासी बहुत उच्छावो मनामाझारी :**
**ब्रह्मादिकां दुर्लभ त्याचें अर्ध अंग पावली हे कुंवरी :**

धवळ्यांचा उत्तरार्ध जरी महदाइसेनें गाइला असला तरी ती तिची स्वतःची रचना नसल्यामुळें त्यांतील उतारे येथें देण्याचें कारण नाहीं.

मातृकी-रुक्मिणी–स्वयंवर हें महदाइसेचें काव्य अभंगबद्ध असून त्याची जी प्रत श्री. देशपांडे यांनीं ' आद्य मराठी कवयित्री ' या पुस्तकांत छापली आहे तींत एकंदर ११० कडवीं आहेत. शिवाय, इतर हस्तलिखित प्रतींत सांपडलेलीं ७९ अधिक कडवीं बारीक अक्षरांत निराळीं छापलीं आहेत. ह्या कडव्यांची रचना लक्षपूर्वक पाहतां ती थेट अगदीं पहिल्या ११० कडव्यांच्या रचनेसारखीच आहे, कोठें कांहीं फरक दिसत नाहीं. अशा स्थितींत, हीं ७९ कडवीं श्री. देशपांडे यांनीं मुख्य प्रतींत समाविष्ट न करितां निराळीं कां दिलीं हें कळत नाहीं. त्यांना ह्या काव्याच्या ज्या अनेक हस्तलिखित प्रती मिळाल्या त्यांतली एक प्रत त्यांनीं विशेष अधिकृत ठरविली असावी व त्या प्रतींतील कडव्यांहून जीं अधिक कडवीं दुसऱ्या प्रतींत सांपडलीं तीं प्रक्षिप्त मानून, मुद्दाम बारीक अक्षरांत निराळीं छापलीं असावीं असें दिसतें. असो.

महदाइसेनें ‘ धवळ्यां ’ चा पूर्वार्ध रचल्यावर, तो तात्कालिक स्फूर्तीनें घाईघाईनें रचल्यामुळें मनासारखा नीटनेटका उतरला नाहीं असें तिला वाटलें असावें व म्हणून तिनें त्याच कथानकावर हें ‘ मातृकी-रुक्मिणी-स्वयंवर ’ काव्य फुरसतीनें लिहिलें असावें असें वाटतें. कारण याची रचना धवळ्यांच्या रचनेहून किती तरी चांगली आहे. या काव्यांत रुक्मिणी-स्वयंवराची कथा साग्र आली असल्यामुळें, ‘ धवळ्यां ’ चा उत्तरार्ध लिहिण्याची जरूरी महदाईस वाटली नसावी. हें काव्य तिनें लिहिलें तोंपर्यंत तिची काव्यस्फूर्ति कायम होती; नंतर वयपरत्वें ती कमी झाली व म्हणूनच, म्हाइंभट व लक्ष्मींद्रभट यांनीं जेव्हां तिला धवळ्यांचा उत्तरार्ध पुरा करण्याची विनंति केली तेव्हां तिनें “ आतां मज काइ करवैल ? तैं गोसावीयें स्फूर्ति दिधली म्हणौनि स्फुरलें: आतां मज कांहीं स्फुरेना: ” असे उत्तर दिलें.

‘ मातृकी-रुक्मिणी-स्वयंवरा ’ ची जी अधिकृत प्रत श्री. देशपांडे यांनीं छापली आहे तिचीं ११० कडवीं असल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. ज्या वृत्तांत हें काव्य आहे त्या वृत्ताला महदाइसेनें ‘ ओवी ’ असें म्हटलें आहे :–

**“ जालें हें संपूर्ण रुक्मिणीसैंवर :**
**मातृकी नागर ओवीबंधीं : ”**

पण, खरोखरी ह्या ओव्या नसून अभंगच आहेत. वरील चरणांत कवयित्रीनें ‘ नागर ’ हा शब्द मुद्दाम वापरला आहे. यावरून धवळ्यांची भाषा ‘ नागर ’ नसून ‘ बोलभाषा ’ ( Colloquial ) आहे असेंच सूचित करण्याचा तिचा उद्देश दिसतो. धवळ्यांच्या पूर्वार्धाचे शेवटीं **‘ नागदेवाचा स्वामी ’** असे शब्द आहेत तसेच ते ‘ मातृकी-रुक्मिणी-स्वयंवरा ’ च्या शेवटींही आहेत. महदाइसेच्या दोन्ही काव्यांच्या शेवटीं असे शब्द कां आले असावेत, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

धवळ्यांच्या पहिल्या कडव्यांत चक्रधरास ( किंवा सर्वेश्वरास ) नमन केलें आहे, पण ‘ मातृकी-रुक्मिणी-स्वयंवरा ’ च्या प्रारंभीं नमन वगैरे कांहीं नाहीं. श्री. देशपांडे यांनीं ‘ अधिक कडवीं ’ म्हणून जीं ७९ कडवीं निराळीं दिलीं आहेत, त्यांतील पहिल्याच कडव्यांत मात्र चक्रधरास नमन केलें आहे :—

" श्रीदत्ता चक्रपाणी कृष्णा जी नागरा :
श्रीप्रभु चक्रधरा नमन माझें : "

आतां महदाइसेच्या ह्या दुसऱ्या काव्यांतील कांहीं सुरस वेंचे येथें देतों. आरंभींचें श्रीकृष्णवर्णन :—

" कांसे पीतांबरु कंठीं कुंदमाळा :
कांतु शोभे सांवळा : रुक्मिणीचा :
खांदावरि कावडी पडिभरें चालतु :
तो खेळे वनांतु : दत्तु सए :
गावो द्वारावती गोमतीए प्रांतीं :
गोदरीयें क्रीडती : चक्रपाणी :
घावो देउनि अविद्ये घाली निजपदीं :
खेळे कृपानिधि : रिधपुरीं :
चांपेगौर कांती चांपयाच्या द्दति :
चांपोलीं साजती : चक्रपाणी : "

हें श्रीकृष्णस्वरूपवर्णन फार सुंदर आहे यांत संशय नाहीं. यांत श्रीकृष्णालाच ' दत्त ' म्हटलें आहे यावरून कृष्ण आणि दत्तात्रेय यांच्यांत महानुभावपंथी लोक कांहीं भेद मानीत नसावे असें दिसतें.

श्रीकृष्ण आपल्या परिवारासह कौंडण्यपुरांत आला त्या प्रसंगाचें वर्णन :—

" जीणावेया वैरी जरासंधु समरीं :
बीजें केलें मुरारी : कौंडण्यासी :
झळकती झालरी झेंपावती टके :
देखौनि मनीं शंके: सिशुपालु :
झनानीति झेंगटा घंटा येकीदाटा :
पुढां चाले थाटः कुंजरांचे :
येतु चक्रपाणी तुरांचा गजरीं :
ते निहे अंबरीं : उठीताति :

येंत्रें येकनादें गर्जेती अंबरें :
तेणें मेरुशिखरें : कांपतातिः
टाळ घोळ वीणे टमक वाजती :
रथीं वारु चालती : पवनवेगीं :
टाकीलें नगरु तुरांचे गजरु :
पातले जाळीकारु : भीमकाचे :
ठीकांचां भद्रीं उभी ठाकौनि रुक्मिणी :
पाहे चक्रपाणी : वल्लभातें :
ठीकल्या ध्वजु रथु माणिकीं शोभतु :
विप्र असे दावितु : भीमकीयेतें :
डोळस सांवळा देखे भीमबाळा :
मेघडंबरीं नीळा : कृष्णरावो :
डोळे अश्रुजळीं देह न संभाळी :
झेंप तिये वेळीं : घालूं पाहे : ”

रुक्मिणी अंबिकेच्या दर्शनास गेली असतां श्रीकृष्णानें तिचा हात धरून तिला रथांत बसविलें त्या प्रसंगाचें वर्णन :—

“ लीळावसें करु देउनि मुरारी :
रथीं वाइली कुमरी : भीमकाची :
लागौनि श्रीचरणा देखतां सकळां :
रुक्मिणी गोपाळा : माळ घाली :
क्षेत्री उठावले हरिली रुक्मिणी :
घसरे सैन्यें दोन्ही : भीडीनलीं :
क्षिती कांपे सुर पाहती अंबरीं :
जींतीएले वैरीः रामकृष्णीं :
आइकौनि रुक्मिया कोपें धावीनला :
मग धरुनियां बांधिलाः ध्वजस्तंभीं :
आलासि रुक्मिणी सोडवूं सर्वथा :

**भादरीला माथा : रुक्मियाचा :**
**इक्षितु सर्वज्ञ हांसौनि रुक्मीयां :**
**तंव रामु म्हणे मेहुणेया: मानु केला :**
**इंद्र चंद्र ब्रह्मा मिळौनियां सृष्टी :**
**करिती पुष्पवृष्टि : कृष्णावरी : "**

ग्रंथाची फलश्रुति:—

**वाचितां आइकतां देवाचें चरित्र :**
**होती प्रेमपात्र : शुद्ध बुद्धि :**

महदाइसेचें तिसरें प्रकरण 'गर्भकांड ओव्या' हें अद्याप अप्रकाशित असल्या-मुळें त्यांतील वेंचे येथें देतां येत नाहींत याबद्दल वाईट वाटतें.

महदाइसेचें हें चरित्र आणि तिची उपलब्ध झालेली कविता यांच्या योगानें तत्कालीन परिस्थितीची थोडीशी कल्पना वाचकांस होऊं शकेल असें वाटतें. गोविंदप्रभूंचा शिष्य चक्रधर यानें स्थापन केलेल्या महानुभाव-पंथाची दीक्षा अनेक महाराष्ट्र ब्राह्मणांनीं घेतली व ते त्या पंथाचे कट्टे अनुयायी झाले यावरून, अगदीं आरंभीं तरी निदान, त्या पंथांत, तत्कालीन सनातनी लोकांनीं बुजून जाण्यासारखें फारसें कांहीं नसावें असें वाटतें. रूढ धर्माशीं सर्वथैव विसंगत असें जर या पंथांत कांहीं असतें तर त्या वेळच्या कर्मठ सनातनी लोकांनीं असा एकाएकीं त्या पंथाचा स्वीकार केला नसता. महानुभाव कवींनीं रचिलेल्या पौराणिक ग्रंथांत त्या पंथाचें वैशिष्ट्य कोठें दिसत नाहीं हें पूर्वी सांगितलेंच आहे. पुढील काळांत महानुभावपंथी-यांच्या विशिष्ट चालीरीति अधिक सुस्पष्ट होत जाऊन त्यांचे आचारविचार बदलले व त्यामुळें सनातनी लोक त्या पंथाकडे साशंक दृष्टीनें पाहूं लागले.

प्रस्तुत लेखांत पहिली महदाइसा, तिची नात कवयित्री महदाइसा व तिचा चुलतभाऊ नागदेव यांचे जे काल दिले आहेत त्यांच्या विश्वसनीयते-विषयीं मी अद्याप साशंकच आहें. आजीचें नांव नातीस ठेवलें असें मानून चालल्यास पहिल्या महदाइसेच्या मृत्यूनंतर दुसरी—कवयित्री—महदाइसा जन्मली असली पाहिजे हें उघड आहे. पहिली महदाइसा शके ११९३ च्या सुमारास वारली असावी असें रा. देशपांडे म्हणतात. अर्थात् त्यानंतर दुसरी

महदाइसा जन्मली. ती शके ११९४ त जन्मली असें जरी मानलें तरी शके १२०८ त समाधिस्थ झालेल्या गोविंदप्रभूंच्या लग्नकालीं तिचें वय १०।१२ वर्षांहून अधिक असणें शक्य नाहीं व नागदेव तिला ज्याअर्थीं 'आई,' 'म्हातारी' इत्यादि शब्दांनीं संबोधितो त्याअर्थी तो तिच्याहून वयानें लहान असला पाहिजे हें उघडच आहे. अशा स्थितींत गोविंदप्रभूंच्या विवाह-कालीं महदाइसा जर १०।१२ वर्षांची होती तर नागदेव त्या वेळीं फार तर ८।१० वर्षांचा असेल. आणि त्या वयांत त्यानें 'भागवताचे पांच धवळे गायिले' असें ऋद्धिपुरवर्णनांत लिहिलें आहे. तेव्हां यावर विश्वास कसा ठेवावा ? शिवाय, चक्रधरांची गांठ पडण्यापूर्वीं नागदेव हा 'मोकळा कासोटा, आडवी वेणी, व सर्वदा खांद्यावर तलवार' अशा थाटांत रहात असे. या सर्व गोष्टी कधीं घडल्या ? पुढें चक्रधरांची गांठ पडून नागदेव त्यांचा अनुयायी झाला व चक्रधरांनीं बद्रिकाश्रमीं गमन केल्यावर त्यांच्या विरहानें तो डोंगरपठारावर निश्चेष्ट होऊन पडला. त्यानंतर गोविंदप्रभूंचें लग्न झालें व त्या वेळीं त्यानें 'भागवताचे पांच धवळे गायिले. या सर्व गोष्टी ८।१० वर्षांच्या मुलाच्या हातून घडणें शक्य आहे काय ? माझ्या मतें या अडचणींचा परिहार करण्याला एकच उपाय आहे व तो, पहिल्या महदाइसेचा मृत्युकाल बराच मागें नेणें हा होय.

कवयित्री महदाइसा ही गोरा कुंभार, चांगदेव, निवृत्ति–ज्ञानदेवादि भावंडें, नामदेव, सांवतामाळी इत्यादि महाराष्ट्रीय संतांची समकालीन होती.

---

# मुक्ताबाई

आपल्या महाराष्ट्रांत मुक्ताबाई ही एक फार मोठी अलौकिक स्त्री होऊन गेली आहे. हिचें स्वतंत्र असें चरित्र प्रसिद्ध नाहीं, तिचे विख्यात बंधु श्रीज्ञानदेव यांच्या चरित्रांतच तिच्याही चरित्राचा समावेश झालेला आहे. परंतु निरनिराळ्या प्रसंगांच्या अनुरोधानें तिच्या ज्या गोष्टी सदर चरित्रांत आलेल्या आहेत त्यांवरून तिचा उच्च दर्जाचा पारमार्थिक अधिकार व तिची तेजस्विता व्यक्त झाल्याशिवाय रहात नाहींत. मुक्ताबाईची उपलब्ध असलेली कविताही फार थोडी आहे, परंतु तेवढ्या कवितेवरूनदेखील तिची परमार्थसंपन्नता प्रतीत होते.

निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई हें नामचतुष्टय भगवन्नामाच्या खालोखाल महाराष्ट्रांत लोकप्रिय आहे. या चार अलौकिक व्यक्तींनीं महाराष्ट्र वाङ्मयमंदिराचा पाया घातला व तो इतका बळकट घातला कीं त्यावर उभारलेल्या ह्या महाराष्ट्र-वाङ्मय-मंदिरास कालत्रयींही धोका येण्याचा संभव नाहीं. या चार भावंडांस येवढें अलौकिकत्व प्राप्त होण्याचें मुख्य कारण म्हटलें म्हणजे अगदीं अल्प वयांत, धार्मिक, सामाजिक व वाङ्मयक्षेत्रांत त्यांनीं करून दाखविलेली विलक्षण कामगिरी होय. तत्समकालीन व तदुत्तरकालीन बहुतेक सर्व संतकवींनीं या चारी भावंडांस गुरुस्थानीं मानलें आहे. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई ह्या चार व्यक्ति म्हणजे केवळ महाराष्ट्राच्याच किंवा हिंदुस्थानाच्याच नव्हे तर एकंदर जगाच्या इतिहासांतील अद्वितीय विभूति होत. आम्ही महाराष्ट्रीय तर त्यांना अवतारी व्यक्ति समजतों. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, एकनाथ, नामदेव, तुकाराम ही नामावलि म्हणजे वारकरी संप्रदायाची परंपरा होय. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई ह्या नामचतुष्टयाचा आध्यात्मिक गूढार्थ लक्षांत घेतां, त्या चारी भावंडांचे वडील विठ्ठलपंत

यांनीं आपल्या मुलांस हीं नांवें कांहीं विशिष्ट हेतूनेंच ठेवलीं असलीं पाहिजेत असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. विकल्पाची किंवा प्रपंचाची **निवृत्ति** झाल्यावर **ज्ञान**प्राप्ति होण्यास उशीर लागत नाहीं व या ज्ञान**सोपान**-मार्गानें जाणारास **मुक्ति** दूर नाहीं, हें सांगावयास नकोच. असो.

या चारी भावंडांची अगदीं निर्भेळ सत्यात्मक आणि पूर्ण विश्वसनीय अशी कोणतीच माहिती उपलब्ध नाहीं ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. जी काय माहिती उपलब्ध आहे ती बहुतेक सगळी दंतकथामय असल्यामुळें अगदीं संशयातीत असा भाग तींत फार थोडा आहे. ज्ञानेश्वरीचे लेखक सच्चिदानंद बाबा यांजपासून तहत ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांजपर्यंत सुमारें आठ दहा लेखकांनीं ज्ञानदेव आणि त्यांचीं भावंडें यांच्या चरित्रावर ग्रंथ, प्रबंध, निबंध व काव्यें लिहिलीं आहेत, त्यांतील माहितीच्या आधारानें प्रस्तुत निबंध लिहिण्याचा प्रयत्न मी करीत आहें.

ज्ञानेश्वरीच्या शेवटीं त्या ग्रंथाचा समाप्तिकाल शके १२१२ हा असंदिग्ध रीतीनें नमूद करून ठेवण्यांत आलेला असल्यामुळें या चार भावंडांच्या कालनिर्णयाच्या बाबतींत तरी निदान मतभेदास किंवा संशयास बिलकुल जागा नाहीं ही समाधानाची गोष्ट होय. या कालाच्यापूर्वी बरींच वर्षें, पैठणच्या पूर्वेस चार कोसांवर गोदावरीच्या उत्तरतीरीं आपेगांव नामक एक गांव आहे तेथें, ज्ञानेश्वर महाराजांचे पूर्वज कुळकर्णी होते. ही कुळकर्णाची वृत्ति या घराण्याकडे वंशपरंपरेनें चालत आलेली होती. हे माध्यंदिन शाखीय यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण; यांचें गोत्र पंचप्रवरात्मक वत्स. ज्ञानदेवादि भावंडांच्या पणजाचे पणजे हरिहरपंत कुळकर्णी हे शके १०६० च्या सुमारास आपेगांवचें कुळकर्ण पहात होते. त्यांना तीन अपत्यें झालीं; दोन मुलगे व एक मुलगी. वडील मुलाचें नांव रामचंद्र, धाकट्याचें केशव व मुलीचें नांव मोहनाबाई. केशवाचा व्रतबंध झाल्यावर एक वर्षानें तो वारला. मोहनाबाई देवगड येथील नरहरपंत माचवे यांच्या पुत्रास दिली होती. हरिहरपंतांच्या पश्चात् रामचंद्रपंतांनीं कुळकर्णाची वृत्ति चालविली. त्यांचा काल झाल्यावर त्यांचे पुत्र गोपाळपंत यांनीं व गोपाळपंत वारल्यावर त्यांचे पुत्र त्र्यंबकपंत यांनीं ती वृत्ति चालविली. हे त्र्यंबकपंत मोठे कर्तबगार पुरुष

होते. त्या वेळीं जैत्रपाळ* नामक राजा राज्य करीत होता त्यानें एका बंडखोर देशमुखाचें पारिपत्य करण्याच्या कामगिरीवर त्र्यंबकपंतांचे पुत्र हरिपंत यांस पाठविलें. पंतांची व देशमुखांची लढाई होऊन तींत पंत धारातीर्थी पतन पावले. होतकरू पुत्राच्या मृत्यूमुळें त्र्यंबकपंत उदास होऊन परमार्थास लागले. पुढें महासाधु गोरखनाथ यांची स्वारी तीर्थाटण करीत करीत आपेगांवास आली, तेव्हां त्र्यंबकपंतांनीं त्यांचा उपदेश घेतला. श्रीज्ञानेश्वरादि भावंडांच्या पूर्वजांत, भगवद्भक्त या नात्यानें, त्र्यंबकपंत हे मूळपुरुष होत. यांची समाधि आपेगांवीं आहे.

त्र्यंबकपंतांचे ज्येष्ठ चिरंजीव गोविंदपंत यांची भार्या निराबाई हीस गोविंदपंतांच्या २५ व्या वर्षीं एक पुत्र झाला त्याचें नांव विठ्ठल. हेच विठ्ठलपंत ज्ञानदेवादि भावंडांचे जनक होत. निराबाई या पैठणकर कृष्णाजीपंत देवकुळे यांच्या भगिनी होत. हें देवकुळ्यांचें घराणें अद्याप पैठण येथें आहे. विठ्ठलपंतांच्या सातव्या वर्षी त्यांचें मौंजीबंधन झालें. पुढें अल्पकालांतच त्यांचें वेदशास्त्राध्ययन पूर्ण झाल्यावर वडिलांची आज्ञा घेऊन ते तीर्थाटणास निघाले. त्यांची प्रवृत्ति जन्मतःच परमार्थाकडे होती. द्वारका, पिंडारक, सुदामपुरी, मूळमाधव, भालुकातीर्थ, प्रभास, मुचकुंदगुंफा, सप्तशृंगी, त्र्यंबकेश्वर, भीमाशंकर इत्यादि तीर्थें करीत करीत ते आळंदीस आले. तेथील कुळकर्णी त्रिप्रवरी वासिष्ठ गोत्री सिधोपंत या गृहस्थांनीं विठ्ठलपंतांची सदाचारसंपन्नता पाहून त्यांस आपली मुलगी दिली. पुढें विठ्ठलपंत दक्षिणयात्रेस निघाले. कृष्णा, कावेरी, तुंगभद्रा या नद्यांचीं स्नानें; श्रीशैल, व्यंकटगिरी, रामेश्वर, शिवकांची, विष्णुकांची, गोकर्ण, करवीर, कराड, माउली इत्यादि क्षेत्रें करीत करीत ते पुनः आळंदीस आले. तेथून आपली पत्नी रुक्मिणी व सासूसासरा यांसह, आपेगांवीं आपल्या आईबापांच्या दर्शनास ते गेले व तेथेंच कांहीं दिवस राहिले. पुढें आईबाप निवर्तल्यावर संसार गळ्यांत पडला. परंतु संसाराकडे त्यांचें लक्ष नव्हतें. नवरा संसाराविषयीं उदासीन आहे व नित्य ईशचिंतनांत निमग्न असतो ही गोष्ट रुक्मिणीबाईनें सिधोपंतांस कळविली तेव्हां ते मुद्दाम आळंदीहून

---

* मुकुंदराजांच्या 'विवेकसिंधू'त ज्याचा उल्लेख आला आहे तोच कदाचित् हा जैत्रपाळ असेल.

आपेगांवास आले व जामातास प्रेमाची विनंति करून मुलीसह त्यास त्यांनीं आळंदीस आणलें.

विठ्ठलपंतांनीं आळंदी येथें कांहीं वर्षें कालक्रमणा केल्यावर ‘ अपत्य-संभवाभावीं ’ रुक्मिणीबाईच्यामागें त्यांनीं टुमणें लावलें कीं “ मला काशीस जाऊन राहण्याची इच्छा आहे, तरी संन्यास घेण्यास परवानगी दे.” पतीची वैराग्यवृत्ति पाहून रुक्मिणीबाई सावध होत्या, त्यांनीं सिधोपंतांकडून संतति झाल्याशिवाय संन्यास घेऊं नये ’ असें पतीस सांगविलें. परंतु रुक्मिणीबाई एकदां कामांत गुंतलेल्या असतां, ती संधि साधून, ‘ मी गंगेवर स्नानास जाऊं ? ’ असें विठ्ठलपंतांनीं त्यांस विचारलें. तेव्हां नित्याप्रमाणें हे इंद्रायणीवर स्नानास जात असतील असें समजून रुक्मिणीबाईनीं सहज जा ’ म्हटले. तेव्हां तीच पडत्या फळाची आज्ञा मानून पंत जे आळंदीहून तडक निघाले ते थोड्याच दिवसांत काशीस जाऊन पोंचले. तेथें प्रसिद्ध रामानंदस्वामी होते त्यांस, “ मी एकटा असून मला स्त्रीपुत्रादि पाश नाहीं ” असें खोटेंच सांगून पंतांनीं त्यांचा अनुग्रह घेतला. रामानंदांनीं त्यांस संन्यासदीक्षा देऊन त्यांचें नांव ‘ चैतन्याश्रम ’ ठेविलें. विठ्ठलपंतांच्या संन्यासदीक्षेची ही बातमी दक्षिणेंत कर्णोपकर्णीं रुक्मिणीबाईस समजली तेव्हां अर्थातच त्यांना फार वाईट वाटलें. तथापि ‘ आलिया भोगासी असावें सादर ’ असा विचार करून, आपलें शेष आयुष्य कडकडीत वैराग्यांत घालविण्याचें त्यांनीं ठरविलें; व त्याप्रमाणें बारा वर्षें त्यांनीं खडतर अनुष्ठान केलें. पुढें कर्मधर्मसंयोगानें, रामानंदस्वामी रामेश्वरास जाण्यासाठीं दक्षिणेंत आले असतां, वाटेंत आळंदी येथें त्यांचा मुक्काम पडला. तेथील मारुतीच्या देवळांत स्वामी उतरले होते. रुक्मिणीबाई आपल्या नित्यक्रमाप्रमाणें सायं-काळीं मारुतिदर्शनास आल्या असतां, तेथें स्वामीस पाहून त्यांनीं त्यांस वंदन केलें. तेव्हां स्वामींनीं सहज ‘ पुत्रवती भव ’ असा आशीर्वाद दिला. तो ऐकतांच बाईस हसूं आलें. स्वामींनीं हंसण्याचें कारण विचारलें तेव्हां पतीनें संन्यास घेतल्याचा वृत्तांत बाईनीं त्यांस सांगितला. पुढें बाईची व त्यांच्या पतीची सविस्तर हकीकत ऐकून घेतल्यावर काशींत ज्या गृहस्थास आपण संन्यासदीक्षा दिली तो चैतन्याश्रमच या बाईचा पति असावा ही गोष्ट स्वामींच्या लक्षांत येऊन ते दचकले; आणि एका निष्पाप तरुणीच्या

संसारसुखांत व्यत्यय आणण्यास आपण कारणीभूत झालों या विचारानें त्यांना मोठा खेद झाला. मग रामेश्वरास जाण्याचा बेत रहित करून स्वामी एकदम काशीस गेले. चैतन्याचे श्वशुर सिधोपंत हेही आपल्या कन्येसह स्वामींबरोबर काशीस गेले. स्वामींनीं चैतन्याश्रमास गांठून, स्वतःस खोटी माहिती देऊन फसविल्याबद्दल त्याची चांगली कानउघाडणी केली, तेव्हां चैतन्याश्रमानें आपली चुकी कबूल करून स्वामींचे पाय धरले. इतक्यांत सिधोपंतही रुक्मिणीबाईसह तेथें आले. मग—

**“ उठवुनी श्रीपादें दिधलें आश्वासन। म्हणती करीं ग्रहण इचें आतां**
**अविधि कर्माचें न धरावें भय। यासी आहे साह्य जगदीश**
**स्वदेशीं जाउनी करावा आश्रम । सुखरूप स्वधर्म चालवावा**
**श्रीपादें मस्तकीं हात ठेवियला । निरोप दिधला चैतन्यासी ”**

—नामदेवकृत ‘ ज्ञानेश्वरांची आदि. ’

रामानंदस्वामी चैतन्याश्रमास म्हणाले, “ तूं आतां आपल्या पत्नीचें ग्रहण कर. विधिपूर्वक जी गोष्ट घडली नाहीं तिचें भय बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. आतां तूं स्वदेशीं जा आणि सुखानें गृहस्थाश्रम चालव.”

याप्रमाणें चैतन्याश्रम पुनः विठ्ठलपंत झाले व गुर्वाज्ञेप्रमाणें त्यांनीं पुनः रुक्मिणीबाईचा अंगीकार केला व गृहस्थाश्रमी होऊन पत्नी व श्वशुर यांसह ते आळंदीस येऊन राहिले. संन्याशानें पुनः गृहस्थाश्रम स्वीकारला हें पाहून शास्त्राज्ञेस चिकटून राहणाऱ्या कर्मठ ब्राह्मणाचें पित्त भडकलें. त्यांनीं विठ्ठलपंतांचा नाना प्रकारांनीं छळ केला, व पंतांनींही तो अगदीं निमूटपणें सोसला.

**“ चैतन्याश्रम संन्यासी झाले गृहवासी । मुलींच्या प्रकृतीसी ऐक्य आलें**
**हासिन्नले लोक बरवा हा संन्यास । करिती उपहास दर्शनाचा**
**द्विजीं वाळियेलें जगीं सांडियेलें । शेखीं उपेक्षिलें आप्तवर्गीं ”**

—कित्ता

यावरून असें दिसतें कीं, आळंदीस येऊन राहिल्यावर विठ्ठलपंत आपेगांवास एकदां जाऊन आले असावे. आपेगांवांतल्या त्यांच्या आप्तांनीं त्यांची उपेक्षा केली व ब्राह्मणांनीं त्यांना वाळीत टाकले व म्हणून ते पुनः आळंदीस येऊन राहिले.

पुढें विठ्ठल–रुक्मिणीच्या उदरीं निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई हीं दैवी मुलें दोन दोन वर्षांच्या अंतरानें जन्मलीं.

**ज्ञानेश्वरमहाराजांच्या घराण्याचा वंशवृक्ष**




**निवृत्तिनाथ**—जन्मकाल शके ११९५ श्रीमुख संवत्सर, माघ वद्य १, प्रातःकाल.

**ज्ञानदेव**—शके ११९७ युवा संवत्सर, श्रावण कृष्ण ८, मध्यरात्र.

**सोपान**—शके ११९९ ईश्वर संवत्सर, कार्तिक शुद्ध १५, प्रहररात्र.

**मुक्ताबाई**—शके १२०१ प्रभाति संवत्सर, आश्विन शुद्ध १, मध्यान्ह.

कित्येक स्थलीं हे जन्मशक पुढें लिहिल्याप्रमाणें आढळतात :—

**निवृत्ति**—शके ११९०. **ज्ञानदेव**—शके ११९३. **सोपान**—शके ११९६. **मुक्ताबाई** शके ११९९.

यांतले कोणते काल खरे आणि कोणते खोटे हें शोधून काढण्याचा प्रयत्न करण्यांत आतां कांहीं अर्थ नाहीं. विठ्ठलपंतांच्या या चारी मुलांचे

जन्म आळंदी येथेंच झाले असावे असें वाटतें. मुलांचें मुंजीचें वय होत चाललें तसतशी विठ्ठलपंतांची काळजी वाढत चालली. संन्याशाच्या मुलांची मुंज लावण्यास ब्राह्मण तयार होणार नाहींत हें पंत जाणून होते. शेवटीं "तुम्हीं जें काय सांगाल तें प्रायश्चित्त आम्ही घेतों, परंतु आमच्या मुलांचे व्रतबंध झाले पाहिजेत," अशी ब्राह्मणांस त्यांनीं विनंति केली. तेव्हां सगळे शास्त्रार्थ धुंडाळून विद्वान् ब्रह्मवृंदानें शेवटीं असा कठोर निर्णय दिला कीं, "तुमच्या अपराधास शास्त्रांत कोठेंही प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं, व तुमच्या मुलांच्या मुंजी करण्यास शास्त्राची अनुज्ञा नाहीं ! तुमचा अपराध येवढा भयंकर आहे कीं, त्यास देहांत प्रायश्चित्ताशिवाय दुसरी शिक्षा नाहीं !"

ब्राह्मणांनीं आपल्या समजुतीप्रमाणें अगदीं कांटेतोल न्याय दिला आणि ब्रह्मवाक्य म्हणजे भगवद्वाक्य मानणाऱ्या विठ्ठलपंतांनीं तो निमूटपणें मान्य केला. ब्राह्मणांनीं फर्माविलेली ती कठोर शिक्षा भोगण्यास ते तयार झाले. प्रिय बालकांचा मोह सोडून ते पत्नीसह प्रयागास गेले आणि तेथें गंगायमुना-संगमांत त्या दोघांनींही जलसमाधि घेतली. ब्राह्मणांनीं दिलेला निर्णय व विठ्ठलपंत आणि रुक्मिणी यांनीं तदनुसार केलेलें देहार्पण यांचा परिणाम मात्र त्या चार निरपराधी बालकांस आजन्म भोगावा लागला.

अगदीं अल्पवयांत प्रिय मातापित्यांचा अशा अकल्पित आणि आकस्मिक रीतीनें कायमचा वियोग झाल्यावर हीं निवृत्तिज्ञानदेवादि चार भावंडें आपेगांवास—आपल्या पूर्वजांच्या गांवीं—राहण्यास गेलीं. परंतु तेथेंही त्यांच्या भाऊबंदांनीं त्यांना घरांत येऊं दिलें नाहीं व त्यांच्या मिळकतीचा वांटाही त्यांना मिळूं दिला नाहीं. शेवटीं निवृत्ति व ज्ञानदेव यांनीं कोरान्न भिक्षा मागण्यास गांवांत फिरावें व सोपानदेवानें छोट्या मुक्ताबाईस सांभाळावें, असा क्रम सुरू झाला. त्या वेळीं निवृत्तीचें वय फार तर आठ दहा वर्षांचें, ज्ञानदेवाचें सात आठ वर्षांचें, सोपानाचें पांच सहा वर्षांचें व मुक्ताबाईचें तीन चार वर्षांचें असेल ! येवढ्या लहान वयाच्या या कोमल बालकांवर दुर्दैवानें हा जो खडतर प्रसंग आणला त्याला तोंड देतांना त्यांना किती दुःखें भोगावीं लागलीं असतील, संन्याशाचीं मुलें म्हणून गांवांतील लोकांकडून होणारी अवहेलना आणि उपहास हीं त्यांनीं कशीं सोसलीं असतील, सोपान आणि

मुक्ताबाई यांनीं वरचेवर आईबापांची आठवण काढून एकमेकांचीं अंगें अश्रूंनीं कशीं भिजवून टाकलीं असतील, त्यांची ती करुणाजनक स्थिति पाहून स्वतः साश्रुलोचन झालेल्या निवृत्ति-ज्ञानदेवांनीं त्यांची कशी समजूत घातली असेल, त्या बालकांची ही पाषाणासही द्रव आणणारी दुःस्थिति पाहून त्यांच्या एकाही आप्ताच्या किंवा इतर कोणा गृहस्थाच्या किंवा गृहिणीच्या हृदयास पाझर कसा फुटला नाहीं, इत्यादि गोष्टींचा विचार मनांत आला कीं अंगावर रोमांच उभे राहून, डोळे पाण्यानें भरून येतात आणि जगाचें सौम्य स्वरूप दृष्टिआड होऊन त्याचें भीषण स्वरूप तेवढें डोळ्यांपुढें ढळढळीतपणें उभें राहून उदासीनतेनें हृदय पूर्णपणें व्यापून जातें ! अस्तु.

पुढें कांहीं दिवसांनीं तीं चारी भावंडें आपेगांवाहून आपल्या आजोळीं-आळंदीस-आलीं. स्वतःच्या व बंधूंच्या व्रतबंधाविषयीं निवृत्तिनाथ उदासीन होते. परंतु ज्ञानदेवांच्या आग्रहावरून पैठण येथील ब्रह्मवृंदाकडून शुद्धिपत्र मिळविण्याचा प्रयत्न करण्यासाठीं आपल्या भावंडांसह ते पैठणास गेले. तेथील ब्राह्मणांनीं आरंभीं त्यांचा उपहासच केला; परंतु ज्ञानदेवांनीं जेव्हा रेड्याच्या मुखानें वेद वदवून आपल्या अलौकिकतेची प्रचीति त्यांना आणून दिली, तेव्हां त्या भावंडांच्या दैवी स्वरूपाविषयीं त्यांची खात्री होऊन त्यांनीं त्यांस शुद्धिपत्र दिलें, व त्यांचा जयजयकार केला. तथापि, इतकें झालें तरी त्या मुलांविषयींची ब्राह्मणांच्या मनांतली अढी शेवटपर्यंत थोडीबहुत कायमच होती, हें त्या चौघांचींही शेवटपर्यंत लग्नें झालीं नाहींत यावरून उघड होतें. मुलांच्या लग्नांचें एक असो, पण मुलगी मुक्ताबाई हिचेंही लग्न झालें नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

पुढें ही बालसंतचमु नेवासें येथें गेली. या गांवांत एका पतिव्रता स्त्रीच्या मृतपतीस ज्ञानदेवांनीं आपल्या अमृतकरस्पर्शानें सजीव केलें. या गृहस्थाचें नांव सच्चिदानंद बाबा. ज्ञानेश्वरीग्रंथाचे हे लेखक होत. याच कालांत नामदेव हे प्रसिद्ध संत होऊन गेले व त्यांच्याशीं या चारी भावंडांचा चांगला परिचय होता. तत्कालीन इतर संतांच्याही पंढरपुर येथें त्यांच्याशीं गांठीभेटी होत असत. एकदां अशी गंमत झाली कीं निवृत्ति-ज्ञानदेवादि

भावंडें इतर संतांसह पंढरीस पांडुरंगदर्शनास आलीं असतां देवाजवळ बसलेल्या नामदेवांसही त्यांनीं प्रदक्षिणा घालून नमस्कार केला. तेव्हां नामदेव मोठ्या अभिमानानें म्हणाले, "मी नेहमीं पांडुरंगाजवळ असतों. हे जसे देवभक्त तसा मीही देवभक्त; परंतु मला जसें पांडुरंगाचें सान्निध्य आहे तसें यांना कोठें आहे ? पांडुरंग सगुणरूपानें प्रगट होऊन माझ्याशीं बोलतोचालतो, तसा साक्षात्कार यांना कोठें झाला आहे ? तेव्हां यांनीं मला प्रदक्षिणा घालून नमस्कार केला हें योग्यच केलें, कारण या मानाला मी पात्रच आहें. पण मी मात्र यांना उलट नमस्कार करणार नाहीं." नामदेवांचें हें औद्धत्य पाहून इतर संतांस फारसें कांहीं वाटलें नाहीं, पण मुक्ताबाईस मात्र त्यांचें हें वर्तन सहन झालें नाहीं. ती नामदेवांस म्हणाली—

**अभंग**

**" अखंड जयाला देवाचा शेजार । कां रे अहंकार नाहीं गेला ?**
**मान अपमान वाढविसी हेवा । दिवस असतां दिवा हातीं घेसी**
**परब्रह्मासंगें नित्य तुझा खेळ । आंधळ्याचे डोहळे कां बा झाले ?**
**कल्पतरुतळवटीं इच्छिली ते गोष्टी । अद्यापि नरोटी राहिली कां ?**
**घरीं कामधेनु ताक मागूं जाये । ऐसा द्वाड आहे जगामाजी "**

अशा रीतीनें नामदेवांची कानउघाडणी करून मुक्ताबाई त्यांस म्हणाली, "पंढरपुरांत येणारे सगळे संत तुझ्या पायांवर डोकीं ठेवीत असतील; माझ्या बंधूंनींही पांडुरंगाबरोबरच तुलाही नमस्कार केला. पण मी मात्र, तुझा हा अहंकार गेल्याशिवाय, तुला नमस्कार करणार नाहीं." मुक्ताबाईचें हें सडेतोड भाषण ऐकून ज्ञानदेवादि बंधूंस थोडेंसें वाईट वाटलें. ते तिला म्हणाले, "ताई, यानें आपल्या भक्तिबलानें देव आपला ऋणाईत केला आहे. याला ज्ञानाची काय जरूरी ?" मुक्ताबाई म्हणाली, "ज्ञानाशिवाय भक्ति व्यर्थ आहे. ज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत अहंकारही जाणार नाहीं, आणि अहंकार गेल्याशिवाय ज्ञान होणार नाहीं." इतकें बोलून ती पुनः नामदेवांस म्हणाली,

**अभंग**

**" झालासी हरिभक्त तरी आम्हां काय। आंतुली ती सोय न ठाउकी**
**घेउनि टाळदिंडी हरिकथा करिसी । हरिदास म्हणविसी श्रेष्ठपणें**

**गुरुवीण तुज नव्हेचि गा मोक्ष । होशील मुमुक्षु साधक तूं**
**आत्मतत्त्वीं दृष्टि नाहींच पां केली । तंववरी ब्रह्मबोली बोलुनि काय ?**
**तुझें रूप तुवां नाहीं ओळखिलें । अहंतेतें धरिलें कासयासी ?**

या नाम्यानें भक्तीचें नुसतें स्तोम माजविलें आहे, पण याचें हृदय अद्याप कोरडें ठणठणीत आहे. संतांना मान देण्यास जो तयार नाहीं त्यानें इतके दिवस देवाजवळ राहून काय केलें ? खापराला परीस लावल्यानें त्याचें सोनें थोडेंच होणार ? या चंदनाच्या वृक्षाला अहंकारसर्पानें जोंपर्यंत वेढे दिलेले आहेत तोंपर्यंत त्याचा संसर्ग भयावह आहे. चांगदेवही एका काळीं असाच घमेंडानंदन होता—

**अभंग**

**चौदाशें वरुषें शरीर केलें जतन । बोधावीण शीण वाढविला**
**नाहीं गुरुमंत्र नाहीं उपदेश । परमार्थासि दोष लावियेला**
**स्वहिताचें कारण पडियेलें जेव्हां । शरण आला तेव्हां अलकापुरीं**
**गैनीनाथें गुज दिलें निवृत्तीला । निवृत्तीचा झाला ज्ञानदेव**
**ज्ञानदेवीं बीज वाढविलें जनीं । तेंचि आम्ही तुम्ही संपादिलें**
**म्हणे मुक्ताबाई तिहीं लोकीं ठसा । नामदेव ऐसा राहिला कां ?"**

स्त्रियांची जात अगोदरच थोडीशी वाचाळ; त्यांत मुक्ताबाई तर अगदींच कोंवळी पोर, तेव्हां आपल्या वडील बंधूंचा व इतर संतांचा नामदेवांकडून झालेला अपमान तिनें मुकाट्यानें सहन केला नाहीं यांत आश्चर्य तें काय ? तिचें वरील मर्मभेदक भाषण नामदेवांनीं निमूटपणें ऐकून घेतलें, पण निवृत्तिनाथांस तें ऐकून बरें वाटलें नाहीं. ते मुक्ताबाईस म्हणाले, 'ताई, संतांस आपण असें बोलूं नये. संतांची भेट होणें हें मोठें भाग्य आहे. या पंढरपुरांत जे लोक वास करतात ते धन्य होत. त्यांचे घरीं आपण श्वान होऊन रहावें. या नामदेवानें आपल्या अतुल भक्तिबलानें पांडुरंग आपला सखा केला आहे. तर अशा अधिकारी पुरुषाला 'अरे तुरे' म्हणून कठोर शब्द बोलणें योग्य नाहीं. येवढा वेळ बोललीस तें बोललीस, पण आतां त्याला नमस्कार करून त्याची क्षमा माग.' यावर मुक्ताबाई म्हणाली, 'तें कांहीं नाहीं. यानें सद्गुरूचा उपदेश घेतल्याशिवाय याची अहंता नष्ट होणार

नाहीं. म्हणून याला चार मंडळींसमोर नेऊन याचा गर्वपरिहार केला पाहिजे, म्हणजे हा आपोआप ताळ्यावर येईल.' शेवटीं सर्वांनुमतें असें ठरलें कीं आळंदी येथें ज्ञानदेवांच्या गुंफेंत गोरोबा कुंभारांकडून, जमलेल्या सर्व संतांची परीक्षा करवावी. त्या परीक्षेंत जर नामदेव उत्तीर्ण झाले आणि गोरोबांनीं त्यांना पक्का घट म्हणून ठरविलें तर मग त्यांचें संतत्व सर्वांनीं मान्य करावें. मग गोरोबांस बोलावून आणण्याची कामगिरी मुक्ताबाईकडे सोंपविण्यांत आली. मुक्ताबाई म्हणजे प्रत्यक्ष आदिमायेचा अवतार! ती गोरोबांकडे सामान्य माणसांप्रमाणें चालत गेली नाहीं, तर—

**मोतियांचा चुरा फेंकिला अंबरीं ।**
**विजूचियापरी कीळ झालें ॥**
**जरी पीतांबरें नेसविलीं नभा ।**
**चैतन्याचा गाभा नीलबिंदु ॥**
**तळीपरी पसरे शून्याकार जालें ।**
**सर्पाचींही पिलें नाचूं लागे ॥**
**कडकडोनी वीज निमाली ठायींचे ठायीं ।**
**भेटली मुक्ताबाई गोरोबाला ॥**

मुक्ताबाई जेव्हां गोरोबांकडे जाण्यास निघाली तेव्हां आकाशांत जसा मोत्यांचा चुरा फेंकावा किंवा एकदम विजेचा कडकडाट होऊन आकाश प्रकाशमान् व्हावें तसा देखावा दिसला! जणूं काय सगळ्या आकाशाला जरी पीतांबरेंच नेसविलीं आहेत! वरील अभंगांतले 'सर्पाचींही पिलें' हे शब्द कुंडलिनीचे वाचक आहेत. यावरून मुक्ताबाई गोरोबांकडे गेली ती योगविद्येच्या जोरावर आकाशमार्गानें विजेप्रमाणें तळपत गेली असें दिसतें व यावरून योगविद्या तिला चांगलीच अवगत असली पाहिजे असें मानण्यास हरकत नाहीं. असो.

पुढें गोरोबा आल्यावर, त्यांनीं जमलेल्या सर्व संतांच्या डोक्यावर आपलें थापटणें मारून त्यांच्या संतत्वाची कशी परीक्षा केली, नामदेवांच्या डोक्यावर थापटणें बसतांच त्यांना कसें दुःख झालें व त्यामुळें गोरोबांनीं

त्यांना 'कच्चा घट' कसें ठरविलें वगैरे हकीकत प्रसिद्धच आहे. या प्रसंगीं नामदेवांस मुक्ताबाईचाच फार राग आला, कारण ह्या आपल्या अपमानास मुक्ताबाईच कारणीभूत झाली अशी त्यांची समजूत होती. ते तिला म्हणाले, 'मुक्ताबाई, घरीं आलेल्या पाहुण्याचा तूं चांगलाच आदरसत्कार केलास! मला मुद्दाम घरीं बोलावून या थेरड्याकडून लांकडानें माझें डोकें फोडविलेंस! मुक्ते, तुमच्या बाह्य साधुत्वास भुलून मी भोळेपणानें येथें आलों, पण तुम्ही संत नसून शुद्ध कैकाडी आहांत, अशी माझी आतां खात्री झाली.' यावर, नामदेवांस मुद्दाम चिडविण्यासाठीं मुक्ताबाई म्हणाली, " गोरोबा, हा घट तर अगदींच कच्चा दिसतो!

**अभंग**

**अंतर बाहेर भाजूं आम्ही कुंभ। भरूं निरालंब सगळेंचि**
**अहं सोहं दोन्ही ऊर्ध्व लावूं फुंकणी। नव द्वारें फुंकोनी जाळ करूं**
**जीवित्व काढोनी शिव घालूं अंगा। प्रिय पांडुरंगा आवडेल**
**म्हणे मुक्ताबाई पळायाचा पाहीं। आसन स्थिर नाहीं नामयाचें "**

मुक्ताबाईचें 'कुंभ भाजण्या' विषयींचें हें आध्यात्मिक गूढ भाषण नामदेवांस मुळींच समजलें नाहीं. त्यांनीं, कोणाचा निरोप वगैरे न घेतां एकदम पंढरपुरचा रस्ता धरला! असो. अशा रीतीनें नामदेवांचा अभिमान नाहींसा करून त्यांना गुरूपदेश घेण्यास मुक्ताबाईनेंच भाग पाडलें, हें वरील कथेवरून स्पष्ट दिसतें.

पुढें ज्या विसोबा खेंचरांचा उपदेश नामदेवांनीं घेतला ते पूर्वी या चारी भावंडांचा, तीं संन्याशाचीं पोरें म्हणून, फार द्वेष करीत असत. एकदां ज्ञानदेवांनीं मुक्ताबाईस मांडे करण्यास सांगितलें. तेव्हां ती मांडे करण्याचें भांडें मागावयास शेजाऱ्यांकडे गेली. परंतु विसोबा खेंचरांनीं सर्व गांवकऱ्यांस सांगितलें कीं, यांना कोणीही भांडें देऊं नये. तें वर्तमान मुक्ताबाईनें ज्ञानदेवांस येऊन सांगितलें. तेव्हां, असें सांगतात कीं, ज्ञानदेवांनीं योगबलानें आपला जठराग्नि प्रज्वलित केला व त्यामुळें त्यांचें पोट इतकें तापलें कीं त्यावर मुक्ताबाईनें मांडे भाजून काढले!

ज्ञानदेवांच्या चरित्रांत मुक्ताबाईचा उल्लेख प्रसंगवशात् जरी अनेक वेळां आला आहे तरी तिचें स्वतंत्र असें चरित्र उपलब्ध नाहीं. मात्र तिच्या प्रसिद्ध असलेल्या थोड्याशा अभंगांवरून येवढें स्पष्ट दिसतें कीं ती मोठी तेजस्वी, स्पष्टवादी आणि अधिकारवती स्त्री होती. ब्राह्मणांनीं घातलेल्या बहिष्कारामुळें तिचें लग्न झालें नाहीं, म्हणून शेवटपर्यंत आपल्या बंधूंपाशींच राहून त्यांचा ' संसार ' तिनें सांभाळला.

ज्ञानदेवमहाराजांचें अवतारकार्य पुरें होतांच जीवंत समाधि घेण्याचा आपला विचार त्यांनीं व्यक्त केला व शके १२१८ कार्तिक वद्य १३ रोजीं आळंदी येथें ते समाधिस्थ झाले. त्या वेळीं त्यांचें वय २१ वर्षांचें होतें. या समाधिप्रसंगाचें अत्यंत हृदयद्रावक वर्णन नामदेवांनीं ' समाधीचे अभंग ' या प्रकरणांत केलें आहे. ज्ञानदेवांनीं समाधि घेतल्यावर निवृत्ति-नाथांसारख्या स्वस्वरूपलीन महानुभावासदेखील दुःखाचा आवेग आवरतां आला नाहीं, मग सोपान आणि मुक्ताबाई यांच्या मनःस्थितीचें काय वर्णन करावें ? ' आम्हां माता पिता नित्य ज्ञानेश्वर। नाहीं आतां थार विश्रांतीसी ' असें म्हणून तीं स्फुंदस्फुंदून रडूं लागलीं. मग पांडुरंगानें सर्वांचें सांत्वन केलें. यानंतर एक वर्षाच्या आंतच राहिलेल्या तीन्ही भावंडांनीं आपापली इहलोकयात्रा पुरी केली. मार्गशीर्ष वद्य १३ शके १२१८ रोजीं सोपानदेव सासवड येथें समाधिस्थ झाले. तेव्हां ' मार्ग हा मोकळा झाला आम्हां ' असा मुक्ताबाईनें विचार केला. दिवसेंदिवस तिची उदासीनता वाढत चालली. पुढें नामदेवांच्या विनंतीवरून, आपली जन्म-भूमी जें आपेगांव त्याचें शेवटचें दर्शन घेण्यासाठीं निवृत्तिनाथ मुक्ताबाईसह आपेगांवीं गेले. आपल्या पूर्वजांचें तें वास्तव्यस्थान पाहून त्या दोन्ही भावंडांस अगदीं भडभडून आलें.

**" निवृत्ति–मुक्ताईनें पाहूनि स्थळ डोळां ।**
**आलासे उमाळा वोसंडोनी**
**तात आणि माता गेलीसे येथुनी ।**
**तेव्हां आम्ही लहान पांडुरंगा**
**निवृत्ति ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न ।**
**सांभाळी सोपान मजलागीं**

**तुझ्यायोगें हरी क्रमियेलें काळा ।**
**फुटलासे मेळा तापसांचा**
**नामा म्हणे यांचें कळवळलें मन ।**
**करी समाधान पांडुरंग "**

मुक्ताबाईसारख्या कोमल बालिकेचे हे करुणोद्गार कोणत्या सहृदय मनुष्याचा हृदयभेद करणार नाहींत? 'रडे ग्रावा तैसें हृदय अशनीचेंहि उलतें' तें असल्याच प्रसंगांमुळें ! ' हे पांडुरंगा, आमचे आईबाप आम्हांला येथूनच सोडून गेले. तेव्हां आम्हीं अगदीं लहान होतों. निवृत्ति आणि ज्ञानदेव हे कोरान्न भिक्षा मागण्यास जात आणि घरीं सोपान माझा सांभाळ करीत असे. देवा, तुझ्या कृपेनें इतके दिवस सुखांत गेले, पण आतां तो आमचा तापसांचा मेळा फुटला !' कोण हृदयद्रावक उद्गार हे !

आपेगांवाहून निवृत्ति व मुक्ताबाई वेरुळावरून तापीतीरीं माणगांव येथें गेलीं. तेथें शके १२१९ वैशाख वद्य १२ रोजीं भयंकर मेघगर्जना होऊन विजेचा प्रचंड कडकडाट झाला व त्याच वेळीं मुक्ताबाई भगवत्स्वरूपीं विलीन झाली. देवकीच्या उदरीं जन्मलेल्या आदिमायेचे पाय धरून कंस तिला शिळेवर आपटणार तोंच ती त्याच्या हातून निसटून जशी आकाशांत अंतर्धान पावली तद्वत्‌च आदिमायावताररूपिणी मुक्ताबाई बसल्या जागींच एकाएकीं अदृश्य झाली. 'होती ऐसी नाहीं झाली मुक्ताबाई । संत ठायीं ठायीं स्फुंदताती,' असें वर्णन नामदेवमहाराजांनीं केलें आहे. मुक्ताबाई गुप्त झाली त्या ठिकाणापासून दोन मैलांवर तिचें देऊळ बांधलें आहे. आपलीं तीन्ही कनिष्ठ भावंडें थोडक्या दिवसांच्या अंतरानें आपल्या डोळ्यांदेखत दिवंगत झालेलीं पाहून निवृत्तिनाथ अत्यंत उदासीन झाले. पुढें शके १८१९ सालीं, ज्येष्ठ वद्य १२ रोजीं त्र्यंबकेश्वर येथें तेही समाधिस्थ झाले. अशा रीतीनें हीं चारी भावंडें अगदीं अल्पायुषी वारलीं, पण तेवढ्या थोड्याशा आयुष्यांत धर्म आणि वाङ्मय यांच्या बाबतींत त्यांनीं जी महत्त्वाची कामगिरी केली ती महाराष्ट्राच्या इतिहासांत चिरस्मरणीय होऊन राहिली आहे. कर्मठपणाचें बंड मोडून भक्ति, दया आणि समता यांचा फैलाव करण्यासाठीं त्यांनीं आत्मबलिदान केलें असें म्हटलें तरी चालेल.

## मुक्ताबाईची गुरुपरंपरा

### आदिनाथ




वरील परंपरेंत चांगा वटेश्वर ऊर्फ चांगदेव हे मुक्ताबाईचे शिष्य असल्याचें मी लिहिलें आहे तें वाचून पुष्कळांस आश्चर्य वाटेल. पण मुक्ताबाईनेंच आपणास उपदेश दिला असें खुद्द चांगदेवांनींच सांगितलें असल्यामुळें या बाबतींत शंका घेण्याचें कारण नाहीं. खालील अभंग पहा:—

**मी माझें दुरित आशापाश चित्तीं ।**
**मोहो ममता भ्रांति अहंभावें ॥**
**हरितसे तेज अभिमान ताठा ।**
**एकतत्त्वें वैकुंठा हरिपाठें ॥**
**नाशवंत देह पंचतत्त्वमोळी ।**
**वायांच बाहाटुळी उडोनि जाये ॥**
**मुक्ताई जीवन चांगया दिधलें ।**
**निर्गुणीं साधिलें घर कैसें ॥**

"मुक्ताबाईनें चांगया जीवन दिलें," असें वरील अभंगांत स्पष्ट म्हटलें आहे. 'वटेश्वर चांगा मुळीं लागला । पोसणा घेतला मुक्ताईनें,' 'मुक्ताबाई करें लेइलें अंजन । चांगया निधान उपदेशिलें,' इत्यादि उल्लेखांवरून चांगदेवांस मुक्ताबाईचाच अनुग्रह होता हें अगदीं निःसंदेह रीतीनें सिद्ध होत आहे. चांगदेव म्हणजे कोणी सामान्य व्यक्ति नव्हे. योगी या नात्यानें त्यांची योग्यता व प्रसिद्धीही फार होती. अशा पुरुषास ज्ञानोपदेश करण्याची कामगिरी ज्ञानदेवांनीं मुक्ताबाईकडे सोंपविली यावरून तिचा पारमार्थिक अधिकार फार मोठा असला पाहिजे, हें उघड आहे.

मुक्ताबाईनें एकंदर किती कविता लिहिली हें समजण्यास आता कांहीं मार्ग नाहीं. उपलब्ध असलेली तिची कविता अगदींच थोडी आहे. ज्ञानदेवी गाथ्यांत तिचे फक्त ४२ अभंग छापलेले आहेत. यांशिवाय 'ताटीचे अभंग' या नांवाचें एक प्रकरण मुक्ताबाईच्या नांवावर प्रसिद्ध आहे, परंतु तें गाथ्यांत दिलेलें नाहीं, आणि दिले नाहीं तें योग्यच केलें असें मलाही वाटतें. कारण या ताटीच्या अभंगांची भाषा बरीच अर्वाचीन असल्यामुळें ज्ञानदेवभगिनी मुक्ताबाईचे ते अभंग असतील असें वाटत नाहीं. याशिवाय मुक्ताबाईच्या नांवावर आणखी कांहीं अभंग व पदेंही प्रसिद्ध आहेत, परंतु तीं या आद्य मुक्ताबाईचीं नसून दुसऱ्या एखाद्या अर्वाचीन मुक्ताबाईचीं असावींत असें त्याच्या भाषासौलभ्यामुळें म्हणावें लागतें. उदाहरणार्थ 'उलट उलट माघारा प्राण्या फिर गोते खाशी । आला पूर मायेचा लोंढा वाहुनियां जाशी' हें पद पहा. याची रचना अगदींच अर्वाचीन दिसते. असो. आतां आद्य मुक्ताबाईच्या अभंगांपैकीं कांहीं निवडक अभंग येथें देऊन हें चरित्र पूर्ण करूं. मुक्ताबाईची काव्यवाणी तिच्या भावंडांच्या काव्यवाणीइतकीच प्रासादिक, अनुभवपूर्ण आणि प्रेमळ आहे.

१

**प्रकृति निर्गुण प्रकृति सगुण । दीपें दीप पूर्ण एका तत्त्वें ॥**
**देखिलें गे माये पंढरीपाटणीं । पुंडलीका आंगणीं विठ्ठलराज ॥**
**विज्ञानेंसी तेज सज्ञानेंसी निज । निर्गुणेंसी चोज केलें सयें ॥**
**मुक्ताई तारक सम्यक विठ्ठल । निवृत्तीनें चोखाळ दाखविलें ॥**

२

आधीं तूं मुक्तचि होतासि रे प्राणिया ।
परी वासने पापिणीया नाडिलासी ॥
आधींचें आठवीं मग घेई परी ।
हरिनाम जिव्हारीं मंत्रसार ॥ १ ॥
आदि मध्य हरि ऊर्ध्व पैं वैकुंठ ।
जाईल वासना हरि होईल प्रगट ॥ ध्रु० ॥
एकतत्त्व धरीं हरिनाम गोड ।
येर तें कावाड विषयओढी ॥
नाम तें सांडवी वासना पापिणी ।
एक नारायणीं चाड धरीं ॥ २ ॥
मुक्ताई मुक्तलग सांडिली वासना ।
मुक्तामुक्ति राणा हरिपाठें ॥
नामाचेनि घोंटें जळती पापराशी ।
न येसी गर्भवासीं अरे जना ॥ ३ ॥

३

नाममंत्रें हरि निज दासां पावे । आइकोनि ध्यावें झडकरी ॥
सुदर्शन करीं पावे लवकरी । पांडवां सहकारी श्रीकृष्ण रया ॥
निजानंद दावी उघडें पैं वैकुंठ । नामेंचि प्रगट आम्हांलागीं ॥
मुक्ताई जीवन्मुक्त हा संसार । हरि पारावार केला आम्ही ॥

४

भजनभावो देहीं नित्य नाम पैठा । नामेंचि वैकुंठा गणिका गेली ॥
नाममंत्र आम्हां हरि रामकृष्ण । दिननिशी प्रश्न मुक्तिमार्गु ॥
नामचि तारकु तरले भवसिंधु । हरिनामछंदु मंत्रसार ॥
मुक्ताईचिंतनीं हरिप्रेम पोटीं । नित्य नाम घोंटी अमृत सदा ॥

५

पूजा पूज्य वित्तें पूजक पैं चित्तें । घाली दंडवतें भावशीळ ॥
चंपकसुमनें पूजी कातळीनें । धूप दीप मनें मानसिक ॥

भावातीत भावो वोगरी अरावो । पाहुणा पंढरिरावो हरि माझा ॥
मुक्ताई संपन्न विस्तारूनि अन्न । सेवी नारायण हरि माझा ॥

६

व्यक्त अव्यक्तींचें रूपस मोहाचें । एकतत्त्व दीपाचें हृदयीं नांदे ॥
चांगया फावलें फावोनि घेतलें । निवृत्तीनें दिधलें आमुच्या करीं ॥
आदि मध्य यासी सर्वत्रनिवासी । एकरूपें निशि दवडितु ॥
मुक्ताई पूर्णता एकरूपें चित्ता । आदि अंतु कथा सांडियेली ॥

७

मनें मन चोरी मनोमय धरी । कुंडली आधारी सहस्त्रवरी ॥
मन हें वोगरु आदि हरिहरु । करी पाहुणेरु आदिरूपा ॥
साविया विसरु घेसील पडिभरु । गुरुकृपा विरु विरे सदां ॥
मुक्ता मुक्त चित्तें गुरुमार्ग विते । पावन त्वरिते भवीं भाव ॥

८

सर्वरूपीं निर्गुण संचलें पैं सर्वदा । आकार संपदा नाहीं तया ॥
आकारिती भक्त मायामय काम । सर्वत्र निःसीम अंतरीं आहे ॥
निवृत्तीचा उच्छेदु निवृत्ति तत्त्वता । सर्वही समता सांगितली ॥
मुक्ताई अवीट मुक्तपंथरत । जीवीं शिवीं अनंत तत्त्वविद ॥

९

उर्णाचिया गळां बांधली दोरी । पाहों जाय घरीं तंव तंतु नाहीं ॥
तैसें जालें बाई जंव एकतत्त्व नाहीं । दुजी जंव साई तंव हें अंध ॥
ऐसी मी हो अंध जात होतें वायां । प्रकृति सावया पातली तेथ ॥
मुक्ताई सावध करी निवृत्तिराज । हरिप्रेमें उमज एकतत्त्वें ॥

१०

सहस्त्रदळीं हरि आत्मा हा कुसरी । नांदे देहाभीतरीं अलिप्त सदां ॥
रविबिंब बिंबे घटमठीं सदा । तें नातळे पैं कदा तैसें आम्हा ॥
अलिप्त श्रीहरि सेवीं कां झडकरी । सेवितां झडकरी हरीच होआल ॥
चंदनाच्या द्दतीं वेधल्या वनस्पती । तैसें आहे संगतीं या हरिपाठें ॥
मुक्ताई चिंतीत चिंतामणि चित्तीं । इच्छिलें पावती भक्त सदां ॥

११

देउळींचा देवो घरभरी भावो । कळसेंवीण वावो जातु असे ॥
जाताती वाउगे नटनाट्यसोंगें । चित्त-अनुरागें भजती ना ॥
असोनि न दिसे उगेयाचि पिसें । घेती वायां वसे सज्जनेवीण ॥
रावो रंक कोहं न म्हणेचि सोहं । साकारलें अहं न कळे तया ॥
भ्रांतीचेनि भुली वायांचि घरकुली । माया आड ठेली अरे रया ॥
मुक्ताई परेसी दुभते चहूंसी । सत्रावी सर्व रसीं एका देवें ॥

१२

विश्रांति मनाची निजशांति साची । मग त्या यमाची भेटी नाहीं ॥
अधिकारी मन मग सारी स्नान । रोकडेंचि साधन आलें हाता ॥
साधिलें साधन नित्य अनुष्ठान । चित्तीं नारायण मंत्र जपे ॥
मुक्ताई प्रवीण नारायण धन । नित्य मंत्रें स्नान करी वेगीं ॥

१३

मुक्तपणें सांग देवो होय देवांग । मीपणें उद्वेग नेघे रया ॥
वाउगें मीपण आथिलें प्रवीण । एक नारायणतत्त्व खरें ॥
मुक्ता मुक्ति दोन्ही करिं कां रे शिराणी । द्वैताची काहाणी नाहीं तुज ॥
मुक्ताई अद्वैत द्वैतीं द्वैतातीत । अवघाचि अनंत दिसे देहीं ॥

१४

अंतर्बाह्य निकें सर्व इंद्रियांचें चोज । निर्जी निजबीज एकतत्त्व ॥
आदि नाहीं अनादि नाहीं । तें रूप पाहीं अवीट बाईये ॥
मुक्ताई संजीवन तत्त्वता निर्गुण । आकार सगुण प्रपंचींचा ॥

१५

नामबळें देहीं असोनियां मुक्त । शांति क्षमा चित्त हरिभजनीं ॥
दया धरा चित्तीं सर्व भूतीं करुणा । निरंतर वासना हरिरूपीं ॥
माधव मुकुंद हरिनाम चित्तीं । सर्व पैं मुक्ति नामपाठें ॥
मुक्ताईचें धन हरिनामउच्चारु । अवघाचि संसारु मुक्त केला ॥

१६

मुक्तपणें ब्रीद बांधोनियां द्विज । नेणती ते बीज केशव हरि ॥
ज्याचेनि मुक्तता सर्वही पैं मुक्त । करूनियां रत न सेविती ॥
वेदीं बोलियेलें ब्रह्मार्पणभावें । सदा मुक्त व्हावें अरे जना ॥
मुक्ताई मुक्त हरिनाम सेवित । अवघेचि मुक्त सेवितां हरि ॥

१७

मुक्तामुक्तकोडें पाहिलें निवाडें । ब्रह्मांडाएवढें महत्तत्त्व ॥
निजतत्त्व आप अवघाचि परिपाक । एका रूपें दीपक लावियेला ॥
आदिमध्य निजनिर्गुण सहज । समाधि निजतेज आत्मारामु ॥
मुक्ताईचें धन आत्मारामगुण । देखिलें निधान हृदयघटीं ॥

१८

निर्गुणाची सेज सगुणाची बाज । तेथें केशीराज पहुडले ॥
कैसें याचें करणें दिवसां चांदिणें । सावळें उठणें एका तत्त्वें ॥
नाहीं या ममता अवघीच समता । आदि अंतु बिंबतां न लगे वेळु ॥
मुक्ताई सघन सर्वत्र नारायण । जीव शिव संपूर्ण एकतत्त्वें ॥

१९

दिवसा शीतळ निशीयेसी बरळ । अध ऊर्ध्व केवळ निजबीज ॥
या आदि नाहीं अनादिही नाहीं । कैंचा मोहप्रवाहीं दिसेचिना ॥
शक्तीचे संपुष्टीं मुक्तामुक्त घट । अवघें वैकुंठ दिसताहे ॥
मुक्ताई परिपाक अवघें रूप एक । देखिलें सम्यक सोहंभावें ॥

२०

मुक्तलग चित्तें मुक्त पैं सर्वदा । रामकृष्ण गोविंदा वाचे नित्य ॥
हरिहरि छंदु तोडी भवकंदु । नित्य नामानंदु जपे रया ॥
सर्वत्र रूपडें भरलेंसे दृश्य । ज्ञाता ज्ञेय भासे हरिमाजी ॥
मुक्ताई सघन हरिरूप चित्तीं । संसारसमाप्ति हरिच्या नामें ॥

२१

प्रारब्ध संचित आचरण गोमटें । निवृत्तितटाकें निघालों आम्ही ॥
मुळींचा पदार्थ मुळींच पैं गेला । परतोनि अबोला संसारासी ॥

सत्य मिथ्याभाव सस्वर फळला । हृदयीं सामावला हरिराज ॥
अव्यक्त आकार साकार हे स्फूर्ति । जीवें शिवप्राप्ति ऐसें केलें ॥
सकाम निष्काम वृत्तीचा निजफेर । वैकुंठाकार दाखविलें ॥
मुक्तलग मुक्त मुक्ताईचें तट । अवघेंचि वैकुंठ निघोट रया ॥

२२

शांति क्षमा वसे देहीं देव पैसे । चित्त समरसें मुक्तमेळु ॥
निर्गुणें उपरमु देव पुरुषोत्तमु । प्रकृतिसंगमु चेतनेचा ॥
सज्ञानी दिवटा अज्ञानी तो पैठा । निवृत्तीच्या तटा नेतु भक्ता ॥
मुक्ताई दिवस अवघा हृषीकेश । केशवेंवीण वास शून्य पैसे ॥

२३

मुंगी उडाली आकाशीं । तिणें गिळिलें सूर्यासी ॥
थोर नवलाव जाला । वांझे पुत्र प्रसवला ॥
विंचू पाताळासी जाय । शेष वंदी त्याचे पाय ॥
माशी व्याली घार जाली । देखुनि मुक्ताई हांसली ॥

वरील अभंगांच्या भाषेवरून, हे अभंग ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेव याची भगिनी मुक्ताबाई हिचेच असले पाहिजेत असें म्हणण्यास बिलकुल प्रत्यवाय नाहीं. 'उपरमु,' 'पैठा,' 'पैसु,' 'बरळ,' 'रया,' 'आथिलें,' 'सावया,' 'पैसे,' 'अरावो,' 'दवडितु' इत्यादि जुने शब्द व 'उच्छेदु,' 'पाहुणेरु,' 'संसारु,' 'उचारु,' 'पुरुषोत्तमु' वगैरे पुल्लिंगी अकारान्त शब्दांचीं उकारान्त रूपें, या अभंगांची भाषा ज्ञानेश्वरी-कालीन असल्याचें सिद्ध करितात. वरील अभंगांत मुक्ताबाईनें 'मुक्ताई' या शब्दानेंच सर्वत्र स्वनामनिर्देश केला आहे, अर्थात् ज्या कवितेच्या शेवटच्या चरणांत 'मुक्ताबाई' हें नांव येत असेल ती कविता या आद्य मुक्ताबाईची नव्हे हे उघड आहे. मुक्ताबाईनें शेंकडों अभंग रचले असले पाहिजेत, परंतु दुर्दैवानें गेल्या सहाशें वर्षांत ते गहाळ होतां होतां, त्यांतले फक्त ४२ च अभंग शिल्लक राहिले व पाठांतरामुळें व लेखकप्रमादामुळें त्यांचेंही मूळचें शुद्ध स्वरूप आज कायम राहिलेलें नाहीं. यामुळें कांहीं अभंगांचा चांगलासा अर्थ लागत नाहीं. कांहीं अभंग निव्वळ वेदांतपर

व योगशास्त्रपर असल्यामुळें, वेदांताची व योगशास्त्राची माहिती असल्या-शिवाय त्यांचाही अर्थ कळणें कठीण आहे. वरील अभंगांतील ‘ सर्वत्र समता सागितली, ’ ‘ शांति क्षमा चित्त हरिभजनीं, ’ ‘ दया धरा चित्तीं सर्व भूतीं करुणा, ’ ‘मुक्तपणें ब्रीद बांधोनियां द्विज । नेणती ते बीज केशव हरि ’ इत्यादि उद्गारांवरून, तत्कालीन कर्मठपणाविरुद्ध या चारी भावंडांनीं कसें बंड उभारलें होतें, याची थोडीशी कल्पना होते.

चांगदेवांच्या बहुतेक अभंगांत मुक्ताबाईचा उल्लेख आला आहे. पुढील अभंग पहाः—

१ **चांगा जन्मला माध्यान्हकाळीं । मायबापें दोन्ही नाहींशीं जालीं ॥**
**मुळींच चांगा नाहींसा जाला । मुक्ताई म्हणे चांगया भला भला ॥**
**वटेश्वर चांगा मुळीं लागला । पोसणा घेतला मुक्ताईनें ॥**

२ **वऱ्हाडी आले संसारनगरा । चांगा तो नोवरा केळवला ॥**
**हातीं कांकण उभा वटेश्वरीं । शांति हे नोवरी पर्णावया ॥**
**पर्णिली शांति बैसला पाटीं । मुक्ताई करवली हळदुली वाटी ॥**

गाथ्यात चांगदेवांचे म्हणून जे ४०।५० अभंग दिले आहेत त्यांतले कांहीं अभंग चांगदेवांचे नसून मुक्ताबाईचे असावेत असें वाटतें. वरील दोन अभंगही कदाचित् मुक्ताबाईचेच असतील. मागें ज्या ‘ ताटीच्या अभंगां ’ चा उल्लेख केला आहे त्यांतले पांच अभंग येथें देतों, ते वाचकांनीं वरील अभंगांशीं ताडून पहावे, म्हणजे त्यांच्या भाषेच्या अर्वाचीनत्वावरून, ते ज्ञानदेव–भगिनी मुक्ताबाईचे नसून, मागाहून कोणी तरी रचले असले पाहिजेत, हें त्यांच्या लक्षांत येईल.

१ **योगी पावन मनाचा । साही अपराध जनांचा १**
**विश्व रागें झालें वन्ही । संतें सुखें व्हावें पाणी २**
**शब्दशस्त्रें झाले क्लेश । संतीं मानावा उपदेश ३**
**विश्वपट ब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ४**

२ **संत तेचि जाण जगीं । दया क्षमा ज्यांचे अंगीं १**
**लोभ अहंता नये मना । जगीं विरक्त तेचि जाणा २**
**इहपरलोकीं सुखी । शुद्ध ज्ञान ज्यांचे मुखीं ३**
**मिथ्या कल्पना मागें सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ४**

३ एक आपण साधु झाले । येर कोण वायां गेले १
उठे विकार ब्रह्मीं मूळ । अवघें मायेचें गाबाळ २
माया समूळ नुरे जेव्हां । विश्व ब्रह्म होइल तेव्हां ३
ऐसा उमज आदिअंतीं । मग सुखी व्हावें संतीं ४
चिंता क्रोध मागें सारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ५

४ ब्रह्म जैसें तैशापरी । आम्हां वडील भूतें सारीं १
अहो क्रोधें यावें कोठें । अवघे आपण निघोटे २
जीभ दांतांनीं चाविली । कोणें बत्तीशी तोडिली ३
मन मारुनि उन्मन करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ४

५ शुद्ध ज्याचा भाव झाला । दुरी नाहीं देव त्याला १
अवघी साधनहातवटी । मोलें मिळत नाहीं हाटीं २
कोणी कोणा शिकवावें । सार शोधूनियां घ्यावें ३
लडीवाळ मुक्ताबाई । जीव मुद्दल ठायींचे ठायीं ४
तुम्ही तरुनी विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ५

या अभंगांत फक्त एकदांच मुक्ताबाईचें नांव आलें आहे व तेंही 'मुक्ताबाई' म्हणून; 'मुक्ताई' म्हणून नव्हे. मुक्ताबाईच्या इतर सर्व अभंगांत 'मुक्ताई' हें नांव आहे. मुक्ताबाईचें मूळचें नांव 'मुक्ताई' च असावे, असें राजाई, गोणाई, साकराई वगैरे तत्कालीन इतर नांवांवरून दिसते. मागाहून 'मुक्ताई' चें 'मुक्ताबाई' झालें. यावरूनही 'ताटीचे अभंग' मुक्ताबाईचे नव्हत हेंच सिद्ध होतें. एकदां ज्ञानदेवमहाराजांचा कोणी तरी अपमान केल्यामुळें, किंवा अन्य कांहीं कारणानें त्यांना राग येऊन ते आपल्या झोंपडींत जाऊन, दार बंद करून बसले. तेव्हां मुक्ताबाईनें त्यांना उपदेश करून दार उघडावयास लाविलें अशी या 'ताटीच्या अभंगां' तली कल्पना आहे. परंतु ज्ञानदेव खरोखरच कोणावर तरी रागावले असतील आणि मुक्ताबाईनें त्यांना उपदेश केला असेल हेंच मुळीं संभवनीय दिसत नाहीं. तथापि उपदेशदृष्ट्या हे ताटीचे अभंग फार सुंदर आहेत यांत मात्र संशय नाहीं.

# जनी

**हरिहरजनपदभजनें प्रकटी अद्भुत रुचिप्रभाव जनी ।**
**स्पष्ट महासत्याधिका भरलीच इची शुचिप्रभा वजनीं ॥**

—सन्मणिमाला, मोरोपंत

महाराष्ट्रांत जुन्या काळीं ज्या अनेक कवयित्री होऊन गेल्या व ज्यांचीं चरित्रें प्रस्तुत ग्रंथांत मी देत आहे त्या सर्वांत जनाबाईच्याइतकी प्रसिद्धी दुसऱ्या कोणत्याही कवयित्रीची नाहीं. तुकारामशिष्या बहिणाबाई व समर्थ-शिष्या वेणाबाई यांची कविता विपुल आहे; परंतु जनाबाईप्रमाणें सर्वतोमुखीं नांव होण्याचें भाग्य त्यांच्या वांट्यास आलें नाहीं. जनाबाई उच्च जातींत जन्मलेली नव्हती, तिच्या ठायीं फारशी व्युत्पन्नताही नव्हती, व तिची वृत्ति तर दासीची होती, परंतु तिनें आपल्या अतुल भक्तिबलानें जी भगवत्कृपा संपादन केली तिच्या योगानें तिच्या कवितेंत जो प्रेमळपणा आणि प्रासादिक-पणा आला आहे त्यामुळेंच ती कविता आज सहाशें वर्षे महाराष्ट्रांत इतकी लोकप्रिय होऊन राहिली आहे. अभंग रचणाऱ्या सर्व जुन्या कवींत जी योग्यता तुकारामबुवांची तीच अभंग रचणाऱ्या सर्व संत–कवयित्रींत जना-बाईची. अशी ही भाग्यवती जनाबाई मूळची कोठली, तिची जात कोणती, तिचे पूर्वज कोण होते, तिचा जन्ममृत्युकाल कोणता, तिनें एकंदर किती कविता लिहिली, ती समाधिस्थ कोठे झाली, ती विवाहित होती कीं काय, असल्यास तिच्या पतीचें नांव काय व तिला मुलेंबाळें किती होतीं इत्यादि बाबतींत कोठेंच कांहीं विश्वसनीय माहिती मिळत नाहीं, ही मात्र आश्चर्याची गोष्ट आहे. संतचरित्रकार महीपतिबुवांनीं नामदेवचरित्रानुषंगाने जनाबाईची थोडी तरी हकीकत नमूद करून ठेवली आहे म्हणून माझ्यासारख्यास ह्या चार ओळी तरी लिहितां येत आहेत, नाहीं तर ' जनी ' ह्या नामोल्लेखापली-कडे जनाबाईविषयीं एक शब्ददेखील लिहितां येणें जवळजवळ अशक्य होतें. अस्तु.

जनीविषयीं महीपतींनीं जी माहिती दिली आहे ती येणेंप्रमाणें:—गोदा-तीरीं गंगाखेड नामक एक गांव आहे. तेथें दमा या नांवाचा एक शूद्र

महाभगवद्भक्त होता. त्याच्या पत्नीचें नांव करुंड. तीही मोठी पतिव्रता होती. दमा प्रत्येक वारीस पंढरीस जात असे. असा क्रम पुष्कळ वर्षे चालला होता. परंतु संतति नसल्यामुळें दमा व करुंड हीं जरा खिन्न असत. एकदां तीं पंढरीस गेलीं असतां, "आम्हांस पुत्र व्हावा," अशी पांडुरंगाची त्यांनीं प्रार्थना केली. त्या रात्रींच दमा निद्रित असतां त्याला स्वप्नांत असा दृष्टांत झाला कीं, तुला पुत्र कांहीं होणार नाहीं, पण एक कन्या फार सद्गुणी होईल व ती तुझ्या कुळाचा उद्धार करील. ती कन्या कृतयुगांत पद्मिनी, त्रेतायुगांत मंथरा, द्वापारयुगांत कुब्जा होती; तीच तुझ्या उदरीं येईल. तिचे नांव जनाबाई असें ठेव व नामदेवचरित्राशीं तिचा संबंध यावयाचा असल्यामुळें नामदेवाचा बाप दामशेट यास ती अर्पण कर."

कालांतरानें दमाची स्त्री करुंड ही गर्भवती होऊन नऊ मास भरतांच प्रसूत झाली. कन्या झाली तिचें नांव 'जनाबाई' असें ठेविलें. ती कन्या पांच सात वर्षांची होतांच दमानें तिला दामशेटींकडे नेऊन त्यांच्या स्वाधीन केलें. पुढें दामशेटींनीं तिचें कन्येप्रमाणें पालन केलें. ती जरी स्वतःस "दासी जनी" म्हणविते तरी दामशेटींच्या घरीं ती कुटुंबांतल्या इतर माणसां-प्रमाणेंच वागत असे. दामशेटींचें घराणें पूर्वापार वारकरी सांप्रदायी असल्यामुळें त्या घराण्यांतील माणसांच्या, विशेषतः नामदेवांच्या, सहवासानें जनाबाई मोठी भगवद्भक्त निपजली. प्रत्यक्ष नारदमुनींनीं तिला मंत्रोपदेश दिला अशी आख्यायिका आहे.

ज्यांच्या घरीं जनाबाई ही दासी होती ते नामदेव हल्लींच्या मोगलाईतील परभणी जिल्ह्यांतल्या नरसी ब्राह्मणी या गांवचे रहिवासी. जनाबाईचें गंगाखेड हें गांवही त्याच बाजूस आहे. जनाबाईच्या बापाचें दमा हें नांव महाराष्ट्रीय आहे पण तिच्या आईचें 'करुंड' हें नांव जरा चमत्कारिक दिसतें. कदाचित् त्या वेळीं खालच्या वर्गांतील लोकांत असलीं नांवें ठेवण्याची चाल असेल. जनाबाईच्या चरित्रांत जे अनेक चमत्कार घडल्याचा उल्लेख आहे ते चमत्कार पंढरपुरांत घडले अशी लोकांची समजूत आहे पण ती सर्वांशीं बरोबर नाहीं. कारण नामदेव हे पंढरपुरांत कायमचे कधींच राहिले

नव्हते; आषाढी आणि कार्तिकी एकादशीच्या वारीस मात्र ते वर्षांतून दोनदां पंढरीस नियमानें जात असत व त्या प्रत्येक वारीच्या वेळीं तेथें त्यांचा बरेच दिवस मुक्काम असे. अर्थात् जनाबाईही त्यांजबरोबर पंढरपुरास जात असे.

जनाबाईच्या उपलब्ध असलेल्या अभंगांवरून हें स्पष्ट दिसतें कीं, ती पांडुरंगाची अगदीं निःसीम उपासिका होती, व पांडुरंगाचीही तिजवर पूर्ण कृपा होती. कारण तसें असल्याशिवाय, दासीवृत्तीनें राहणाऱ्या जनीसारख्या शेतकरी वर्गांतल्या निरक्षर स्त्रीच्या कवितेंत इतका प्रसाद आणि इतका प्रेमळपणा येणें शक्य नाहीं. जनाबाईसाठीं देवानें केलेले अनेक चमत्कार महीपतींनीं व इतर जुन्या कवींनीं आपल्या कवितेंत वर्णिले असून खुद्द जनाबाईच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या कांहीं अभंगांतही अशा चमत्कारांचा उल्लेख आढळतो.

एके दिवशीं रात्रीच्या वेळीं फार वारा सुटला व जोराचा पाऊस पडूं लागला, तेव्हां नामदेवांची चंद्रमौळी झोंपडी वाऱ्यानें उडून गेली. झोंपडींत नामदेवांच्या घरचीं सगळीं माणसें निजलीं होतीं. पांडुरंगानें त्याच्या संरक्षणार्थ आपलें सुदर्शन पाठविलें व मागाहून स्वतः येऊन त्यांची झोंपडी पूर्ववत् बांधून दिली. देवास फार श्रम झाले म्हणून जनी त्याची पाठ रगडीत बसली होती. जनीचा भक्तिभाव पाहून देव इतका संतुष्ट झाला कीं,

**“ दळण कांडण धुणें धुवोनी पांटी डोईवरी ।**
**गंवऱ्या वेंचुन आणी घरीं ॥ ”**

अशा प्रकारें जनीला त्यानें साहाय्य केलें. एकदां देवाचा पीतांबर आणि पदक चोरल्याचा आळ जनीवर आल्यामुळें तिला सुळीं देण्यास नेलें असतां, तिनें पांडुरंगाचा धांवा करितांच सुळाचें पाणी झालें !

जनाबाईच्या नांवावर गाथ्यांत छापलेल्या अनेक अभंगांत नामदेवांच्या कांहीं चमत्कारांचा उल्लेख आलेला आहे. उदाहरणार्थ पुढील अभंग पहा :—

१

**आषाढी एकादशी । नामा होता उपवासी ॥**
**देवें गरुड धाडिला । वेगीं बोलाविलें त्याला ॥**

राही म्हणे पांडुरंगा । कोणी बोलाविलें सांगा ॥
ऐसा भक्तराज निका । दासी जनीचा आत्मसखा ॥

२

पूर आला पंढरीसी । पाणी लागे पायरीसी ॥
संतजन हो मिळाले । उठुनी नाम्याजवळी गेले ॥
नामा सांगे विठोबासी । उतार द्यावा भिंवेरसी ॥
दीनवत्सल महाराज । जनी म्हणे केलें काज ॥

३

सण दिवाळीचा आला । नामा राऊळासी गेला ॥
हातीं धरूनी देवासी । चला आमुच्या घरासी ॥
देव तेथूनि चालिले । नामयाच्या घरा आले ॥
गोणाईनें उटणें केलें । दामशेटीनें स्नान केलें ॥
पदर काढिला माथ्याचा । बाळ पुशिला नंदाचा ॥
हातीं घेऊनि आरती । चक्रपाणी ओवाळिती ॥
जेऊनियां तृप्त झाले । दासी जनीनें विडे दिले ॥

४

वोढिला ताडिला । देव भक्तीनें फाडिला ॥
एका प्रेमा नामासाठीं । भक्तीं काढियला कंठीं ॥
झाला नाम्याचा मजूर । मोळ्या बांधाव्याचा थर ॥
भिंती चांदया रचिले । त्याचें छप्पर शेकारिलें ॥
वरी सोडुनियां पाणी । धन्य भक्ता म्हणे जनी ॥

५

गरुडपारापाशीं । नामा उभा कीर्तनासी ॥
येऊनियां पांडुरंग । ताल स्वयें धरीं अंगें ॥
नाचूं लागे बरोबरी । नाहीं सांगायाची उरी ॥
शब्द देवाचा उमटला । दासी जनीनें ओळखिला ॥

या अभंगांची एकंदर रचना भाषेचें, अर्वाचीनत्व व मजूर, छप्पर, बरोबरी इत्यादि शब्दांचा भरणा लक्ष्यात घेतां, सहाशें वर्षांपूर्वी होऊन

गेलेल्या जनीचे हे अभंग असतील असें वाटत नाहीं. शिवाय हे व या प्रकारचे इतर अभंग नामदेवांच्या घरच्या जनीचे नव्हत, याला आणखी एक महत्त्वाचा पुरावा आहे तो असा. नामदेवांचे गुरु विसोबा खेचर ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे; खुद्द नामदेवांनींही स्वतःचे गुरु म्हणून खेचरांचाच उल्लेख केला आहे. असें असतां जनीच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या एका अभंगांत **सोपान** हे नामदेवांचे गुरु होते अशी विचित्र माहिती दिली आहे. पुढील अभंग पहा:—

**माझ्या नामयाचा गुरु। तो हा सोपान सद्गुरु ॥**
**कऱ्हातीरीं करूनी वस्ती। ब्रह्मपुरी तीसी म्हणती ॥**
**माझ्या जीवींच्या जीवना। हृदयीं राहें तूं सोपाना ॥**
**विश्व उद्धवे ज्याची सत्ता। जनी म्हणे माझ्या ताता ॥**

त्यांचे व आपले स्वतःचे अवतार पूर्वी कधीं व कोठें झाले याचीही या जनीनें एका अभंगांत दिली आहे:—

**हिरण्यकश्यपाचे कुळीं नामा प्रल्हाद।**
**पद्मिणी नाम माझें श्रेष्ठ दासीचें पद ॥**
**दुसरा जन्म त्याचा अंगद रामभक्त।**
**मंथरा नाम माझें माथां दिधली लाथ ॥**
**गोकुळीं कृष्णासवें जन्मला उद्धव।**
**कुब्जा नाम माझें उद्धरिलें स्वभावें ॥**
**कलींत नामदेव विठ्ठलचिंतनीं।**
**त्याचे सेवेसाठीं दासी जन्मली जनी ॥**

म्हणजे, नृसिंहावतारीं नामदेव हे प्रल्हाद असून जनी ही त्याचे घरीं पद्मिनी नामक दासी होती. रामावतारीं नामदेव हे अंगद व जनी ही मंथरा होती. कृष्णावतारांत नामदेव हे उद्धव असून जनी ही कुब्जा होती व कलियुगांत नामदेव हे नामदेव व जनी ही त्यांची दासी आहे! रामावतारीं रामाचा द्वेष करणारी आणि त्याला वनवासास पाठविणारी दुष्ट मंथरा कृष्णावतारीं कुब्जा व कलियुगांत जनी होतांच इतकी साळसूद कशी झाली हें एक मोठें कोडेंच आहे. शिवाय मंथरेच्या माथ्यावर

अंगदानें किंवा दुसऱ्या कोणी कधीं लाथ मारली होती अशी कथा ऐकिवांत नाहीं. तात्पर्य, हे व अशा प्रकारचे इतर अभंग अगदीं बनावट आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अभंगवृत्तांत कविता रचणारे ज्ञानदेव, नामदेव, गोरा कुंभार, चोखामेळा, एकनाथ, मुक्ताबाई, जनी, विसोबा खेचर, तुकाराम इत्यादि बहुतेक संतांच्या प्रसिद्ध असलेल्या गाथ्यांत असले बनावट अभंग पुष्कळच सांपडतात.

जनीच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या ३०० अभंगांत बनावट अभंगांचा भरणा बराच मोठा आहे असें जें वर म्हटलें आहे त्याचें आणखी प्रत्यंतर पहा :—

जनाबाईकृत द्रौपदीवस्त्रहरणाच्या अभंगांत पुढील अभंग आहे—

**नष्ट बोले दुर्योधन । बैस मांडीवरी म्हणे ॥**
**भोग विलास सदनीं । तुज करीन पट्टराणी ॥**
**शब्द प्रत्यक्षचि बाण । अंगीं खडतरे दारुण ॥**
**म्हणे काय खळा । दुष्ट दुर्जना कंस खळा ॥**
**जळो जळो तुझी वाणी । विष्टा भक्षिसी कां जनीं ॥**
**वीज कडकडुनि माथां । पडो दुष्टा तुझ्या आतां ॥**
**दृष्टि झडो रे पापिया । प्राणें विघडो तुझी काया ॥**
**गुणलावण्यसुंदरी । गदा शोभे भीमाकरीं ॥**
**तुज नवरी साजे सांग । तुझें निववील सर्वांग ॥**
**बहुलें तें रणचत्वारीं । आयुष्य अंतरपाट धरी ॥**
**रक्त हळदीचें लेपन । माथां अक्षता तेच बाण ॥**
**अचूकभेदें रक्त भाळीं । तेचि मळवट्ट कपाळीं ॥**
**स्त्रिया आक्रंदती भारी । तेंचि वाद्य नाना परी ॥**
**रुदन करिती सकळ । सुखें भोगिसी सोहळे ॥**
**रणमंचक शेजेवरी । पहुडें तुझे मांडीवरी ॥**
**परते करूनि प्राणांतें । सुखें सेवीं कां एकांत ॥**
**जागा न होसी कोणे काळें । सुखें भोगीं सर्व काळ ॥**

आतां हा अभंग, मुक्तेश्वरकृत सभापर्वांतील द्रौपदीवस्त्रहरणाध्यायांतल्या खालील ओव्यांशीं ताडून पहा म्हणजे असें स्पष्ट दिसून येईल कीं, सदर अभंग म्हणजे मुक्तेश्वरी ओव्यांचें वेडेंवांकडें शब्दांतर आहे:—

**हें देखोनि दुराचारी । म्हणे ' वो द्रुपदाचे कुमरी ।**
**येऊनि बैसें मांडीवरी । होईं अंतुरी पट्टाची ' ॥**
**पापशब्द पडतां कानीं । हृदयीं धडकला क्रोधाग्नि ।**
**म्हणे ' दुरात्मिया ही वाणी । जळो तुझी पापिष्टा ॥ ११० ॥**
**प्रळयवीज माथां पडो । दृष्टि जळोनि जिव्हा झडो ।**
**कायेपासूनि प्राण विघडो । तात्कालिक पैं तुझा ॥ १११ ॥**
**भीमाकरीं जे केळवली । गदा नोवरी सुगुणाथिली ।**
**वाग्निश्चयें तुज नेमिली । गोत्रघटित निर्धारें ॥ ११२ ॥**
**बाहुलें योजिलें रणतळवट । आयुष्यअवधीचा अंत्रपाट ।**
**हातें सारूनि बळी वरिष्ठ । लग्न लावील स्वहातें ॥ ११३ ॥**
**रक्तहरिद्रा तनुलेपनीं । माथां अक्षता पायपिटणी ।**
**स्त्रियाप्रलाप वाद्यध्वनी । सुखसोहळा भोगिसी ॥ ११४ ॥**
**ते गदा घेऊनि मांडीवरी । रणमंचकीं निद्रा करीं ।**
**प्राण पारखे दवडूनि दुरी । मग एकांतीं पहुडें कां " ॥ ११५ ॥**

—मुक्तेश्वरी सभापर्व, अध्याय १५ वा.

आतां यावर कोणी असा आक्षेप घेईल कीं जनाबाई ही मुक्तेश्वरांपूर्वी होऊन गेलेली असल्यामुळें तिच्याच कवितेंतील कल्पना मुक्तेश्वरांनीं कशावरून उचलल्या नसतील? हा कोटिक्रम सकृद्दर्शनीं निरुत्तर करणारा दिसतो खरा, पण समग्र महाभारतावर कविता करणारा मुक्तेश्वरासारखा महाकवि, जनाबाईच्या नांवावर घुसडून दिलेल्या या अप्रसिद्ध द्रौपदीवस्त्रहरणाख्यानांतील कल्पना आपल्या ग्रंथांत उतरून घेईल हें मला तरी निदान बिलकुल संभवनीय दिसत नाहीं.

देवानें मला न्हाऊं घातलें, माझें दळणकांडण केलें, माझ्याबरोबर गाणें गायिलें, इत्यादि गोष्टींचा ज्या अभंगांत उल्लेख आलेला आहे तेही अभंग जनाबाईचे असतील असें मला वाटत नाहीं. असो.

जनाबाईनें रचलेले अभंग खुद्द पांडुरंगानें लिहून काढले अशी कथा आहे. एके दिवशीं देव जनाबाईची कविता लिहीत बसला असतां ज्ञानदेव दर्शनास येत असल्याचें ऐकून त्यानें कागद लेखणी लपवून ठेवली. तें अंतर्साक्ष ज्ञानदेवांनीं जाणून देवास विचारलें, ‘देवा, आपलीच स्तुति आपल्याच हातानें लिहीत बसतां हें आश्चर्य आहे.’ देव म्हणाला, ‘ज्ञानोबा, मला जनाईचें गाणें अतिशय आवडल्यामुळें मी तें लिहीत बसलों होतों.’ नंतर देव आणि ज्ञानोबा नामदेवांचे घरीं आले. तेथें अगोदरच सांवता माळी, गोरा कुंभार, परिसा भागवत, चोखामेळा इत्यादि संतमंडळी येऊन बसली होती. त्या वेळीं जनाबाई माळावर गोंवऱ्या वेंचण्यास गेली होती. देवानें जनाबाईस बोलावणें पाठविलें. देव आल्याचें वर्तमान तिला समजतांच तिनें धांवत येऊन देव-भक्तांचें दर्शन घेतलें. नंतर देव म्हणाला, ‘ज्ञानोबा, जनाबाईचें कवित्व उतरून काढण्याची कामगिरी मी स्वतःकडे घेतली आहे. इतर संतांच्या लेखकांचें काम कोणी कोणी करावें हें आतां सांगतों :—

**ओव्या**

**‘ज्ञानेश्वराचीं शब्दरत्नें । तीं सच्चिदानंद लिहील ब्राह्मण ।**
**निवृत्तीचा लेखक सोपान । जो अवतार पूर्ण विधीचा ॥**
**आणिक मुक्ताबाईचे अभंग । ज्ञानदेव लिहितील निजांगें ।**
**जोगा परमानंद अंतरंग । त्याचे विसोबा खेचर लिहीतसे ॥**
**सांवता माळी भक्त वैष्णव । त्याचा लेखक काशिबा गुरव ।**
**कूर्मदेवाचा काईत सुदेव । देवाधिदेवें नेम केला ॥**
**अनंतभट ब्राह्मण । तो चोखामेळ्याचें करील लेखन ।**
**आणि नामया-जनीचें बोलणें । रुक्मिणीरमण लिहीतसे’ ॥**
**ऐसी करून दिधली वांटणी । मग ज्ञानदेवासी म्हणे चक्रपाणी ।**
**‘आतां जनीचे अभंग ऐकतां कानीं । संकोच मनीं न धरावा’ ॥**

—भक्तविजय, अध्याय २२ वा.

या कथाभागांतील अतिशयोक्तीचा भाग जरी वजा केला तरी त्यावरून तत्कालीन संतमंडळांत जनाबाईची योग्यता फार मोठी होती येवढा निष्कर्ष काढण्यास हरकत नाहीं.

जुन्या ग्रंथात जनाबाईचा समाधिकाल आषाढ वद्य १३ शके १२७२ हा दिला आहे. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, नामदेव, विसोबा खेचर, चोखामेळा, परिसा भागवत, सांवता माळी, गोरा कुंभार, जोगा परमानंद, कूर्मदास हे सर्व संत जनाबाईचे समकालीन होत.

नामदेवांनीं शतकोटि अभंग लिहिण्याची प्रतिज्ञा करून आपल्या कुटुंबातील माणसांच्या अभंगांसुद्धा त्यांनीं एकंदर ९६ कोटी अभंग पुरे केले व त्यांत जनीचे अभंग साडेबारा कोटी होते अशी आख्यायिका आहे, परंतु ती अगदींच असंभवनीय कोटींतली दिसते. जनाबाईने फार तर हजार बाराशे अभंग रचले असतील आणि हल्लीं तिच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या अभंगांची संख्या फक्त ३०० च आहे, आणि या ३०० अभंगांतही खुद्द जनीचे अभंग फारच थोडे असून बनावट अभंगांचाच भरणा मोठा आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. जनाबाई ही जरी ज्ञानदेव-समकालीन होती तरी तिच्या अभंगांत जुने कठिण शब्द फारसे नाहींत; तिच्या अभंगांची भाषा बरीच सोपी आहे. बहुतेक अभंगांत भगवत्प्रेमरस नुसता उचंबळून राहिला आहे.

आतां माझ्या समजुतीप्रमाणें खुद्द जनाबाईचेच असे २५ निवडक अभग येथें देऊन हा संक्षिप्त लेख पुरा करितो.

१

**ये ग ये ग विठाबाई । माझे पंढरीचे आई १**
**भीमा आणि चंद्रभागा । तुझे चरणींच्या गंगा २**
**इतुक्यांसहित त्वां बा यावें । माझे रंगणीं नाचावें ३**
**माझा रंग तुझे गुणीं । म्हणे नामयाची जनी ४**

२

**नोवरियासंगें वऱ्हाडियां सोहळा ।**
**मांडे पुरणपोळया मिळे अन्न १**
**परीसाचेनि संगें लोहो होय सोनें ।**
**तयाचीं भूषणें श्रीमंतांसी २**
**जनी म्हणे जोड झाली विठोबाची ।**
**दासी नामयाची म्हणोनियां ३**

३

आंधळ्याची काठी । अडकली कवणें बेटीं १
माझिये हरणी । गुंतलीस कोणें रानीं २
मुकें मी पाडस । चुकलें भोवें पाहें वास ३
तुजविण काय करूं । प्राण किती कंठीं धरूं ४
आतां जीव जाऊं पाहे । धांव घालीं माझे आये ५
माझी भेटवा जननी । संतां विनवी दासी जनी ६

४

ज्ञानाचा सागर । सखा माझा ज्ञानेश्वर १
मरोनियां जावें । बा तुझ्याचि पोटा यावें २
ऐसें करीं माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानदेवा ३
जावें वोवाळुनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ४

५

गंगा गेली सिंधूपाशीं । त्यानें अव्हेरिलें तिसी १
तरि तें सांगावें कवणाला । ऐसें बोलें बा विठ्ठला २
जळ काय जळचरा । माता अव्हेरी लेंकुरा ३
जनी म्हणे शरण आल्यें । अव्हेरितां ब्रीद गेलें ४

६

यातिहीन चोखामेळा । त्यासी भक्तीचा कळवळा १
त्याचा झाला म्हणियारा । राहे घरीं करी थारा २
देव बाटविला त्यानें । हांसे जनी गाय गाणें ३

७

पाय जोडुनि विटेवरी । कर ठेवुनि कटीवरी १
रूप सांवळें सुंदर । कानीं कुंडलें मकराकार २
गळां वैजयंती माळा । तो हा मदनाचा पुतळा ३
गरुड सन्मुख उभा । जनी म्हणे धन्य शोभा ४

८

हरिहर ब्रह्मादिक । नामें तरले तीन्ही लोक १
ऐसा कथेचा महिमा । जाली बोलायाची सीमा २

जपें तपें लाजविलीं । तीर्थें शरणागत आलीं ३
नामदेवकीर्तनीं । ध्वजा आल्या स्वर्गाहुनी ४
वेदश्रुति देती ग्वाही । जनी म्हणे सांगूं काई ५

९

देव भावाचा लंपट । सोडुनि आलासे वैकुंठ १
पुंडलीकापुढें उभा । समचरणाची शोभा २
हातीं चक्र पायीं वांकी । मुख भक्तांचें अवलोकी ३
उभा बैसेना सर्वथा । पाहे कोडें भक्तकथा ४
सर्व सुखाचा सागर । जनी म्हणे शारंगधर ५

१०

वैकुंठींचा हरि । तान्हा यशोदेच्या घरीं १
रांगतसे हा अंगणीं । माथां जावळाची वेणी २
पायीं पैंजण आणि वाळे । हातीं नवनीताचे गोळे ३
धन्य यशोदा माय । दासी जनी वंदी पाय ४

११

नाम फुकट चोखट । नाम घेतां नये वीट १
जड शिळा त्या सागरीं । आत्माराम नाम तारी २
पुत्रभावें स्मरण केलें । तया वैकुंठासी नेलें ३
नाममहिमा जनी जाणे । ध्यातां विठ्ठलचि होणें ४

१२

कां गा नयेसी विठ्ठला । ऐसा कोण दोष मला १
मायबाप तूंचि धणी । मला सांभाळीं निर्वाणीं २
त्वां बा उद्धरिले थोर । तेथें कोण मी पामर ३
दीननाथा दीनबंधू । जनी म्हणे कृपासिंधू ४

१३

सख्या पंढरीच्या राया । घडे दंडवत पाया १
ऐसें करीं अखंडित । शुद्ध प्रेम शुद्ध चित्त २
वेध माझ्या चित्ता । हाचि लागो पंढरिनाथा ३
जावें ओंवाळुनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ४

१४

ज्याचा सखा हरि । त्यावरि विश्व कृपा करी १
उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघाताचें २
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ३
आंग आपुलें वोडोनी । त्याला राखे जो निर्वाणीं ४
ऐसा अंकित भक्तांसी । म्हणे नामयाची दासी ५

१५

हेंचि देई हृषीकेशी । तुझें नाम अहर्निशी १
रूप न्याहाळीन डोळां । पुढें नाचेन वेळोवेळां २
सर्वां ठायीं तुज पाहें । ऐसें देउनि करीं साहे ३
धांवा करितां रात्र झाली । दासी जनीसि भेटी दिली ४

१६

सुखें संसार करावा । माजीं विठ्ठल आठवावा १
असोनियां देहीं । छायापुरुष जैसा पाहीं २
जैसा सूर्य घटाकाशीं । तैसी देहीं जनी दासी ३

१७

धरिला पंढरीचा चोर । गळां बांधोनियां दोर १
हृदय बंदिशाळा केलें । आंत विठ्ठला कोंडिलें २
शब्दें केली जडाजुडी । विठ्ठलपायीं घातली बेडी ३
सोहंशब्दाचा मार केला । विठ्ठल काकुळती आला ४
जनी म्हणे बा विठ्ठला । जीवें न सोडीं मी तुला ५

१८

माझे मनीं जें जें होतें । तें तें दीधलें अनंतें १
देह नेउनी देही केलें । शांति देउनि मीपण नेलें २
मूळ दिलें हें क्रोधाचें । ठाणें केलें विवेकाचें ३
निजपदीं दिला ठाव । जनी म्हणे दाता देव ४

१९

देव खातें देव पितें । देवावरी मी निजतें १
देव देतें देव घेतें । देवासवें व्यवहारितें २

देव येथें देव तेथें । देवावीण नाहीं रितें ३
जनी म्हणे विठाबाई । भरुनि उरली अंतर्बाहीं ४

२०

अरे विठ्या विठ्या विठ्या । मूळमायेच्या कारट्या १
तुझी रांड रंडकी झाली । जन्मसावित्री चुडा ल्याली २
तुझं गेलं मढं । तुला पाहुनि काळ रडे ३
उभी राहुनी अंगणीं । शिव्या देते दासी जनी ४

२१

देव तारक तारक । देव दुष्टांसी मारक १
गीतेमध्यें आदिअंत । ऐसें बोले तो भगवंत २
शत्रुलागीं आधीं मारी । भक्त संकटीं रक्षी हरि ३
जनी म्हणे कृपा करी । भाव पाहोनी अंतरीं ४

२२

खडतरलें आसन त्यावर झुडतरलें वसन ।
तुज कैंचें रत्नसिंहासन रे विठोबा १
काय करूं उपचार भक्तिभावाचा लाचार ।
तो तूं विश्वीं विश्वंभर सर्वसाक्षी रे विठोबा २
मोडकीसी बाज त्यावर वाकळाची शेज ।
तुज सुकुमारासी नीज कैशी येईल रे विठोबा ३
फुटकासा तुंबा कैसा उदक पिशी बा ।
ताट वाढुनि रुक्मिणीरंभा वाट पाहे रे विठोबा ४
वाळले चिळले कुटके शिळे आणि तुटके ।
मज दासी जनीघरींचे विटके खासी रे विठोबा ५

२३

गौळण पुसे गौळणीसी । पुत्र जाला यशोदेसी १
एक धांवती एकीपुढें । वांटिताती सुंठवडे २
वाण भरूनियां ताटीं । यशोदेचे घरीं दाटी ३
ऐशी गलबल जाहली । दासी जनी हेल घाली ४

२४

माय तूं माउली । आम्हां कृपेची साउली १
तुझें नाम वाचे गातां । नाहीं जन्ममरणचिंता २
नको योग याग तप । पाहें तिकडे तुझें रूप ३
सर्व व्यापुनी भरला । जनी म्हणे उभा ठेला ४

२५

जेवीं जेवीं बा मुरारी । तुज वाढिली शिदोरी १
कनकाचे ताटीं । रत्नजडित ठेविली वाटी २
आमुचें ब्रह्म सारंगपाणी । हिंडतसे रानोरानीं ३
गोपाळांचे मेळीं । हरि खेळे चेंडूफळी ४
तुळसीचे वनीं । उभी राहे दासी जनी ५

हे पंचवीसही अभंग खुद्द जनाबाईचेच असतील अशी जरी मी ग्वाही देऊं शकत नाहीं तरी यांतले बरेच अभंग तिचे आहेत यांत संशय नाहीं, व त्यांवरून तिच्या वाणींतील प्रेमळपणाचा प्रत्यय वाचकांस आल्याशिवाय राहणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. जनीच्या अभंगांत ज्ञानदेव, सोपान, चोखामेळा वगैरे तत्कालीन संतांचा उल्लेख सांपडतो. विशेषतः ज्ञानदेवांविषयींचा आपला भक्तिभाव तिनें अनेक अभंगांत व्यक्त केला आहे. भक्तिपर स्फुट अभंगांशिवाय दुर्वासभोजन, कृष्णजन्म, द्रौपदीवस्त्रहरण वगैरे पौराणिक आख्यानेंही जनाबाईच्या नांवावर प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणे खुद्द जनाबाईसाठीं देवानें कसे श्रम केले याचें ज्यांत वर्णन केलें आहे असे पुष्कळच अभंग जनाबाईच्या गाथ्यांत सांपडतात. पुढील अभंग पहा :—

१

पदक विठोबाचें गेलें । ब्राह्मण म्हणती जनीनें नेलें १
नवलाखांचें पदक । हिरे जडले अमोलिक २
अगे शिंपियाचे जनी । ब्राह्मण म्हणती पदक आणीं ३
नाहीं नेलें म्यां जनीनें । सख्या विठ्ठलाची आण ४

२

जनी वाकळ झाडुनि दावी । पदक पहिलें लवलाहीं १
देव जनीनें भ्रष्टविला । झुला सुळावरी घाला २

ब्राह्मण म्हणती समस्त । सुळीं द्यावी ही निश्चित ३
आमुचा सर्वही आचार । इणें बुडविला साचार ४
ब्राह्मण मिळोनी मारिती । जनी येत काकुळती ५

३

मारूं नका मज येथें । चोर पंढरीचा नाथ १
दंडीं लाविती काढण्या । धांवें विठ्ठल धांवण्या २
करणी करून लपविसी । हेतु जाण हृषीकेशी ३
लबाडांत शिरोमणि । रागें बोले दासी जनी ४

४

आधीं विठ्ठलदरुशन द्यावें । मग मज सुळीं घालावें १
जनी आणिली राउळीं । मूर्ति विठ्ठल पाहिली २
चरणीं ठेवुनी मस्तक । दीन वदनें बोले देख ३
मजसी मारितां । काय येईल तुझे हाता ४
दवडूं नको मजसवा । जनी म्हणे नायकसी देवा ५

५

पदक विसरूनि जगजेठी । ब्राह्मण म्हणती मज चोरटी १
आतां जातें मी श्रीहरी । लोभ असों द्या मजवरी २
अपराधांच्या राशी । घालीं पोटीं हृषीकेशी ३
तुज बहु श्रमविलें । क्षमा करीं वो विठ्ठले ४
सद्गदित दासी जनी । कंठ दाटला नेत्रीं पाणी ५

६

तिचा गहिंवर ऐकिला । घाम देवाजीस आला १
दाटलासे सद्गद मनीं । नेत्रीं अश्रु भरले जीवनीं २
हात जोडोनी लवलाहें । जनी मुखाकडे पाहे ३

७

उदक भरिलें नेत्रीं । पुशितसे आपुले पदरीं १
जीवींच्या जीवना । श्रमूं नको नारायणा २
प्रेमें दाटलीसे कंठीं । गळां घालीतसे मिठी ३
नको कष्टी होऊं देवा । जनी दासी रे केशवा ४

८

जन्मोजन्मीं देईं हरी । दासी नाम्याची मी खरी १
भोळा माझा नामदेव । त्यासी तुम्ही सांभाळावें २
हीच माझी विनवणी । मस्तक ठेविला चरणीं ३
ऐसें बोलोनियां निघे । परतोनी पाहे मागें ४
जनी म्हणे ब्राह्मणांला । तुम्हां उशीर बहु जाहला ५

९

क्षमा करा मजवरी । येऊं नका तुम्ही दुरी १
आणियेली महाद्वारीं । कष्टी होती नरनारी २
समस्तांसी जोडोनी कर । माझें करा हें माहेर ३
आली चंद्रभागातीरीं । पुंडलीका नमस्कारी ४
करूनी आंघोळी । आली सुळाच्याजवळी ५
जनी सुळाकडे पाहे । सूळ वृक्ष होउनि राहे ६
वृक्षाचें तें जाहलें पाणी । धन्य नामयाची जनी ७

विठ्ठलाच्या गळ्यांतलें पदक चोरल्याच्या आरोपावरून जनीला बडव्यांनीं गिरफदार करून सुळीं देण्यास नेलें असतां सुळाचा वृक्ष झाला अशी जी दंतकथा आहे ती वरील अभंगांत वर्णिली आहे. या अभंगांतील ‘तिचा गहिंवर ऐकिला’ हा तृतीयपुरुषी प्रयोग, त्याचप्रमाणें ‘धन्य नामयाची जनी’ हे शब्द, यांवरून हे अभंग खुद्द जनीचे नसून ते दुसऱ्या कोणी तरी लिहिलेले आहेत हें स्पष्ट दिसतें.

१०

पाणी आणावया गेली । तिच्यामागें धांव घाली १
घागर घेउनी हातांत । पाणी ओती रांजणांत २
ऐशा वेरझाऱ्या केल्या । डेरे घागरी भरिल्या ३
पाणी पुरे पांडुरंगा । दासी जनीच्या अंतरंगा ४

११

कोणे एके दिवशीं । विठ्ठल गेला जनीपाशीं १
हळूच मागतो खायाला । म्हणे काय देऊं तुला २

हात धरुनी नेला आंत । वाढी पंचामृत भात ३
प्रेमसुखाचा ढेंकर दिला । जनी म्हणे विठो धाला ४

१२

एकलीच गाणें गात । दुजा साद उमटत १
कोण गे तुझेबरोबरी । गाणें गातो तुझे घरीं २
खूण कळली नामदेवा । विठ्ठल जनीचीया भावा ३

१३

झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणी १
पांटी भरूनियां शिरीं । केर नेउनी टाकी दुरी २
ऐसा भक्तीसी भुलला । नीच काम करूं लागला ३
जनी म्हणे बा विठ्ठला । स्वस्थ बैसें तूं दयाळा ४

१४

साळी कांडायासी काढी । पुढें जाउनी उखळ झाडी १
पायीं पैंजण हातीं कडीं । कोंडा पाखडोनी काढी २
सर्व अंगीं घाम आला । कासे पीतांबर भिजला ३
हाता आले फोड । जनी म्हणे मुसळ सोड ४

१५

शेणी वेंचूं गेलें राना । पाठीमोरा उभा कान्हा १
जाई जाई राउळासी । येथें तूं कां बा आलासी २
पीतांबराची घाली कास । शेणी वेंची सावकाश ३
शेणी वेंचोनि भरली मोट । जनी म्हणे द्यावी गांठ ४

१६

माझे डोईचे केंसांस । नाहाण नव्हतें बहुत दिवस १
तेणें मुरकुंडी केंसांस । म्हणे तूं कां गा उदास २
आपुले हातीं वेणी घाली । जनी म्हणे माय जाली ३

१७

जनी बैसली नाहयाला । पाणी नाहीं विसणाला १
देव धांवोनिया आले । थंड पाणी घे घे बोले २
आपुले हातें विसणपाणी । घाली जनीस चक्रपाणी ३

हे अभंग लक्षपूर्वक पाहतां असें दिसतें कीं, त्यांची रचना जनाबाईच्या कालानंतर पुष्कळच वर्षांनीं झाली असली पाहिजे. जनाबाईला तिच्या कामांत देवानें कसकसें साहाय्य केलें यासंबंधाच्या सर्व दंतकथा एकत्र करून एखाद्या कवीनें अभंगवृत्तांत त्या वर्णिल्या असाव्या; व प्रत्येक अभंगाचे शेवटीं जनीच्या नांवाचें शिक्कामोर्तब करून ठेवलें असावें.

रा. गं. ब. ग्रामोपाध्ये, एम्. ए. यांनीं लिहिलेलें ' संतकाव्यसमालोचन, खंड १ ला ' हें पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. त्यात ग्रंथकारानीं जनाबाईच्या कांहीं अभंगांचें बऱ्याच कुशलतेनें समालोचन केलें असून तें वाचनीय आहे. मात्र, माझ्या मतें, त्यांत एक मोठा दोष आहे व तो हा कीं गाथ्यांत जनाबाईच्या नांवावर छापलेले सर्वच अभंग ज्ञानदेव–नामदेव–समकालीन जनाबाईचे आहेत असें ते मानतात. रा. ग्रामोपाध्ये यांचा संतांच्या अलौकिक चमत्कारांवर विश्वास नाहीं; असें असतां जनाबाईसाठीं देवानें केलेल्या चमत्कारांचें ज्यांत वर्णन आहे तेही अभंग खुद्द जनाबाईचे आहेत असें त्यांनीं गृहीत धरून चालावें हे आश्चर्य नव्हे काय ? शिवाय कांहीं अभंगांचे पाठही त्यांनीं चुकीचे दिले आहेत. उदाहरण :—' ज्ञानाचा सागर । सखा माझा ज्ञानेश्वर ' हा मूळचा पाठ बदलून त्या ऐवजीं ' विवेक-सागर । सखा माझा ज्ञानेश्वर ' हा पाठ त्यांनीं दिला आहे.

श्री. आवटे यानीं प्रसिद्ध केलेल्या ' गाथापंचकां 'त जनाबाईच्या नांवावर एकंदर ३४८ कविता छापल्या आहेत. परंतु या सर्वच कविता नामदेव-कालीन जनाबाईच्या असणें शक्य नाहीं हें मी पूर्वी सप्रमाण दाखविलें आहे. तथापि याचे आणखी एक ठळक उदाहरण येथें देतों. गाथ्यांत ' सेना न्हावीचरित्र ' या मथळ्याचा १३ कडव्यांचा एक अभंग दिला असून त्याच्या शेवटीं " कितीकांचा शीण गेला । **जनी** म्हणे न्हावी झाला ' असा जनीचा नामोल्लेख आहे. आतां शा० शकाच्या १३ व्या शतकांत होऊन गेलेल्या जनीकडून चौदाव्या शतकांत होऊन गेलेल्या सेना न्हाव्याचें चरित्र लिहिलें जाणें शक्य आहे काय ? तात्पर्य, जनीच्या नांवावर प्रसिद्ध झालेल्या या एकंदर ३४८ कवितांची बारकाईनें छाननी करून त्यांना जर संशोधनाची कात्री लावली तर त्यांत मूळ जनाबाईचे १०० अभंगदेखील ठिकाणावर राहणार नाहींत; व नामदेवकालीन इतर संतकवींच्या नांवांवर प्रसिद्ध

असलेल्या बहुतेक अभंगांच्या बाबतींतही हाच अनुभव येईल अशी माझी खात्री आहे. जुन्या कवींची कविता ज्या स्वरूपांत आज आपल्यापुढें आहे तेंच तिचें मूळस्वरूप, असें धरून चालण्याचे दिवस आतां मागें पडले असून, त्या कवितेच्या जितक्या जुन्या हस्तलिखित प्रती अद्याप मिळण्या-सारख्या असतील तितक्या मिळवून व तुलनात्मक पद्धतीनें त्यांचें संशोधन करून मूळ कवीची अस्सल कविता कोणती आणि मागाहून त्याच्या नांवावर घुसडून देण्यांत आलेली बनावट कविता कोणती हें निश्चित करून तदनु-रोधानें सगळ्या जुन्या कवितेचें पुनर्मुद्रण करण्याचा काल आतां आलेला आहे. विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध वगैरे सलग स्वतंत्र ग्रंथातही जेथें अनेक अपपाठ आणि शंकास्थानें आढळतात, तेथें फुटकळ कवितांची स्थिति काय सांगावी ? त्यांत आणखी प्रकाशकांनीं आपल्या हलगर्जीपणानें जी भर घातली आहे ती निराळीच ! निरनिराळ्या कालीं होऊन गेलेल्या एकाच नांवाच्या अनेक कवींची कविता एकाच कवीच्या नांवावर त्यांनीं खुशाल दडपली आहे ! खुद्द तुकारामबुवांच्या ‘ सांप्रदायिक ’ या प्रतिष्ठित नावावर मोडणाऱ्या गाथ्यांतदेखील ‘ तुका ब्रह्मानंद ’ कवीचे एक दोन अभंग कसे घुसडून देण्यात आले आहेत हें माझ्या ‘ संतश्रेष्ठ तुकाराम ’ या पुस्तकांत मीं दाखविलेंच आहे. तात्पर्य, जुन्या संतकवींच्या फुटकळ कवितेचें ‘ समालोचन ’ करण्यापूर्वी, त्या कविता त्यांच्याच आहेत, बनावट नव्हत, याची अगोदर खात्री करून घेतली पाहिजे. १७ व्या शतकांत होऊन गेलेल्या संतचरित्रकार नामा शिंप्याची कविता केवळ कविनामसादृश्यामुळें, तेराव्या शतकांत होऊन गेलेल्या आद्य नामदेवांची आहे असे समजून तिचें समालोचन करण्यांत काय अर्थ ?

---

# सोयराबाई

सोयराबाई ही प्रसिद्ध संत चोखामेळा यांची बायको. हिच्या नांवावर प्रसिद्ध असलेले अभंग जर खरोखर हिनेंच रचलेले असतील तर ती एक उत्तम कवयित्री होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु तिच्या चरित्रासंबंधानें मात्र म्हणण्यासारखी विश्वसनीय माहिती मुळींच उपलब्ध नाहीं.

**" गावा नच मानावा चोखामेळा महार सामान्य ।**
**ज्याच्या करि साधूंचा चोखामेळा महारसा मान्य ॥ "**

असें ज्या चोखामेळयाविषयीं कविश्रेष्ठ मोरोपंतांनीं म्हटलें आहे त्यांच्याही चरित्राचा जेथें पत्ता नाहीं तेथें त्यांची बायको जी बिचारी सोयराबाई तिची विश्वसनीय हकीकत कोण कशाला लिहून ठेवणार? तरी त्यांतल्यात्यांत संतचरित्रकार महीपतींनीं चोखोबांच्या कांहीं गोष्टी आपल्या ग्रंथांत दिल्या आहेत व त्यांत एकदोन ठिकाणीं सोयराबाईचा उल्लेख आला आहे. जुन्या संतकवींनीं चोखोबा हे अनामिक म्हणून त्यांची उपेक्षा केली असे मात्र मुळींच नाहीं; उलट त्यांनीं त्यांची स्तुतीच केली आहे. "चरणतळींची वीट निर्मळ । तो हा जाण चोखामेळ ॥ " असें एकनाथांनीं म्हटलें असून, "चोखामेळा संत जीवासी आवडे। विसर न पडे त्याचा मज॥" असे उद्गार तुकारामबुवांनीं काढिले आहेत.

चोखामेळा हे जातीचे महार. हे मूळचे वऱ्हाडच्या बाजूचे असून नंतर महाराष्ट्रांत येऊन राहिले असावे असें वाटतें. ज्ञानदेव, नामदेव, विसोबा खेचर, गोरा कुंभार इत्यादि संतांशीं ते समकालीन होते. त्यांचा जन्मकाल उपलब्ध नाहीं, पण शालिवाहन शक १२६० वैशाख वद्य ५ हा त्यांचा मृत्युकाल जुन्या ग्रंथांत दिला आहे. त्यांची पत्नी सोयराबाई ही कोणत्या गांवची, चोखोबांबरोबर तिचें लग्न कधीं झालें, हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं.

चोखोबांच्या मृत्यूनंतर ती हयात होती येवढें मात्र तिच्याच अभंगांवरून निश्चित दिसतें.

तत्कालीन संतमंडळांत चोखोबांस मोठा मान असे. ते जातीनें महार असतांही त्यांची राहणी फार स्वच्छतेची होती. यदृच्छेनें वांट्यास आलेलें आपलें जातिकर्म आटोपल्यावर मध्यान्हकालीं स्नान करून ते धूतवस्त्रें परिधान करीत व गंध लावून पांडुरंगाचें ध्यान करीत. सोयराबाईही पतिसेवेंत दक्ष असून पारमार्थिक वृत्तीची होती. पंढरपूरच्या बडव्यांनीं चोखोबांचा पुष्कळ छल केला पण तो सर्व निमूटपणें सोसून, पांडुरंगाच्या कृपेनें शेवटीं ते सर्वांच्या आदरास पात्र झाले.

भगवद्भक्त बंका महार यांच्या एका अभंगांत सोयराबाईचा उल्लेख आहे. चोखोबांस पुत्रसंतान नसल्यामुळें त्यांची पत्नी सोयराबाई ही आपणांस पुत्रप्राप्ति व्हावी म्हणून पांडुरंगाची नेहमीं प्रार्थना करीत असे. एके दिवशीं वृद्ध ब्राह्मणाचें रूप धारण करून पांडुरंग तिच्या घरीं गेला व घर कोणाचें, घरांत मुलेंबाळें किती आहेत वगैरे चौकशी करूं लागला. तेव्हां सोयराबाईनें त्याला सांगितलें कीं,—

**“ ( म्हणे ) घरधन्यासी विठोबाचा छंद ।**
**आठविती गोविंद रात्रंदिवस ॥**
**संसारीं सुख नाहीं अणुमात्र ।**
**सदा अहोरात्र हाय हाय ॥**
**पोटींही संतान न देखेंचि कांहीं ।**
**वायां जन्म पाहीं झाला माझा ॥ ”**

हें ऐकून विप्रवेषधारी पांडुरंग तिला म्हणाला, “ बाई, मी एक प्रवासी आहें. मला फार भूक लागली आहे. जर कांहीं फराळाचें देशील तर खाऊन घोंटभर पाणी पिईन. ” हें ऐकून सोयराबाईनें त्यास सांगितलें, “ महाराज, आम्ही महार आहोंत. आमच्या घरचें अन्न तुम्हांस कसें चालेल ? ” विप्र म्हणाला, “ बाई, तुमच्या जातीशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. मला कांहीं तरी खायाला दे म्हणजे झालें. मी भुकेनें अगदीं व्याकुळ झालों आहें.” ब्राह्मणाचे हें भाषण ऐकून बिचारी सोयराबाई मोठ्या विचारांत पडली. या ब्राह्मणाला आपण अन्न द्यावें तर ब्राह्मणाला बाटविलें म्हणून लोक आपणास मारतील;

न द्यावें तर हा उपाशी ब्राह्मण विन्मुख होऊन परत जातो ! मग तिनें भटजींस नमस्कार करून म्हटलें, " महाराज, तुम्ही ब्राह्मण; आम्ही महार. आमच्या घरचें अन्न जर मीं तुम्हांस दिलें तर लोक आम्हांला मारहाण करतील." ब्राह्मण म्हणाला, " पुढें काय होईल तें पाहूं. तूं अगोदर मला अन्न दे." निरुपाय होऊन सोयराबाई घरांत गेली आणि वाटीभर दहींभात आणून तिनें तो ब्राह्मणापुढें ठेविला. ब्राह्मणानें तो भात मोठ्या अधाशीपणानें खाल्ला. मग तो सोयराबाईस म्हणाला, " बोल, तुला मी आतां काय देऊं ?" तिनें सांगितलें, " आपलें उच्छिष्ट प्रसाद म्हणून द्या म्हणजे झालें." ब्राह्मण म्हणाला, " ठीक आहे, हें घे. हीं उरलेलीं भाताचीं शितें तूं खा म्हणजे तुला पुत्र होईल." हें ऐकून सोयराबाईस मोठा आनंद झाला. तिनें ब्राह्मणाचें तें उच्छिष्ट अन्न मोठ्या भक्तिभावानें सेवन केलें. ब्राह्मण पूर्वीच निघून गेला होता. कांहीं वेळानें चोखोबा घरीं आले तेव्हां सोयराबाईनें घडलेली हकीकत त्यांस सांगितली. ती ऐकून चोखोबा तिला रागें भरले. ते म्हणाले, " वेडे, तूं हें काय केलेंस ? आपण बोलूनचालून महार. आपल्याकडचें अन्न तूं ब्राह्मणाला दिलेंस ही तुझ्या हातून अगदीं अनुचित गोष्ट घडली." असो. पुढें पांडुरंगाच्या कृपेनें सोयराबाई गर्भवती झाली व नऊ महिने भरतांच पुत्र प्रसवली; त्याचें नांव कर्ममेळा. सोयराबाई गर्भवती असतां घरांत बाळंत-पणाची कांहींच सामग्री नसल्यामुळें चोखोबा घरांतून पळून मेहुणपुऱ्यास आपली बहीण निर्मळा इजकडे जाऊन राहिले होते व त्याबद्दल तिनें (निर्मळेनें) त्यांची चांगलीच कानउघाडणी केली होती असें निर्मळेच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या कांहीं अभंगांवरून समजतें. सोयराबाईचा मुलगा कर्ममेळा हाही बापासारखाच मोठा भगवद्भक्त आणि कवि होता.

मंगळवेढ्यास गांवकुसूं घालण्यासाठीं पुष्कळ महार वेठीनें कामास लावले होते, त्यांत चोखोबाही होते. चार महिन्यांनीं तें गांवकुसूं अकस्मात् कोसळून पुष्कळ महार चिरडून मरण पावले; त्यांतच चोखोबांचा अंत झाला. त्यांच्या अस्थि नामदेवांनीं पंढरपुरीं नेल्या आणि त्या महाद्वारीं पुरून त्यांजवर समाधि बांधली. चोखोबांच्या निर्याणाचे वेळीं सोयराबाई हयात होती.

आतां सोयराबाईच्या कवितेकडे वळूं. सोयराबाईनें शेंकडों अभंग रचिले असावेत; पण हल्लीं तिचे फक्त ६२ च अभंग उपलब्ध आहेत. सोयराबाईनें

आ क अभंगांत ‘ चोख्याची महारी ’ या शब्दांनीं स्वतःचा उल्लेख केला आहे; ‘ सोयरा ’ हें नांव फारच थोड्या अभंगांत वापरलेलें आहे. तिची वाणी फार रसाळ असून तींत स्पष्टवक्तृत्व हा गुण विशेष आहे. देहाचा विटाळ मानणाऱ्या कर्मठांची कानउघाडणी, आपल्या पतीप्रमाणेंच, सोयराबाईनेंही अगदीं स्पष्ट शब्दांनीं केली आहे. आतां तिचे कांहीं निवडक अभंग येथें देऊन हा संक्षिप्त लेख पुरा करितों.

१

**येईं येईं गरुडध्वजा । विटेसहित करीन पूजा १**
**धूप दीप पुष्पमाळा । तुज समर्पूं गोपाळा २**
**पुढें ठेवोनियां पान । वाढी कुटुंबी तें अन्न ३**
**तुम्हांयोग्य नव्हे देवा । गोड करूनियां जेवा ४**
**विदुराघरच्या पातळ कण्या । खासी मायबापा धन्या ५**
**द्रौपदीच्या भाजीपाना । तृप्ति झाली नारायणा ६**
**तैसी झाली येथें परी । म्हणे चोख्याची महारी ७**

२

**नाहीं उरली वासना । तुम्हा नारायणा पाहतां १**
**उरला नाहीं भेदाभेद । झालें शुद्ध अंतर २**
**विटाळाचें होतें जाळें । तुटलें बळें नामाच्या ३**
**चौदेहाची तुटली दोरी । म्हणे चोख्याची महारी ४**

३

**अवघा रंग एक झाला । रंगीं रंगला श्रीरंग १**
**मीतूंपण गेलें वायां । पाहतां पंढरीच्या राया २**
**नाहीं भेदाचें तें काम । पळोनि गेले क्रोध काम ३**
**देहीं असूनि तूं विदेही । सदा समाधिस्थ पाहीं ४**
**पाहतें पाहणें गेलें दुरी । म्हणे चोख्याची महारी ५**

४

**देहासी विटाळ म्हणती सकळ । आत्मा तो निर्मळ शुद्धबुद्ध १**
**देहींचा विटाळ देहींच जन्मला । सोंवळा तो झाला कवण प्राणी ?**

विटाळावांचोनी उत्पत्तीचें स्थान । कोणी देह निर्माण नाहीं जगीं ३
म्हणुनी पांडुरंगा वानितसें थोरी । विटाळ देहांतरीं वसतसे ४
देहाचा विटाळ देहींच निर्धारीं । म्हणतसे महारी चोखियाची ५

५

शीण वाटतसे मना । नारायणा न पाहतां १
वायां आचार विचार । सदा मलीन अंतर २
सोंगाचें तें सोंग । दावी रंग कथेचा ३
परधनीं सदा मन । वरी दावितसे डोलून ४
ऐसा नर तो दुराचारी । म्हणे चोख्याची महारी ५

६

जन ते आंधळे भुलले पैं वायां । विठ्ठल सखयावांचोनियां १
भुललीं बापुडीं पायीं तेणें बेडी । कोण तोडातोडी करील त्यांची २
यमाची यातना होईल बा जेव्हां । सोडवील तेव्हां कोण त्यांसी ३
याचलागीं म्हणा रामकृष्ण हरि । म्हणतसे महारी चोखियाची ४

७

बैसोनी एकांतीं बोलूं गुजगोष्टी । घालोनियां मिठी चरणांसी १
बहु दीस झाले वाटतसे खंती । केधवां भेटती बाई मज २
तुम्हासी तों चाड नाहीं आणिकांची । परी वासना आमुची अनिवार ३
सोयरा म्हणे चला जाऊं तेथवरी । गुजगोष्टी चारी बोलूं कांहीं ४

८

टाळ दिंडीचा गजर । विठ्ठलनामाचा उच्चार १
दोष पळाले कपाटीं । नाम उच्चारितां ओठीं २
योगयागादि साधनें । अवघियांसी येथें पेणें ३
सुख नाहीं संसारीं । म्हणे चोख्याची महारी ४

९

गर्जती नाचती आनंदें डोलती । सप्रेम फुंदती विठ्ठलनामें १
तया सुखाचा पार न कळे ब्रह्मादिकां । पुंडलीकें देखा भुलविलें २
नावडे वैकुंठ नावडे भूषण । नावडे आसन वसन कांहीं ३
कीर्तनगजरीं नाचतो श्रीहरि । म्हणतसे महारी चोखियाची ४

१०

पंचमहापातकी विश्वासघातकी । रामनामें सुखी विश्वजन १
महापापराशी वाल्हा तो तारिला । उद्धार तो केला गणिकेचा २
पुत्राचिया नामें वैकुंठाची गति । अजामेळा मुक्ति हरिनामें ३
नामेंचि तरले नर आणि नारी । म्हणतसे महारी चोखियाची ४

११

माझें मन तुमचे चरणीं । तूंचि माझा देवा धनी १
धरणें घेउनी दारांत । बैसलेंसे नाम गात २
दुजा धंदा कांहीं नेणें । तुमचे कृपेचें पोसणें ३
द्वारीं बैसोनी हाका मारी । म्हणे चोख्याची महारी ४

१२

किती शिणताती प्रपंचपरमार्थां । परी न घडे सर्वथा हित कोणा १
न घडे प्रपंच न घडे परमार्थ । न घडेचि स्वार्थ दोहींविषीं २
एकाची एकास न पडेचि गांठी । तेणें होय कष्टी सुखदुःखें ३
सोयरा चोखियाची म्हणे पंढरिराया । दंडवत पायां तुमचिया ४

१३

शिणल्या भागल्याचा तूंचि विसांवा । धांवें तूं केशवा मायबापा १
किती किती मन आवरोनी धरूं । परी न सुचे विचारू काय करूं २
तुम्ही तंव समर्थ आपुल्याच भारें । आमुचें खोटें खरें काय जाणा ३
मी तों बैसलें तुमचिये द्वारीं । म्हणतसे महारी चोखियाची ४

१४

हीन दीन म्हणोनी कां गा मोकलिलें । परी म्यां धरिलें पदरीं तुमच्या १
आतां मोकलितां नव्हे नित बरी । थोरा साजे थोरी थोरपणें २
शरण आलिया दावितसां पाठी । काय थोर गोष्टी वानूं देवा ३
सोयरा म्हणे अहो पंढरीनिवासा । तुमचा तो ठसा त्रिभुवनीं ४

१५

जयाचिये वाचे विठोबाचें नाम । तयाचा तो जन्म सफळचि १
तयासी कांचणी नाहीं बा जाचणी । यम पायवणी वंदी त्याचें २

हेंचि निजसार नामाचा उच्चार । मंत्र हा निर्धार सुलभचि ३
सोयरा म्हणे पावन हें नाम । जपतां सुखधाम वैकुंठींचें ४

१६

कळिकाळ कांपे नाम उच्चारितां । विठ्ठल म्हणतां कार्यसिद्धि १
त्रिअक्षरी जप सुलभ सोपारा । वाचे तो उच्चारा सर्व काळ २
भवतापश्रम हरे भवव्यथा । आन नका पंथा जाऊं कोणी ३
नामाचा विश्वास दृढ धरा अंतरीं । म्हणतसे महारी चोखियाची ४

१७

उदारा पंढरिराया नको अंत पाहूं । कोठवरी मी पाहूं वाट तुझी १
माय तूं माउली जीवींचा जिव्हाळा । पुरवावा ळळा मायबापा २
सर्वांपरी उणें दिसतें कठिण । आतां नका शीण मानूं माझा ३
निवांतचि ठेवा तुमचिये दारीं । म्हणतसे महारी चोखियाची ४

१८

किती हे मरती किती हे रडती । कितीक हांसती आपआपणा १
पाहतां विचार काय हें खरें । खोट्यालागीं झुरे प्राणी देखा २
मरती ते काय रडती ते काय । हांसती ते काय कवण कवणा ३
कवण तो मेला कवण तो राहिला । हांसती रडती कवणाला न कळे कांहीं ४
सोयरा म्हणे याचें नवल वाटतें । परी नाठवितें देवा कोणी ५

१९

याचिये संगतीं अपायचि मोठा । दुःखाचा शेलवांटा भागा आला १
आतां पुरे हरी आतां पुरे हरी । सोडवीं निर्धारीं यांतोनियां २
बहुतचि खंती करीतसे मन । दाखवा चरण मजलागीं ३
गहिंवर नावरे उदास अंतरीं । म्हणतसे महारी चोखियाची ४

२०

आजि माझा सर्व पुरला नवस । देखिलें पायांस विठोबाच्या १
अनंतां जन्मांचें फिटलें सांकडें । कोंदाटलें पुढें रूप त्याचें २
आठवीत होतें गोमटीं पाउलें । तींचि देखियेलीं विटेवरी ३
आनंद न समाये मनाचे अंतरीं । म्हणतसे महारी चोखियाची ४

हा शेवटला अभंग, सोयराबाईस पंढरीच्या पांडुरंगमूर्तीचें प्रथमदर्शन घडलें त्या वेळीं तिनें रचलेला दिसतो; व पांडुरंगमूर्ति प्रत्यक्ष पाहूनच हा अभंग रचला आहे. यावरून, चोखामेळा व त्यांच्या कुटुंबांतील माणसें यांना विठ्ठलमूर्तीचें दर्शन घेण्यास पंढरीच्या बडव्यांनीं आरंभीं जरी मज्जाव केला असला तरी पुढें त्यांस त्यांनीं देवदर्शन घेण्यास परवानगी दिली होती हें अगदीं स्पष्ट दिसतें.

वर उद्धृत केलेले २० अभंग वाचल्यावर वाचकाच्या लक्षांत एक गोष्ट आलीच असेल ती ही कीं सोयराबाई ही ज्ञानेश्वरसमकालीन असतां तिच्या अभंगांची भाषा अगदींच सोपी आहे; ज्ञानेश्वरींतले जुने शब्द तींत मुळींच नाहींत. चोखोबांचे व नामदेवादि तत्कालीन इतर संतांचे अभंगही असेच सोपे आहेत. एकाच कालीं लिहिण्यांत आलेल्या ज्ञानेश्वरीची भाषा आणि या अभंगांची भाषा यांत इतकें अंतर कां पडावे हा खरोखरच मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. असो.

सोयराबाईचे जे ६२ अभंग गाथ्यात छापले आहेत त्यांत कांहीं आत्मचरित्रपर अभंगही आहेत. चोखोबांची बहीण व सोयराबाईची नणंद निर्मळा हिच्यासंबंधानेंही सोयराबाईचे कांहीं अभंग आहेत, पण ते पुढें निर्मळेच्या चरित्रांत देऊं. चोखोबांचा पुत्र कर्ममेळा हा जन्म पावला, त्या वेळीं देवानें त्याचे बारसें केल्याचा उल्लेख पुढील अभंगात आहे:—

**" उपजतां कर्ममेळा । वाचे विठ्ठल सांवळा १**
**विठ्ठलनामाचा गजर । वेगें धांवे रुक्मिणीवर २**
**विठ्ठल–रुक्मिणी । बारसें करिती आनंदानीं ३**
**करी साहित्यसामग्री । म्हणे चोख्याची महारी ४ "**

या अभंगांत, कर्ममेळा जन्मल्याबरोबर विठ्ठल नामाचा गजर करूं लागला असें म्हटलें आहे, पण तें संभवनीय नसल्यामुळें हा अभंग क्षेपक आहे असें मानावें लागतें.

सोयराबाईवर कांहीं तरी मोठें संकट आलें असतां तिनें पुढील अभंग रचला असावा असें वाटतें:—

**आमची तों दशा विपरीत झाली । कोण आम्हां घाली पोटामध्यें १**
**आमचें पालन करील बा कोण । तुजवीण जाण दुजें आतां २**
**कळेल तें करा तुमचें उचित । माझी तों नित निवेदिली ३**
**सोयरा म्हणे माझा जीवप्राण तुम्ही । आणीक तों आम्ही कोठें जावें ४**

चोखोबाच्या मृत्यूच्या वेळींच कदाचित् सोयराबाईनें हा अभंग लिहिला असावा असें वाटतें.

चोखोबांस पंढरपुरच्या ब्राह्मणांनीं छळलें त्या वेळीं देवानें त्यांची कशी खोड मोडली हें पुढील अभंगांत वर्णिलें आहे:—

**पंढरीचे ब्राह्मणें चोख्यासी छळिलें । तयालागीं केलें नवल देवें १**
**सकळ समुदाव चोखियाचे घरीं । ऋद्धि सिद्धि द्वारीं तिष्ठताती २**
**रंगमाळा सडे गुढिया तोरणें । आनंद कीर्तन वैष्णवांचें ३**
**असंख्य ब्राह्मण बैसल्या पंगती । विमानीं पाहती सुरवर ४**
**तो सुखसोहळा दिवाळी दसरा । वोवाळी सोयरा चोखीयासी ५**

# निर्मळा

निर्मळा ही प्रसिद्ध संत चोखामेळा ह्यांची धाकटी बहीण. ही मगळवेढें येथें चोखोबांच्या शेजारीं रहात असे असें ' महाराष्ट्र सारस्वत ' या ग्रंथांत लिहिलें आहे, पण तें बरोबर नसून, ती ' मेहुणपुर ' नामक गांवीं रहात असे असें सोयराबाईच्या अभंगांतील उल्लेखावरून स्पष्ट दिसतें. निर्मळेच्या चरित्राविषयीं कोणतीच माहिती उपलब्ध नाहीं. ती आपल्या बंधूप्रमाणेंच मोठी भगवद्भक्त आणि कवयित्री होती इतकेंच सांगता येतें. सोयराबाईच्या प्रसूतीचा काल जवळ येतांच, घरांत बाळंतपणाचें काहींच साहित्य नसल्यामुळें, चोखोबा घरांतून पळून, मेहुणपुरास निर्मळेकडे जाऊन राहिले होते हा उल्लेख पूर्वी आलाच आहे. चोखोबांच्या निर्याणाची वार्ता समजताच निर्मळा आपल्या गांवाहून पंढरपुरास आली. त्यानंतरचें तिचें चरित्र सोयराबाईनें पाच अभंगांत वर्णिलें आहे तें येणेंप्रमाणें :—

**१ चोखा बैसतां समाधीसी । निर्मळा आली पंढरीसी १**
**पाहुनि आनंद सोहळा । म्हणे विठ्ठला दयाळा २**
**चोखा मेळविला रूपीं । माझी आतां कोण गती ३**
**देव बैसोनी निकटीं । निर्मळेसी सांगे गोष्टी ४**
**ऐसें देखोनियां नयनीं । सोयरा मिठी घाली चरणीं ५**

**२ ऐसा आनंदसोहळा । निर्मळा पाही आपुले डोळां १**
**आनंद न माये गगनीं । वैष्णव नाचती रंगणीं २**
**जेथें नाहीं भेदाभेद । अवघा भरला गोविंद ३**
**तया सुखाची सुखराशी । बोलली ती निर्मळेसी ४**
**सोयरा देखोनि आनंदली । वेळोवेळां विठू न्याहाळी ५**

३ ऐशा आनंदांत एकमासवरी । राहिली निर्धारीं पंढरीये १
नित्य जावोनियां चंद्रभागे स्नान । घाली लोटांगण पुंडलीका २
क्षेत्रप्रदक्षिणा नामाच्या गजरीं । येवोनी महाद्वारीं हरि वंदी ३
सोयरा म्हणे ऐसा सारोनियां नेम । वाचे गाय नाम विठोबाचें ४

४ चोखा निर्मळा एकरूप । दरुशनें हरे ताप १
वाचे विठ्ठलनामछंद । नाहीं भेद उभयतां २
तीर्थ उत्तम निर्मळा । वाहे भागीरथी जळा ३
ऐसी तारक मेहुणपुरी । म्हणे चोख्याची महारी ४

५ पुसोनी सर्वांसी निर्मळा निघाली । येऊनि पोंचली मेहुणपुरीं १
सर्व काळ छंद वाचे नाम गाय । आठवीत आहे चोखियासी २
म्हणे विठोबा दयाळा मागणें आहे तुज । तुझा भक्तराज सांभाळीं तूं ३
सोयरा म्हणे ऐसा सुखाचा सोहळा । भोगी अवलीळा निर्मळा ती ४

या अभंगावरून निर्मळेचा पारमार्थिक अधिकार फार मोठा होता असें दिसतें. जावा आणि नणंदा यांचा बहुधा अहिनकुलसंबंध असतो, पण वरील अभंगांत सोयराबाई आपल्या नणंदेचे गोडवे गात आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. चोखोबांच्या मृत्यूनंतर निर्मळा ज्या अर्थी पंढरीस आली त्या अर्थी सोयराबाई त्या वेळीं तेथेंच रहात असावी असें दिसतें. निर्मळेनें चोखोबाकडूनच उपदेश घेतला होता हें तिच्या पुढील अभंगावरून सिद्ध होतें :—

चोखा म्हणे निर्मळेसी । नाम गायें अहर्निशीं १
तेणें संसार सुखाचा । इहपरलोक साचा २
साधन हेंचि थोर असे । शांति क्षमा दया वसे ३
ऐकतांचि आनंदली । निर्मळा मिठी चरणीं घाली ४

चोखोबा निर्मळेच्या घरीं पळून गेले होते हा वृत्तांत निर्मळेच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या कांहीं अभंगांतही आढळतो :—

१ संसाराचें भय घेउनी मानसीं । चोखा मेहुणपुरीसी जाता झाला १
देखोनी निर्मळा आनंदली मनीं । धांवोनी चरणीं मिठी घाली २

**बैसोनी शेजारीं पुसे सुखमात । वहिनी क्षेमवंत आहेत कीं ३**
**निर्मळा म्हणे पुढील विचार । कैसा तो साचार सांगें मज ४**

२ **ऐकोनियां मात चोखा सांगे तिसी । पूर्ण नवमासांसी भरियेलें १**
**साहित्यसामुग्री नाहीं कांहीं घरीं । म्हणोनी निर्धारीं बोलियेली २**
**ऐसा हा घोर कोणें वागवावा । म्हणोनि तुझे गांवा वेगें आलों ३**
**निर्मळा म्हणे अनुचित केलें । तुम्हां काय वहिलें म्हणों आतां ४**

३ **वडील तूं बंधु असोनि अविचार । केला कां निर्धार सांग मज १**
**न पुसतां कां बा आलासी धांवत । वहिनी आकांत करतील कीं २**
**येरू म्हणे विठू पुरवील सामग्री । भार तयावरी घातिलासे ३**
**निर्मळा म्हणे ही बरी नोहे गोष्टी । विठोबासी कष्टी करणें काय ४**

४ **ऐसें आनंदानें एक मास राहिला । परी हेत गुंतला पांडुरंगीं १**
**रात्रंदिवस छंद विठ्ठलनामाचा । नाहीं संसाराचा हेत मनीं २**
**भोजन सारुनी बैसले एकांतीं । निर्मळा बोलती चोखियासी ३**
**बहु दिस झाले खंती वाटे मना । पंढरीचा राणा आठवत ४**
**गोड धड...जीवासी तें कांहीं । कईं हो डोई पायीं ठेवीन मी ५**
**निर्मळा म्हणे अहो देवराया । भेटी लवलाह्या देईं मज ६**

हे अभंग खरोखरच निर्मळेचे असतील असें मात्र मला मुळींच वाटत नाहीं. त्या वेळच्या एखाद्या कवीनें तत्कालीन संत आणि संतिणी यांच्या कथा अभंगवृत्तांत लिहून त्यांत स्वतःचें नांव न घालतां, त्या त्या व्यक्तीच्या चरित्रपर अभंगांत त्या त्या व्यक्तीचें नांव घातलें असावें, अशी माझी ठाम समजूत आहे. कदाचित् हा एक मोठा सलग ग्रंथच असावा.

निर्मळेची आणखी कांहींच माहिती उपलब्ध नसल्यामुळें, गाथ्यांत दिलेल्या तिच्या २४ अभंगांपैकीं कांहीं सुंदर अभंग येथें उतरून घेऊन हें प्रकरण संपवितों.

१

**आनंदें वोविया तुम्हासी गाईन । जीवें भावें वोवाळीन पायांवरी १**
**सुकुमार साजिरीं पाउलें गोजिरीं । ते हे मिरवलीं विटेवरी २**
**कटावरी कर धरोनी श्रीहरी । उभा भीमातीरीं पंढरीये ३**
**महाद्वारीं चोखा तयाची बहीण । घाली लोटांगण उभयतां ४**

२

अनाथांचा नाथ कृपावंत देवा । घडो तुमची सेवा अहर्निशीं १
अठ्ठावीस युगें विटेवरी उभा । वामभागीं शोभा रुक्मादेवी २
पतितपावन गाजे ब्रीदावळी । पुरवावी आळी हीच माझी ३
उभा विटेवरी ठेवोनी चरण । म्हणतसे बहीण चोखियाची ४

३

चहूंकडे देवा दाटला वणवा । कां न ये कणवा तुजलागीं १
सांपडलें संधी संसाराचे संगीं । सोडवीं लगबगीं मायबापा २
बहु मज उबग आला असे देवा । धांवें तूं केशवा लवलाहीं ३
तुजवीण मज कोण गणगोत । तूंचि माझा हितकर्ता देवा ४
निर्मळा म्हणोनी पायीं घाली मिठी । परतें न लोटीं मायबापा ५

४

मज नामाची आवडी । संसार केला देशधडी १
सांपडलें वर्म सोपें । विठ्ठल नाममंत्र जपें २
नाहीं आणीक साधन । सदा गाई नारायण ३
निर्मळा म्हणे देवा । छंद येवढा पुरवावा ४

५

नाहीं मज आशा आणीक कोणाची । स्तुति मानवाची करुनी काय १
काय हे देतील नाशवंत सारे । यांचें या विचारें यांसी न पुरे २
ऐसें ज्याचें देणें कल्पांतीं न सरे । तेंचि एक बरें आम्हांलागीं ३
जोभक्तांचा विसांवा वैकुंठनिवासी । तो पंढरीसी उभा विटे ४
निर्मळा म्हणे सुखाचा सागर । लावण्यआगर रूप ज्याचें ५

६

आतां बहु बोलणें सारोनियां ठेवा । उगवा हा गोंवा मायबापा १
संसाराचा छंद नकोसा हा झाला । परमार्थ भला संतांसंगें २
जें आहे कडू तें तें लागे गोडु । गोडाचें जें गोडू तें लागे कडू ३
निर्मळा म्हणे सुख तुमचे पायीं । आणीक मी कांहीं नेणें दुजें ४

# कान्होपात्रा

**कान्होपात्रा श्रीमद्विठ्ठलरूपीं समानता पावे ।**
**तापत्रयें जन यशा या पिउनि अमृतसमा न तापावे ॥**

—सन्मणिमाला, मोरोपंत

कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं कान्होपात्रेचा अंदाजी काल शा० शके १३९० हा दिला आहे व तोच बरोबर असावा असें वाटतें. प्राचीन लेखकांनीं कान्होपात्रा ही ज्ञानदेवसमकालीन असल्याचें ध्वनित केलें आहे, पण तें युक्त दिसत नाहीं. पंढरपुरापासून सुमारें सात कोसांवर मंगळवेढें हें इतिहासप्रसिद्ध गांव आहे. तेथें शामा या नांवाची एक वेश्या रहात असे तिची कन्या कान्होपात्रा. प्रसिद्ध संत दामाजी हे मंगळवेढें येथेंच होऊन गेले व चोखामेळा तेथेंच अपघातानें मृत्यु पावले. हें गांव हल्लीं सांगली संस्थानांत असून तें तालुक्याचें ठिकाण आहे.

कान्होपात्रा रूपानें इतकी सुंदर होती कीं तिच्याइतकी सुंदर स्त्री त्या वेळीं त्या प्रांतांत दुसरी नव्हती. तिच्या आईनें एके दिवशीं तिला म्हटले, “ आपण राजवाड्यांत जाऊन राजाची भेट घेऊं. तूं चांगली सुंदर आहेस; राजा तुला पुष्कळ द्रव्य देईल. ” कान्होपात्रा म्हणाली, “ आई गे, माझ्या-योग्य असा पुरुष कोणी दिसत नाहीं हें तूं जाणतच आहेस. माझ्याहून जो पुरुष रूपवान् असेल त्यालाच मी वरीन. ” मुलीचें हें भाषण ऐकून कान्होपात्रेच्या आईनें राजाकडे जाण्याचा बेत रहित केला.

महाराष्ट्राच्या त्या भागावर त्या वेळीं कोणता राजा राज्य करीत होता हें जरी निश्चित सांगतां येणें शक्य नाहीं तरी त्या वेळीं महाराष्ट्रांत मुसलमानी राजसत्ता असल्यामुळें हा राजा म्हणजे एखादा नबाबच असावा असें वाटतें, किंवा नबाबाचा तो एखादा हिंदु मांडलीकही असेल. असो.

एके दिवशीं मंगळवेढ्यांतून कांहीं वारकरी लोक टाळ-मृदंग वाजवीत व भजन करीत पंढरपुरास चालले होते. कान्होपात्रेनें त्या वारकऱ्यांस मोठ्या

भक्तिभावानें नमस्कार केला व ' तुम्ही कोठें चाललां ? ' म्हणून विचारलें. ' आम्ही पंढरपुरास जातों, ' असें वारकऱ्यांनीं सांगितलें. तिची भाविक व प्रेमळवृत्ति पाहून त्यांनीं तिजपाशीं पांडुरंगाचे गुणानुवाद गायिले. कान्होपात्रेस वाटलें कीं आपणही पंढरपुरास जावें. ती वारकऱ्यांस म्हणाली, ' मी पंढरपुरास आलें तर पंढरीनाथ माझा अंगीकार करील काय ? ' वारकरी म्हणाले, ' यांत काय संशय ? आमचा पांडुरंग भक्तीचा भुकेला आहे. पिंगला ही तुझ्यासारखी गणिकाच होती, तिचा उद्धार ज्यानें केला तो तुझा अंगीकार कां करणार नाहीं ? ' मग आपल्या मातेची आज्ञा घेऊन कान्होपात्रा त्या वारकऱ्यांबरोबर पंढरपुरास गेली आणि महाद्वारीं बसून पांडुरंगाचे गुणानुवाद गाऊं लागली. ती म्हणाली, ' हे देवाधिदेवा भक्तवत्सला पांडुरंगा ! तुझी विमल कीर्ति श्रवण करून मी तुला शरण आल्यें आहें, तर मला पदरीं घे. ' असें म्हणून तिनें भगवंताच्या चरणीं मस्तक ठेविलें. पुढें ती पंढरीसच राहिली. नित्य चंद्रभागेचें स्नान करून आणि पांडुरंगाचें दर्शन घेऊन त्याच्याच भजनपूजनांत आपलें आयुष्य व्यतीत करण्याचा तिनें निश्चय केला व तो शेवटपर्यंत अखंड पाळला.

कान्होपात्रा पंढरपुरास येण्यापूर्वी, तिच्या आईनें आपला गणिकेचा व्यवसाय तिनेंही पुढें चालवावा एतदर्थ तिचें मन वळविण्याचा प्रयत्न केला नसेल असें नाहीं, परंतु कान्होपात्रेनें तिकडे लक्षच दिलें नाहीं. गणिका-कुलांत जन्म पावलेल्या या मुलीस एवढ्या लहान वयांत परमार्थाची आवड कशी उत्पन्न झाली हें एक कोडेंच आहे. पूर्वजन्मसंस्काराचाच हा परिणाम असला पाहिजे असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. असो.

एके दिवशीं कोणी गृहस्थानें बेदरच्या बादशाहाजवळ कान्होपात्रेच्या सौंदर्याची अतिशय तारीफ केली. तेव्हां, तिला बेदरास आणण्यासाठीं बादशाहानें शिपाई पाठविले. ते पंढरपुराजवळ येऊन दाखल झाले तेव्हां ती हकीकत कान्होपात्रेस समजली. त्या वेळीं तिनें पांडुरंगाचा धांवा केला. इतक्यांत बादशाहाचे शिपाई महाद्वारीं येऊन त्यांनीं बादशाहाचा निरोप कान्होपात्रेस सांगितला. ते म्हणाले, " तूं जर सुखासमाधानानें येत नसलीस तर तुला जबरदस्तीनें बेदरास नेण्याचा बादशाहानें आम्हांस हुकूम दिला

आहे." कान्होपात्रा त्यांस म्हणाली, " ठीक आहे. तुम्ही येथेंच असा. मी आंत जाऊन भगवंताचा निरोप घेऊन येत्यें." मग कान्होपात्रा पांडुरंगाजवळ गेली व हात जोडून म्हणाली:—

## अभंग

### १

पुरविली पाठ न सोडी खळ। अधम चांडाळ पापराशी १
वारितां नायके दुष्ट दुराचार। काय करूं विचार पांडुरंगे २
तूं माय माउली जगाची जननी। म्हणवोनी मिठी चरणीं घालीतसें ३
विनवी कान्होपात्रा जोडोनियां हात। आतां देहअंतसमय आला ४

### २

आपुल्या निढळीं लिहिलीं अक्षरें। तुम्हा खोटें खरें कोण म्हणे १
वायांच म्यां देवा धरिली आवडी। न पावे जोडी कांहीं केल्या २
आतां पंढरिनाथा नका पाहूं अंत। आला तो आघात निवारावा ३
म्हणोनि कान्होपात्रा येत लोटांगणीं। वारंवार विनवणी करीतसे ४

### ३

संचित माझें खोटें मज असे ग्वाही। तुम्हां बोल नाहीं देवराया १
मानिला भरंवसा परी जाहली निरास। आतां पाहूं वास कवणाची २
लागला तो पाठीं काळाचा दरारा। सोडवी दुसरा ऐसा कोण ३
तुझें म्हणविल्या शरण जाऊं कोणा। कान्होपात्रा म्हणे मना आणीं देवा ४

### ४

नको देवराया अंत पाहूं आतां। प्राण हा सर्वथा फुटों पाहे १
हरिणीचें पाडस व्याघ्रें धरियेलें। मजलागीं जाहलें तैसें देवा २
तुजवीण ठाव न दिसे त्रिभुवनीं। धांवें हो जननी विठाबाई ३
मोकलोनी आस जाहलें मी उदास। घेईं कान्होपात्रेस हृदयांत ४

ही कान्होपात्रेची प्रार्थना देवानें तत्काल मान्य केली. तिचे प्राण पांडुरंगानें आपल्या स्वरूपांत मिळवून टाकिले. साधुसंतांनीं त्या साध्वीचें प्रेत देवालयाच्या दक्षिणद्वारीं नेऊन पुरलें. त्या ठिकाणीं पुढें तरटीचा वृक्ष उगवला तो पंढरपुरीं अद्याप दृष्टीस पडतो असें सांगतात.

इकडे बादशाहाचे शिपाई महाद्वारीं बसले होते, त्यांनीं कान्होपात्रा अद्याप येत नाहीं असें पाहून, ती आंत काय करीत आहे म्हणून पुजाऱ्यांस वेचारलें. झालेली हकीकत पुजाऱ्यांनीं त्यांस निवेदन केली; पण ती त्यांना बरी वाटली नाहीं. मग त्यांनीं त्या बिचाऱ्या पुजाऱ्यांवर कान्होपात्रेस पळ-वेल्याचा आरोप ठेवून त्यांस गिरफदार केलें व बेदरास नेऊन बादशाहापुढें उभें केलें. पुजाऱ्यांनीं नारळ, बुका वगैरे प्रसाद बादशाहापुढें ठेविला. बादशाहानें प्रसाद घेतला तों त्यांत एक केंस निघाला. हा प्रकार पाहून बादशाहास मोठा क्रोध आला. 'केंस देवाचा आहे,' असें पुजाऱ्यांनीं त्यास सांगितलें व 'हें खोटें ठरल्यास आम्हांस वाटेल ती शिक्षा करा,' असेंही ते म्हणाले. मग एकंदर प्रकरणाचा खुलासा करून घेण्यासाठीं बादशाह स्वतः पंढरपुरास गेला. पांडुरंग कसेंही करून आपलें रक्षण करील या विश्वासानें पुजारीही स्वस्थ राहिले.

बादशाह पंढरपुरीं आल्यावर त्यानें जेव्हां श्रीविठ्ठलाचें तें मनोहर ध्यान पाहिलें तेव्हां त्याच्या मनांतला सगळा संशय फिटून तो फार संतोष पावला. त्यानें भगवंतास साष्टांग नमस्कार घातला व त्या पुजाऱ्यांस आलिंगून त्यांचा बहुमान केला. असो.

याप्रमाणें कान्होपात्रा आपल्या निस्सीम भक्तीच्या योगानें स्वानंदपद पावली व वेश्या असूनही संतमंडळांत तिनें आपलें नांव अजरामर करून ठेवलें. कान्होपात्रेची प्रार्थना ऐकून पांडुरंगानें तिला स्वस्वरूपीं लीन केलें अशी जी कथा वर आली आहे, तिचा विपर्यास करून, 'तुकारामबुवांस देहूच्या ब्राह्मणांनीं इंद्रायणींत बुडविलें' या बिनबुडाच्या विचित्र संशोधना-प्रमाणें, "कान्होपात्रा मुसलमानांच्या हातीं पडूं नये म्हणून बडव्यांनीं तिला राउळांत नेऊन तिचा खून केला व तिचें प्रेत गुपचूप पुरून टाकलें," असें संशोधन कांहीं दीडशहाण्या संशोधकांकडून पुढें मागें होण्याचा संभव आहे असा इशारा मी येथें अगोदरच देऊन ठेवतों.

कान्होपात्रेचे फक्त २३ च अभंग गाथ्यांत दिलेले आहेत, त्यांतले कांहीं अभंग येथें देतों:—

१

शिव तो निवृत्ति विष्णु ज्ञानदेव पाहीं ।
सोपान तो ब्रह्मा मूळमाया मुक्ताबाई १
धन्य धन्य धन्य धन्य निवृत्तिराया ।
धन्य ज्ञानदेव सोपान सखया २
प्रत्यक्ष पैठणीं भटां दाविली प्रचीती ।
रेडियाचे मुखें वदविली वेदश्रुति ३
चौदाशें वरुषांचे तप्तीतीररहिवासी ।
गर्व हरविला चालविलें भिंतीसी ४
धन्य कान्होपात्रा आजी झाली भाग्याची ।
भेटी झाली ज्ञानदेवाची म्हणूनियां ५

या अभंगाच्या शेवटच्या चरणांत 'ज्ञानदेवाची भेट झाली' अशा अर्थाचे शब्द आहेत, पण त्यांवरून कान्होपात्रेची व ज्ञानदेवांची प्रत्यक्ष भेट झाली होती असें समजावयाचें नाहीं. कारण तीं दोघें समकालीन नव्हतीं. कान्होपात्रेनें आळंदीस जाऊन ज्ञानदेवांच्या समाधीचें दर्शन घेतलें त्याला अनुलक्षून हे शब्द तिनें उपयोजिले असावेत.

२

वर्म वैरियाचे हातीं । देऊं नको गा श्रीपती १
तूं तों अनाथांचा नाथ । दीनदयाळ कृपावंत २
वेदपुराणें गर्जती । साही शास्त्रें विवादती ३
चरणीं ब्रीद वागविसी । तुझी कान्होपात्रा दासी ४

३

जीवाचे जिवलगे माझे कृष्णाई कान्हाई ।
सांवळे डोळसे करुणा येऊं दे कांहीं १
आला अपवाद ज्ञातिसंबंध लौकिक पाहीं ।
सांवळे डोळसे करुणा येऊं दे कांहीं २
दीनोद्धार ऐसें वेदशास्त्रें गर्जती पाहीं ।
सांवळे डोळसे करुणा येऊं दे कांहीं ३

शरण कान्होपात्रा तुजला वेळोवेळां पाहीं।
सांवळे डोळसे करुणा येऊं दे कांहीं ४

४

सकळही सुरवर येथेंचि लोधले। देवाचें देखिलें चरणांबुज १
हरली ती भूक तहान निमाली। संतांचीं देखिलीं चरणांबुजें २
कीर्तनाचे रंगीं आनंदें नाचतां। कान्होपात्राचित्ता समाधान ३

५

माझें माहेर पंढरी। सुखें नांदू भीमातीरीं १
येथें आहे मायबाप। हरे ताप दरुशनें २
निवारिली तळमळ चिंता। गेली व्यथा अंतरींची ३
कैशी विटेवरी शोभली। पाहुनि कान्होपात्रा धाली ४

६

दीन पतित अन्यायी। शरण आल्यें विठाबाई १
मी तों आहें यातिहीन। न कळे कांहीं आचरण २
मज अधिकार नाहीं। भेटी देईं विठाबाई ३
ठाव देईं चरणापाशीं। तुझी कान्होपात्रा दासी ४

७

जन्मांतरींचें सुकृत आजी फळासी आलें।
म्हणोनी देखिले विठ्ठलचरण १
धन्य भाग्य आजी डोळियां लाधलें।
म्हणोनी देखिले विठ्ठलचरण २
धन्य चरण माझे या पंथीं चालिले।
म्हणोनी देखिले विठ्ठलचरण ३
येऊनी देहासी धन्य झालें।
म्हणोनी देखिले विठ्ठलचरण ४
घालीं गर्भवासा कान्होपात्रा म्हणे।
जन्मोजन्मीं देखेन विठ्ठलचरण ५

८

सर्व सुखाचें जें निजसुखाचें सार गे माय।
तो हा पंढरिराय विटेवरी १
सकळ साराचें सार गे माय।
तो हा पंढरिराय विटेवरी २
सर्व साधनांचें जें कां निजसाधन गे माय।
तो हा पंढरिराय विटेवरी ३
जें कां जीवाचें जीवन कान्होपात्राचें निजधन गे माय।
तो हा पंढरिराय विटेवरी ४

९

पतितपावन म्हणविसी आधीं। तरी कां उपाधि भक्तामागें १
तुझें म्हणवितां दुजे अंगसंग। उणेपणा सांग कोणाकडे २
सिंहाचें भातुकें जंबुक पैं नेतां। थोराचिया माथां लाज वाटे ३
म्हणे कान्होपात्रा देह समर्पणें। करावा जतन ब्रीदासाठीं ४

गाथ्यांत कान्होपात्रेचे फक्त २६ च अभंग दिले आहेत हें पूर्वी सांगितलेंच आहे, पण याहून किती तरी अधिक अभंग कान्होपात्रेनें लिहिले असले पाहिजेत. गेल्या चारशें वर्षांत तिचे शेंकडों अभंग नष्ट झाले असतील; व जे अभंग उपलब्ध आहेत त्यांतले कांहीं क्षेपक दिसतात. फुटकळ कवितेचें असेंच आहे. एखादा सलग ग्रंथ असेल तर तो जशाचा तसा टिकून राहतो, पण स्फुट कविता कालांतरानें हळूहळू कमी होत जातात. नामदेव-तुकारामासारख्यांचीही बरीच कविता अशा रीतीनें नष्ट झालेली आहे.

# प्रेमाबाई

**नाठवे आपुलें आणि परावें। सम विषम नाहींच ठावें।**
**सर्वां भूतीं सारिखाचि भाव। एकचि जीव मानीतसे॥**

—महीपति

प्रेमाबाईची अगदींच थोडी कविता उपलब्ध आहे व कवयित्री म्हणून तिची फारशी प्रसिद्धीही नाहीं. पण तिचीं जीं चार पांच पदें प्रसिद्ध आहेत तीं इतकीं प्रेमळ आणि रसभरित आहेत कीं त्यांच्याच जोरावर महाराष्ट्र संत-कवयित्रींत तिची गणना करण्यास हरकत नाहीं. प्रेमाबाईचें वास्तव्य-स्थान, काल, जात व संप्रदाय यांच्यासंबंधानें कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. तथापि संतचरित्रकार महीपति यांनीं आपल्या भक्तलीलामृताच्या ४२ व्या अध्यायांत या साध्वीचें चरित्र अत्यंत रसाळ भाषेंत लिहिलें आहे व त्याच्याच आधारानें हे दोन शब्द लिहिण्याचा प्रयत्न मी करीत आहें.

प्रेमाबाई ही विधवा स्त्री गोदाकांठच्या कोणत्या तरी गांवीं रहात असून ती अत्यंत सत्त्वसंपन्न होती. तिला ज्ञान, वैराग्य, ध्यानधारणा, योग इत्यादि परमार्थमार्गासंबंधानें कांहींएक माहिती नव्हती. पण भगवंताच्या ठायीं तिची निष्ठा अढळ होती व तिच्या जोरावर भगवंतास तिनें आपलासा करून घेतला. हें आपलें आणि तें दुसऱ्याचें असला भेदभाव तिला ठाऊक नव्हता; सर्वांभूतीं एकच परमात्मा वास करीत आहे अशी तिची पूर्ण श्रद्धा असल्या-मुळें, भूतमात्राचे ठायीं ती अत्यंत दयाशील असे. नित्य गंगास्नान, भागवत-श्रवण आणि हरिकीर्तन करावें, संतसाधु आणि प्रेमळ वैष्णव येतील त्यांस आपल्या घरीं बोलावून यथाशक्ति भोजन घालावें, आणि सदासर्वदा नाम-स्मरण करावें हा तिचा नित्यक्रम होता. ती पुराणश्रवणास बसली म्हणजे प्रेमानें तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वहात; व हा तिचा प्रेमळपणा पाहून

साधुसंतांनीं तिचें नांव 'प्रेमाबाई' ठेविलें. एके दिवशीं प्रेमाबाई पुराण-श्रवणास जाणार तोंच कित्येक साधुसंत तिच्या घरीं आले. ते उपवासी होते. प्रेमाबाईनें विचार केला कीं आपण जर आतां कीर्तनास गेलों तर हे साधु-संत उपाशी राहतील; म्हणून कीर्तनास न जातां आपण यांची सेवाचाकरी करावी हेंच युक्त होय. असा विचार करून त्या संतांच्या भोजनाच्या व्यव-स्थेस ती लागली. पण तिचें लक्ष मात्र पुराणाकडे लागलें होतें. मंदिरांत पुराणिकबुवांनीं इतक्यांत पुराण सुरू केलें असेल, पण तें आज आपणांस चुकणार; हा विचार मनांत येऊन तिला फार वाईट वाटलें. मग तिनें आपल्या दहा वर्षांच्या मुलास ' पुराणास जाऊन सगळी कथा लक्षपूर्वक ऐक व ती मला येऊन सांग ' अशी आज्ञा केली व त्याप्रमाणें तो मुलगा निघून गेला. इकडे प्रेमाबाई संतांच्या सेवेस लागली, पण डोंगरावर चरणाऱ्या गाईचें लक्ष जसें वत्साकडे लागलेलें असतें तसें प्रेमाबाईचें लक्ष मुलगा पुराणाहून येतो कधीं व आपण सगळी कथा ऐकतों कधीं, या विचारांत गुंतलें होतें.

पाकनिष्पत्ति झाल्यावर ते साधुसंत नदीवर स्नान करून आले; त्यांचें पादप्रक्षालन करून तें तीर्थ प्रेमाबाईनें मोठ्या भक्तिभावानें प्राशन केलें. नंतर तिनें पात्रें वाढलीं व 'श्रीकृष्णार्पण' म्हणून संकल्प सोडला. सगळे संत भोजन करून तृप्त झाले. इतक्यांत, प्रेमाबाईचा मुलगा पुराणश्रवणार्थ गेला होता तोही आला. प्रेमाबाईनें पुत्रासह भोजन केलें व नंतर पुराणिकांनीं सांगितलेली कथा ऐकण्यासाठीं ती आपल्या पुत्रापाशीं येऊन बसली. ते साधूही कथाश्रवण करीत होते. प्रेमाबाईच्या मुलानें जी कथा सांगितली ती महीपतिबावांनीं इतक्या प्रेमळ आणि कवित्वपूर्ण भाषेत वर्णिली आहे कीं, त्या सर्वच ओंव्या येथें उतरून घेण्याचा मोह मला आवरत नाहीं:—

**" नंद-यशोदेचे घरीं । श्रीकृष्ण अवतरला गोकुळीं ।**
**यशोदा स्वयें दधि घुसळी । तों जवळ वनमाळी पातला ॥ ३९ ॥**
**स्फुंदस्फुंदोनि रडे जगज्जीवन । म्हणे मज देईं स्तनपान ।**
**यशोदेनें ठेवूनि घुसळण । आडवा श्रीकृष्ण घेतला ॥ ४० ॥**
**मुखीं घालोनि एक स्तन । आवडीनें चोखीत जगज्जीवन ।**
**दुसरा हातीं धरोनि जाण । मातेचें वदन पाहत ॥ ४१ ॥**

यशोदेचें भाग्य परम। मायातीत परब्रह्म ।
तो सगुणरूपें पुरुषोत्तम। प्रेमें स्तनपान करीतसे ॥ ४२ ॥
ऐसे समयीं ते अवसरीं । मनांत विचार करी श्रीहरि ।
म्हणे मातेची प्रीत मजवरी । किंवा संसारीं हें पाहूं ॥ ४३ ॥
ऐसें चित्तीं विचारून। अग्नीसि आज्ञा केली कृष्णें ।
म्हणे तुवां प्रदीप्त होऊन । दूध उतव सत्वर ॥ ४४ ॥
ऐसें इच्छितां जगन्निवास । तों जातवेद चेतला विशेष ।
दूध उतलें निःशेष । घ्राणासि वास पातला ॥ ४५ ॥
करपट दुधाची येतां घाणी । तों यशोदेसि कळलें मनीं ।
मग स्तन काढितां मुखांतूनी । चक्रपाणि रडतसे ॥ ४६ ॥
तैसाचि टाकोनि घननीळ । यशोदा गेली चुलीजवळ ।
तों दूध उतोनि गेलें सकळ । म्हणवोनि तळमळ करीतसे ॥ ४७ ॥
गांठीचा परीस टाकोनि पाहें । किमया करूं गेली माय ।
तों तेथें नास्तिकवाद होय । तैसीच सोय ते झाली ॥ ४८ ॥
क्षीरसमुद्र सांडोनि जाण । शेळीसी घातलें मेळवण ।
स्तनासि हात घालितां जाण । तों दुहोनि नेली आणिकेंचि ॥ ४९ ॥

* * *

तैसें श्रीकृष्ण परब्रह्म टाकोनी । प्रपंचाकडे गेली जननी ।
तों दुधाणें रितें देखोनी । तळमळ मनीं करीतसे ॥ ५२ ॥
असो, इकडे श्रीकृष्ण । चित्तीं जाहला क्रोधायमान ।
म्हणे मजपरीस जननीचें मन । प्रपंचीं निमग्न असे कीं ॥ ५३ ॥
प्रेमपान्हा पाजितां पाहें । प्रपंचाकडे गेली माय ।
तरी ईस जेणें शिक्षा होय । तैसा उपाय करावा ॥ ५४ ॥
ऐसें म्हणोनि त्या अवसरा। कृष्णें लवंडिला घुसळणडेरा ।
शिशु बाळकें आणीत सत्वरा। आपुल्या घरा श्रीहरि ॥ ५५ ॥
संचित लोणी होतें कांहीं । तें गडियांना वांटिलें सर्वही ।
आपुल्या हातें शेषशायी । भाजनें सर्वही फोडित ॥ ५६ ॥
इतुका अन्याय केला कृष्णें । तों यशोदा आली घरांतून ।
तों दहीं लवंडिलें जगज्जीवनें । वांटिलें माखण पोरांसी ॥ ५७ ॥

हें यशोदेनें देखोनि नयनीं । परम संताप वाटला मनीं ।
म्हणे याजऐसा अगोचर कोणी । त्रिभुवनींही दिसेना ॥ ५८ ॥
लेंकुरें असती घरोघरीं । परी हा अनिवार सर्वांपरी ।
सांगती गाऱ्हाणीं गांविंच्या नारी । तीं यथार्थ अंतरीं मज वाटे ॥ ५९ ॥
ऐसें म्हणोनि यशोमती । हातीं घेतली वेताटी ।
देखोनि पळतसे जगजेठी । माता पाठीं धांवतसे ॥ ६० ॥
क्षण एक हरि दिसे नयनीं । तयासि धरूं पाहे जननी ।
तों अदृश्य होय चक्रपाणि । सवेंचि ते क्षणीं दिसत ॥ ६१ ॥
यशोदा पाहे लवडसवड । तों हरि लपे भिंतीआड ।
गवळणी म्हणती दीधला लाड । तेव्हां कोड वाटलें ॥ ६२ ॥
आम्हीं नित्य सांगूं गाऱ्हाणीं । कीं खोडी करितो चक्रपाणि ।
तें असत्य वाटे तुजलागोनी । आतां अनुभव मनीं आला कीं ॥ ६३ ॥
यशोदा पाहे बिदोबिदीं । तंव कृष्ण लपे सांदोसादीं ।
गौळणीची मिळाली मांदी । परी कृष्ण त्रिशुद्धी नातुडे ॥ ६४ ॥
मातेचें भय वागवोनि थोर । भयें पळतसे सारंगधर ।
दोन प्रहर आला दिनकर । उष्ण तीव्र जाहलें ॥ ६५ ॥
धांवतां पळतां साचार । जननीसी श्रम जाहला फार ।
घर्मेंकरूनि निथळे सुंदर । कैसा विचार करावा ॥ ६६ ॥
म्हणे एकदां लागता माझ्या हातीं । मग त्यासी न सोडीं कल्पांतीं ।
हृदयमंदिरीं निश्चिती । बांधोनि श्रीपति टाकितें ॥ ६७ ॥
ऐसें मातेचें अंतर । जाणोनियां करुणाकर ।
म्हणे जननीसी श्रम झाला फार । आतां स्थिर असावें ॥ ६८ ॥
यशोदा पाहे चपळ दृष्टी । तों पुढें देखिला जगजेठी ।
मग सत्वर धरितसे मनगटीं । क्रोध पोटीं न समाये ॥ ६९ ॥
मग फरफरां ओढित चक्रपाणि । यशोदा घेऊनि आली सदनीं ।
मंदिरीं मिळोनि सकळ गौळणी । नंदराणी गोफाटिती ॥ ७० ॥
मग होऊनि यशोदेसमोर । म्हणती तुझा कृष्ण चोर जार ।
आम्हीं सांगों निरंतर । तें असत्य उत्तर तुज वाटे ॥ ७१ ॥

आज घरीं लवंडिला गोरस । यास्तव धरिलें कृष्णास ।
आतां उखळीं बांधोनि टाकीं यास । शिक्षा नसे आन कांहीं ॥ ७२ ॥
ऐसें बोलतां व्रजनारी । तों स्फुंदस्फुंदोनि रडे मुरारि ।
अश्रुपात वाहती नेत्रीं । परी मातेसि अंतरीं कींव न ये ॥ ७३ ॥
दावें सोडोनि लवलाहें । यशोदा कृष्णासि बांधों जाय ।
तंव तें वीतभर उणें राहे । गांठ नये सर्वथा ॥ ७४ ॥
मग दुसरें दावें ते अवसरीं । यशोदा आणोनि लावी सत्वरीं ।
तों आणिक पाहिजे वीतभरी । म्हणे कैशी परी करावी ॥ ७५ ॥
एकमेकांसी लावितां दोर । परी कदा न पुरती साचार ।
दावीं लाविलीं नवलक्षवर । परी उणें वीतभर येतसे ॥ ७६ ॥
गौळणी आपुलाल्या सदनीं जाऊनी । चऱ्हाटें देताति आणोनी ।
म्हणती कृष्णासि उखळीं बांधोनी । शिक्षा जननी लावीं वो ॥ ७७ ॥
घरचीं नवलक्ष असतां दावीं । आणि घरोघरचीं आणिलीं सर्वही ।
एक एकासी यशोदा लावी । परी तीं कदाही न पुरती ॥ ७८ ॥
वैष्णवी मायेनें भुलविल्या गौळणी । तैशाच रीती यशोदा जननी ।
जो कां विश्वंभर चक्रपाणि । अवतरे सदनीं नंदाच्या ॥ ७९ ॥
ज्याच्या रोमरंध्रीं ब्रह्मांडें । मातील येवढें प्रचंड धेंड ।
तयासी यशोदा बांधूं पाहे कोडें । नवल चोखडें हेंच कीं ॥ ८० ॥
अरूप अनाम साचार । ब्रह्मादिकांसि न कळे पार ।
त्यासि बांधावया न पुरे दोर । हें साचार कळेना ॥ ८१ ॥
आकाश थोर वाडपणीं । गोचर सर्वांसि दिसतसे नयनीं ।
त्यासी घालावया गवसणी । आणावी कोठुनी कळेना ॥ ८२ ॥

* * * *

तैशाचि रीती यशोदा माय । कृष्णासि दोर बांधों जाय ।
परी तो अपार अनंत आहे । यालागीं न समाये चऱ्हाटीं ॥ ८५ ॥
परी यशोदा म्हणे माझा कुमर । गौळणी भाविती नंदकिशोर ।
म्हणवोनी नवलक्ष लावोनि दोर । सारंगधर बांधिती ॥ ८६ ॥
परी वीतभर उणें दिसतसे दिठीं । पदरीं सर्वथा नये गांठी ।
म्हणोनि यशोदा होतसे कष्टी । म्हणे कैसी गोष्टी करूं आतां ॥ ८७ ॥

**एकदां बंधनामाजी येता । मग मी न सोडितें कृष्णनाथा ।**
**जाणोनि मातेच्या मनोगता । कृपा भगवंता उपजली ॥ ८८ ॥**
**म्हणे मज बांधावया निश्चिती । कष्टी होतसे यशोदा सती ।**
**आतां यांची जी मनोवृत्ति । तैसीच निश्चिती हो सुखें ॥ ८९ ॥**
**ऐसें चिंतितां चक्रपाणि । तों दोर पुरला तेच क्षणीं ।**
**सत्वर गांठ देतसे जननी । हांसती गौळणी सर्वत्र ॥ ९० ॥**
**उखळीं बांधितां जगज्जीवन । मातेसी विलोकी दीनपणें ।**
**म्हणे खोडी न करीं मी आजपासून । मुक्त बंधन करीं कां ॥ ९१ ॥**
**ऐसें म्हणोनि पूतनारि । टपटपां आंसुवें गाळीत नेत्रीं ।**
**माता टाकोनि तैसेचपरी । लागे मंदिरीं निजकार्या ॥ ९२ ॥**

वरील उताऱ्यांत वर्णिलेला कथाभाग श्रवण करीत असतांना प्रेमाबाईची चित्तवृत्ति अगदीं तल्लीन झाली होती. कथेंतला सगळा प्रकार आपल्या डोळ्यांदेखत घडत आहे असेंच तिला वाटलें. श्रीकृष्णास बंधन केलेलें पाहून हांसणाऱ्या गौळणींची प्रेमाबाईनें निर्भर्त्सना केली. भगवंतास कोणी बंधमुक्त करीत नाहीं या विचारानें त्या प्रेमळ साध्वीस अत्यंत दुःख झालें. भगवान् श्रीकृष्णाच्या बालमूर्तीस उखळास बांधले असून तो रडत आहे, आणि तरी कोणाला त्याची दया येत नाहीं हें तिला अगदीं असह्य झालें. गहिंवरानें तिचा कंठ दाटून आला. डोळ्यांतून अश्रूंच्या सारख्या धारा चालल्या. मग ती आपल्या पुत्रास म्हणाली, " बाळा, हा संसाराचा सगळा व्याप मी आतां तुजकडे सोंपवितें आणि सत्वर गोकुळांत जाऊन श्रीकृष्णास बंधमुक्त करितें. " इतके शब्द उच्चारतांच, प्रेमाबाईचा आत्मा तिच्या नश्वर देहाचा त्याग करून चित्स्वरूपीं जाऊन मिळाला. तिच्या घरीं आलेल्या साधुसंतांस तिच्या या उत्कट कृष्णभक्तीचें मोठें आश्चर्य वाटलें. प्रेमाबाईच्या प्रेतावर अकस्मात् परिमलद्रव्यें आणि तुलसीदलें येऊन पडलीं ! तो चमत्कार पाहून त्या सत्पुरुषांनीं प्रेमाबाईचा जयजयकार केला. येथें प्रेमाबाईचें चरित्रहि संपलें. कै. वि. का. राजवाडे यांनीं प्रेमाबाईचा काल शके १५८० हा दिला आहे, परंतु तो कशाच्या आधारानें दिला आहे हें समजत नाहीं. तिच्या कवितेच्या भाषेवरून ती शके १५८० नंतर बऱ्याच वर्षांनीं होऊन गेली असावी असें वाटते.

प्रेमाबाईची कविता बरीच असावी असा तर्क आहे, परंतु आतां तिचीं तीन चार पदेंच काय तीं उपलब्ध आहेत; इतर कवितांचा पत्ता नाहीं. पुढें दिलेल्या पद्यांवरून प्रेमाबाईच्या वाणीचा प्रेमळपणा वाचकांस पटल्याशिवाय राहणार नाहीं अशी माझी खात्री आहे.

१

गडे हो कृष्णगडी आपुला । यमुनाडोहीं बुडाला ॥ ध्रु० ॥
काळिया डसेल जरि हरिला । होइल विषबाधा त्याला ।
हाका मारिल आपुल्याला । तुम्हि तरि स्वस्थ कसे बसलां ।
अतां कोण काढिल रे त्याला । यमुनाडोहीं बुडाला ॥ १ ॥
गाई त्याविण हंबरती । वासरें स्तनपान न करिती ।
त्यापरि गोप सर्व रडती । मुखानें कृष्ण कृष्ण म्हणती ।
अतां काय भेटेल आपुल्याला । यमुनाडोहीं बुडाला ॥ २ ॥
यशोदा पुसेल जरि हरिला । सांगों काय तरी तिजला ।
नंद म्हणेल त्वां नेला । हलधर मारिल तो मजला ।
अतां काय जावें गोकुळाला । यमुनाडोहीं बुडाला ॥ ३ ॥
दहिं दुध लोणी म्यां हरिलें । हरिला ताक बळें दिधलें ।
घेइना म्हणोनि करिं धरिलें । वृक्षीं बळकट बांधियलें ।
म्हणोनी तो मजवरि रुसला । यमुनाडोहीं बुडाला ॥ ४ ॥
पेंदा धांवुनियां आला । बळकट वृक्षाला डसला ।
त्याचे पाठीवर बसला । ओझें झालें बहु त्याला ।
म्हणुनियां पळत पळत आला । भेटला प्रेमाबाईला ॥ ५ ॥

२

गडे हो कृष्णगडी आपुला । राजा मथुरेचा झाला ॥ ध्रु० ॥
टाकुनि काळा कांबळा । कासे पीतांबर कसिला ।
टाकी मयूरपिच्छांला । जडित मुकुट घातला ।
अतां काय ओळखिल आपुल्याला । राजा मथुरेचा झाला ॥ १ ॥
टाकुनि गुंजांची दाटी । घातला कौस्तुभ श्रीकंठीं ।
टाकुनि मुरली वेताटी । करिं घे आयुधें गोमटीं ।
अतां काय बागुलभय त्याला । राजा मथुरेचा झाला ॥ २ ॥

**गोधनें चारूं विसरला । अतां तो नृपांमधें शिरला ।**
**नारिनें उरीं धरुनि चुरला । अतां तो कुब्जेनें वरिला ।**
**देतसे निज पद प्रेमेला । राजा मथुरेचा झाला ॥ ३ ॥**

वरील कविता म्हणजे एका अशिक्षित भाविक स्त्रीची साधी प्रेमळ वाणी आहे. तिच्या साधेपणामुळेंच तिला एक प्रकारची हृदयंगमता प्राप्त झाली असून प्रसाद तर तींत अगदीं पूर्णपणें भरून राहिला आहे. शिवाय मनुष्य-स्वभावाचें सहजसुंदर वर्णन तींत किती उत्तम प्रकारें ग्रथित झालें आहे हें रसिकांस तरी सांगावयास नकोच. वरील दोन्ही पदें पुनः पुनः वाचूनही मनाची तृप्ति होत नाहीं व हेंच काव्यसौंदर्याचें मुख्य लक्षण होय. साधु-संतांनीं त्या साध्वीस दिलेलें प्रेमाबाई हे नांव अगदीं अन्वर्थक होतें यांत शंका नाहीं. वरील पदांच्या चाली तर इतक्या लोकप्रिय झाल्या आहेत कीं सुप्रसिद्ध अर्वाचीन कवि विठोबा अण्णा दफ्तरदार व बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णा किर्लोस्कर यानींही आपलीं कांहीं पदें त्याच चालीवर रचिलीं आहेत.

खालीं दिलेल्या पदाचा शेवटचा चरण उपलब्ध नसल्यामुळें तें पद अमक्याच कवीचें आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. परंतु त्या पदाची चाल व एकंदर रचना लक्षांत घेतां तें प्रेमाबाईचेंच असावें असें वाटतें:—

**गव्यांनों अपुल्या कृष्णाला । अक्रूर नेतो मथुरेला ॥ ध्रु० ॥**

**दोघे रथावरी बसती । यशोदा नंद गोप रडती ।**
**अक्रूरासि सर्व नमिती । त्याच्या दया नये चित्तीं ।**
**म्हणवुनि जाउं मारुं त्याला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ १ ॥**

**गोपी फारचि तळमळती । करानें वक्ष भाळ पिटिती ।**
**हरिला जाउं नको म्हणती । अश्रुंनीं सर्वांगें भिजती ।**
**पुढें तो गेला यमुनेला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ २ ॥**

**ऐकुनि सर्व गोप भ्याले । धावुनि हरीजवळि आले ।**
**मूर्च्छित रथाजवळि पडिले । हरिनें हृदयीं कवळीले ।**
**देव मग फारचि गहिंवरला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ ३ ॥**

**तुजविण आम्हां नाहिं कोणी । म्हणुनी सर्व जाउं मरुनी ।**
**परि ये चिंता एक मनीं । कंस तुज नेइल बा धरुनी ।**
**तेथें कुणि नाहीं बा तुजला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ ४ ॥**

'जाउनि सांगा श्रीहरिला। एकदां भेट सुदामाला' हें लोकप्रिय पदही याच चालीवर असून तेंही प्रेमाबाईचेंच असावें असें वाटतें; व यावरून श्रीकृष्ण-चरित्रांतील अनेक प्रसंगांवर प्रेमाबाईचीं आणखी बरींच पदें असलीं पाहिजेत असाही तर्क संभवतो. 'माझा भरत देखिला काय । कुणि तरि सांगा हो' हें प्रसिद्ध पद्य प्रेमाबाईचेंच होय.

# बहिणाबाई

ह्या संत-कवयित्रीचें चरित्र पुष्कळ बाबतींत अगदीं अद्वितीय आहे. अगदीं लहानपणापासूनच हिचा परमार्थाकडे ओढा; त्यामुळें हिच्या आयुष्यांत अशा कांहीं विचित्र गोष्टी आरंभापासूनच होत गेल्या आहेत कीं तशा प्रकारच्या गोष्टी दुसऱ्या कोणत्याही संताच्या किंवा संतिणीच्या चरित्रांत बहुधा सांपडणार नाहींत. हिच्या चरित्रांत आलेली गाईच्या वासराची गोष्ट मोठी विस्मयजनक आहे. त्याचप्रमाणें, बहिणाबाईनें आपल्या तेरा जन्मांची जी हकीकत दिलेली आहे ती जर विश्वसनीय मानली तर 'पूर्वजन्म आणि पुनर्जन्म' या विषयाचा विचार करणारांस ती फार उपयुक्त वाटेल. मानसशास्त्राच्या दृष्टीनेंही तिच्या चरित्रांतील कांहीं घटना अत्यंत विचारणीय आहेत. भगवत्कृपासंपन्न व्यक्तीचा छल करणाऱ्या दुर्जनास, त्याच्या दुष्कृत्याचें प्रायश्चित्त कसें ताबडतोब भोगावें लागतें हें प्रस्तुत चरित्रांतील मंबाजीच्या कथेवरून दिसून येईल. त्याचप्रमाणें, दुष्ट मंबाजीनें बहिणाबाईच्या गाईस मारलें असतां, त्या माराचे वण तुकाराममहाराजांच्या पाठीवर उठले ही हकीकत स्वतः बहिणाबाईनींच सांगितलेली असल्यामुळें ती खरी मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. श्रीसमर्थ रामदासस्वामी, आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर, केशवस्वामी भागानगरकर, रंगनाथस्वामी निगडीकर, जयरामस्वामी वडगांवकर, इत्यादि अनेक ब्राह्मण संत त्या वेळीं विद्यमान असतां तुकाराममहाराजांसारख्या ब्राह्मणेतर संतांचा उपदेश घेण्याकडे बहिणाबाईसारख्या ब्राह्मणस्त्रीची प्रवृत्ति कशी झाली हा प्रश्नही चिंतनीय आहे.

जुन्या संतकवि—कवयित्रींपैकीं ज्यांनीं आपल्या कवितेंत थोडेंबहुत आत्मवृत्त दिलें आहे त्यांपैकीं संत बहिणाबाई या एक होत. यांना तुकारामबुवा देहूकर यांचा अनुग्रह असून त्यांच्या सान्निध्यांत त्या कांहीं वर्षें राहिल्या

होत्या. समर्थांच्या चरित्रांतही एका बहिणाबाईचा उल्लेख आढळतो. त्यामुळें बहिणाबाई या नांवाच्या दोन संत-कवयित्री होऊन गेल्या असाव्या अशी कांहीं लेखकांची समजूत झालेली दिसते, पण ती बरोबर नाहीं. यासंबंधानें माझे गुरु ह. भ. प. पांगारकर हे आपल्या श्रीतुकारामचरित्रांत[1] लिहितात, " बहिणाबाईचें नाव तुकोबांच्या शिष्यांत आहे व रामदासस्वामींच्या शिष्यांतही आहे; तेव्हां बहिणाबाई वारकरी कां रामदासी, कां बहिणाबाई दोन अशा शंका निघाल्या होत्या; पण मी स्वतः शिऊर येथें तीन दिवस राहून सर्व पोथ्या व कागदपत्र पाहून आलों असून, हा निश्चितार्थ सांगतों कीं बहिणाबाई एकच आहेत. ह्यांना तुकोबांचा उपदेश होता व उत्तरवयात त्या समर्थांच्या संगतीला असून समर्थांनीं त्यांना दिलेली प्रादेशमात्र ( वीतभर ) दास–मारुतीची मूर्तीही त्यांच्या राममंदिरांत पूजेंत आहे. "

बहिणाबाईचा जन्म शके १५५० मध्यें झाला व शके १६२२ त त्या समाधिस्थ झाल्या. आतां त्यांच्याच अभंगबद्ध आत्मचरित्राधारें व जरूर तेथें त्यांच्याच शब्दांत त्यांचें मनोरंजक चरित्र येथें देतों. बहिणाबाई लिहितात, " वेरूळच्या पश्चिमेस असलेलें देवगांव हें माझें माहेर. या देवगांवांत सर्व देवांनीं वस्ती केली आहे. हिमालयांतून अगस्ति ऋषि दक्षिणेंत आले तेव्हां त्यांनीं या देवगांवीं चातुर्मासांत मुक्काम केला होता. गांवाच्या पश्चिमेस ' शिवनद ' वाहात असून तें मोठें तीर्थ आहे. या पवित्र स्थलीं अगस्तिमुनि अनुष्ठानार्थ नित्य सूर्योदयीं येत असत. या तीर्थानजीक असलेल्या लाक्षाग्रामांत ' लक्ष तीर्थें वास करतील व तेथें स्नान, दान आणि जप–अनुष्ठान करणाऱ्या मनुष्यास सिद्धि प्राप्त होईल, ' असा वर अगस्ति मुनींनीं दिला आहे. अशा या पुण्यपावन देवगांवीं तेथील 'लेखक' ( अर्थात् ग्रामलेखक कुळकर्णी ) आऊजी कुळकर्णी यांच्या कुळांत माझा जन्म झाला. माझ्या पित्याचें नांव आऊदेव व मातेचें नांव जानकी. हे वाजसनेयी शाखेचे यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. आरंभीं बरींच वर्षें त्यांस कांहीं संतति नव्हती; म्हणून त्यांनीं लक्षतीर्थावर नित्य स्नान करून शिवाचें अनुष्ठान करण्याचा क्रम सुरू केला. पुढें कांहीं

---

१ द्वितीयावृत्ति, पृष्ठ ४३३.

दिवसांनीं आऊदेव ऊर्फ आऊजी यांस स्वप्नांत दृष्टांत झाला कीं, 'तुला एक कन्या आणि दोन पुत्र होतील.' नंतर एक वर्षानें माझा जन्म झाला.

"बारशाचा उत्सव मोठ्या थाटाचा झाला. ब्राह्मण जेवून आपापल्या घरीं गेले व आऊदेव अरण्यांत गेले. त्यांस अरण्यांत वेरूळच्या वाटेवर पीतांबराच्या गांठीस बांधलेली मोहोर सांपडली. तेव्हां घरीं येऊन ते आनंदानें म्हणाले, 'कन्या आमच्या लाभावर जन्मली आहे.' वीरेश्वर ब्राह्मण नामक ज्योतिषानें माझी जन्मपत्रिका तयार केली. 'ह्या मुलीच्या योगानें तुमचें कल्याण होईल,' असें पत्रिकेचें फळ त्यानें बाबांस सांगितलें. 'या मुलीची देवभक्तीकडे विशेष प्रवृत्ति होईल व ही दीर्घायुषी होईल' असेंही ज्योतिषीबुवांनीं सांगितलें. तेव्हां त्यांस आऊदेव यांनीं वस्त्र व गाय देऊन त्यांची संभावना केली. पुढें योग्य वेळीं कन्यादानाचा प्रश्न उपस्थित झाला तों सुदैवानें सिऊर[2] येथील एक नातेवाईक अकस्मात् घरीं आला व त्यानें मला मागणी घातली. पुढे सुमुहूर्तावर लग्न झालें. लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं आऊदेव यांस पुत्र झाला, तेव्हां लोक म्हणूं लागले कीं, 'ही मुलगी भाग्यवान् आहे.'"

पुढें बहिणाबाई सांगतात. "माझ्या पित्याचें गोत्र मौनस व भ्रताराचे गोत्र गौतम. माझा भ्रतार शिवपुर ऊर्फ शिऊर येथील ज्योतिषी होता. त्याचें नांव रत्नाकर; आडनांव पाठक. त्याची पहिली बायको वारली होती. त्याच्याशीं, त्याच्या वयाच्या ३० व्या वर्षी माझें लग्न झालें. 'द्वितीय संबंधी वरुषां तिसांचा। नोवरा भाग्याचा ज्ञानवंत.' त्यास कन्यादान करून 'आदण दिधलें सर्व

१ 'होईल संतान कन्या दोन पुत्र' असे बहिणाबाईचे मूळ शब्द आहेत व त्यांचा 'दोन कन्या व एक पुत्र' असाही अर्थ होईल.

२ देवगांवचे पश्चिमेस पांच कोसांवर (शिवपुर) शिऊर आहे.

३ हें पाठक घराणें शाक्तपंथी होतें. "बहिणाबाई शाक्तांच्या घराण्यांत दिली गेली म्हणूनच बहुधा वारकरी मंडळांत तिच्या अभंगांची प्रसिद्धि नाहीं," असें ह. भ. प. पांगारकर यांनीं लिहिलें आहे.

कांहीं.' बहिणाबाईच्या आणि तिच्या नवऱ्याच्या वयांत येवढें भयंकर अंतर असतांही, ती त्यासंबंधानें कांहीं नाखुषी तर दाखवीत नाहींच, पण उलट नवऱ्याची स्तुति करीत आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. "माझें लग्न होऊन चार वर्षें झाल्यावर, माझ्या बापाचा एक गोत्रज होता त्याच्याशीं माझ्या बापाचें वैमनस्य येऊन वृत्तीविषयीं कलह उत्पन्न झाला. तेव्हां माझ्या बापानें माझ्या भ्रताराश निरोप पाठविला कीं,

**गोत्रजाची फेडा बाकी साकी रीण। मागती लिहून शेत मळा ॥**
**आतां येथोनियां जावें परदेशासी । तरीच आम्हासी सुख होय ॥**
**तूं सखा सोयरा जांवाई मित्र तूं । आमुचा हा अंतु पाहूं नको ॥**
**घातलेंसे बंदी सोडवील कोण । तूं सखा होऊन सोडवावें ॥**

हा निरोप मिळतांच माझे भ्रतार देवगांवीं आले व मध्यरात्रीं घर व गांव सोडून आम्हीं सर्व मंडळी त्याच्याबरोबर गोदातीरीं आलों. प्रवरासंगमीं गोदास्नान करून आम्ही सिद्धनाथाचें दर्शन घेतलें. नंतर आम्ही महादेवास जाण्यास निघालों. परंतु :—

**गंगा देखोनियां सिद्धेश्वर देव । तेथोनियां जीव निघों नेणे ॥**
**आवडीचा हेतु पूर्वील संस्कार । श्रवणीं आदर कीर्तनाचे ॥**
**पुराणश्रवण पूजा देवस्थान । ब्राह्मणपूजन प्रीति यांची ॥**
**संन्यासी सज्जन संत महानुभाव । यांचे पायीं जीव लागलासे ॥**
**निघतां येथून थोर वाटे दुःख । अदृष्ट करंटें काय कीजे ॥**
**बहेणी म्हणे पुढें महादेवा जावें । भ्रतार गौरवें नेत आम्हां ॥**

वाटेंत आम्ही आपला निर्वाह भिक्षेवर चालविला होता. नाना प्रकारचे कष्ट सोसले. माता, पिता, बंधु यांसह आम्ही महादेव-वनांत जाऊन नरसिंह-दर्शन घेतलें व पुढें भीमातीरीं पंढरपुरास आलों. तेथील सुखसोहळा काय वर्णावा ?

**भीमा चंद्रभागा पुंडलीक भक्त । वेणुनादीं मुक्त प्राणीमात्र ॥**
**पद्मालयीं स्नान देवाचें दर्शन । नामसंकीर्तन आइकिलें ॥**
**राही रखुमाई सत्यभामा सर्व । देखियेलें पूर्वद्वारयुक्त ॥**

**महाद्वारांतूनी करितां प्रवेश । वाटलें मनास महासौख्य ॥**
**पांडुरंगमूर्ति देखोनी पवित्र । संतोषले नेत्र इंद्रियेंसी ॥**
**केली प्रदक्षिणा महाहर्षयुक्त । चित्त हें विरक्त करूनियां ॥**
**वाटे मनामाजी रहावें येथेंचि । परी प्राक्तनाची दशा नाहीं ॥**
**जीव जावो परी पंढरीचें स्थळ । न संडावें जळ ऐसें वाटे ॥**
**बहेणी म्हणे पंचरात्री पंढरीस । केला आम्ही वास पुण्ययोगें ॥**

याप्रमाणें पंढरीस पांच दिवस मुक्काम करून चैत्रपौर्णिमेस आम्ही शंभुमहादेवास गेलों, व तेथील यात्रा पाहिली. शंकराचे ध्यान पाहून मला मोठें समाधान वाटलें. "तुझा अभयकर मस्तकीं असूं दे," अशी भक्तियुक्त अंतःकरणानें मी शंकराची प्रार्थना केली. शंभुमहादेव येथें पांच रात्री मुक्काम करून आम्ही शिंगणापुरास आलों. तेथें :—

**कोरान्नाचे कण सहज मिळवूं । तेणें सुखी जीऊ होय माझा ॥**
**अमृताचे परी वाटे गोड अन्न । पाप जळे जाण भक्षिलिया ॥**

या वेळीं माझें वय नऊ वर्षांचें होतें. भ्रतारानें असा विचार केला कीं शिंगणापुर येथें फारशी ब्राह्मणवस्ती नसल्यामुळें हें ठिकाण आपल्या वास्तव्यास योग्य नाहीं. रहिमतपुर येथें ब्राह्मणांचा मोठा समुदाय आहे, तेथें जाऊन आपण वस्ती करूं. हा विचार आम्ही लवकरच अंमलांत आणिला. आम्ही रहिमतपुर येथें जाऊन राहिलों व भिक्षेवर आपला चरितार्थ चालवूं लागलों. माझे भ्रतार मोठे कर्मठ असून देवाची त्यांजवर कृपा होती. रहिमतपूरच्या ग्रामोपाध्यांचा काशीस जाण्याचा विचार होता, म्हणून त्यांनीं आपल्या अनुपस्थितींत आपली वृत्ति चालविण्याची कामगिरी माझ्या भ्रताराकडे सोंपविली व नंतर ते काशीस गेले. या उपाध्यायांचें नांव रत्नाकर ज्योतिषी. येणेंप्रमाणें रहिमतपुर येथें आम्ही एक वर्ष वास्तव्य केलें. त्यानंतर उपाध्येबुवा काशीहून परत आले व त्यांनीं आणखी एक वर्ष आमचा निर्वाह चालविला. इतक्यांत माझें वय अकरा वर्षांचे झालें. संतांचे संगतीत असावें असें मला वाटूं लागलें :—

**कथा आईकावी पुराणश्रवणीं । ब्राह्मणपूजनीं चित्त रिझे ॥**
**तेथूनी प्राक्तनें ओढूनियां जाण । तें स्थळ सोडून चालियेलों ॥**
**उदास अंतर नावडेचि कांहीं । प्राक्तनासी नाहीं उपाय तो ॥**

अशा रीतीनें अत्यंत विषण्ण चित्तानें रहिमतपुर सोडून 'अतिपवित्र क्षेत्र कोल्हापुर' येथें आम्हीं आलों. तेथें बहिरंभट नामक एक वेदांती ब्राह्मण रहात असे. तो यजुर्वेदी असून त्यानें दोन शास्त्रांचें अध्ययन केलें होतें. त्याच्या घरीं अग्निहोत्र असून पुष्कळ विद्यार्थी पठणास येत असत. या ब्राह्मणाच्या घरीं आम्ही बिऱ्हाड करून राहिलों. जयराम[१] गोसावी नित्य हरिकथा करीत असत. भागवताचेंही पारायण होत असे. त्या पवित्र स्थलीं आत्मचर्चा करण्यांत आमचा काल आनंदानें जाऊं लागला. माझ्या अकराव्या वर्षी, एका सोमवारीं कसलेंसें मोठें व्रत आलें, तेव्हां त्या दिवशीं बहिरंभटाच्या यजमानानें त्याला एक सवत्स कपिला गाय दान दिली:—

**काळी ते कपिला काळें तिचें वत्स। प्रदक्षणे पुच्छ निवेदिली ॥**
**सुवर्णाचीं शृंगें रुपियाचे खूर। वर पीतांबर पांघुरिला ॥**
**सर्व उपचारें गोदान दिधलें। पहावया आले सर्व जन ॥"**

बहिणाबाईचें कुटुंब कोल्हापुर येथें वास्तव्य करीत होतें त्या वेळीं तेथें विजापूरच्या बादशाहाचा अंमल होता व तें एक क्षेत्र म्हणूनच तेव्हां प्रसिद्ध होतें. हल्लींचें राजधानीचें स्वरूप त्या शहरास, ताराबाईनें तेथें आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें तेव्हांपासून प्राप्त झालें. असो.

पुढें बहिणाबाई सांगतात, "बहिरंभटाला कपिला गाय मिळाली त्यानंतर अकराव्या दिवशीं त्याच्या स्वप्नांत येऊन एका ब्राह्मणानें त्यास सांगितलें कीं, 'तुझ्या ओसरीस हा ब्राह्मण आहे त्यास ही गाय तूं देऊन टाक.' त्याप्रमाणें बहिरंभटानें ती गाय सवत्स आम्हांस दिली. आमच्या सर्व मंडळीस मोठा आनंद झाला. नित्य गोसेवा आमच्या हातून घडूं लागली. माझे आईबाप गाईसाठीं चारा आणण्यास जात. आम्ही मोठ्या काळजीनें गाईची शुश्रूषा चालविली.' पुढील हकीकत खुद्द बहिणाबाईच्या शब्दांत ऐकण्यांतच विशेष स्वारस्य असल्यामुळें ती हकीकत त्यांच्याच शब्दांत देतों:—

---

१ रामदासपंचायतनांतील प्रसिद्ध जयरामस्वामी वडगांवकर. हे मोठे कृष्णभक्त होते. यांचे अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत.

" गाईचें तें वत्स तेंही पैं कपिला । माझ्या ठायीं तिला हेत बहू ॥
मीच सोडीं तरी वत्स रिघे दोहा । करितां दोहना सवें माझी ॥
मीच पाणी पाजीं तृण घालीं मीच। मजवीण कांचे मनीं वाहे ॥
मी जाय पाणिया ओरडे तें वत्स । गाय वाया पुच्छ सवें चाले ॥
करूनियां लोक नवलाचे राहती । उगेच पाहती वत्स गाई ॥
मोकळेंचि वत्स असोनियां जाण । न वंचे आपण गाईपाशीं ॥
तृण घालीं तरी भक्षिती आपण । पाजिल्या जीवन तेव्हां पिती ॥
रात्रीच्या अवसरीं वत्स निजे सेजे । पुराणीं तें फुंजे श्रवणकालीं ॥
कथेपासीं जाय सवें तेंही येत । उभेंचि निवांत कथा ऐके ॥
गाय गोठां घरीं आपण कथेसी । जातां मी स्नानासी सवें चाले ॥
करिती अपूर्व हें तुझें संबंधी । लोक नाना शब्दीं बोलताती ॥
कोणी म्हणे आहे योगभ्रष्ट वत्स । कोणी म्हणती नष्ट सवे ईची ॥
कोणी म्हणती जन रिणाईत ईचें । रीण फिटे तिचें तैंच सूट ॥
ऐसें नाना परी वत्स तें न सोडी । मजही ते आवडी तयापाशीं ॥
न देखतां वत्स हेचि तळमळी । उदकेंवीण मासोळी तैसें वाटे ॥
दळितां कांडितां वाहतांही पाणी । वत्सेंवीण जनीं नावडे हो ॥
भ्रतार रागीट नावडे कीं तया । परी त्यासी माया मनीं आली ॥
म्हणे असो तुज नाहीं मूलबाळ। हाचि तुझा खेळ जाण मनीं ॥
तुजही आवडी कथापुराणाची । संगती फुकाची तुज झाली ॥ "

असा त्या वासराचा विलक्षण लळा बहिणाबाईस लागला होता. बहिणाबाईच्या चरित्रांत ज्या कित्येक गूढ व विलक्षण गोष्टी आहेत त्यांपैकीं ही एक गोष्ट होय. असो. त्या वासराच्या लडिवाळपणांत बहिणाबाईचें कालक्रमण चालू असतां एके दिवशीं जयरामस्वामी वडगांवकर सहज करवीरीं आले; व घरोघर त्यांचीं कीर्तनें होऊं लागलीं. रात्रंदिवस कीर्तनाचा व ब्राह्मणसंतर्पणाचा थाट सुरू झाला. बहिणाबाई म्हणतात, " गोसावीबुवांचीं कीर्तनें ऐकण्यास माझे आईबाप जात असत त्यांजबरोबर मीही जात असें, व मजबरोबर माझें वासरूंही जात असे. माझ्या आईजवळ मी बसत असें, तेथें माझें वासरूंही धांवत येऊन उभें रहात असे.

१ संवय. २ खंती. ३ जाई. ४ स्फुंदत असे. ५ नवल, कौतक. ६ त्यासंबंधी.

**हागेना तें मुते उभेंचि श्रवण । आयके कीर्तन नामघोष ॥**
**आरती झालिया नमस्कार होती । आपणही क्षिती ठेवी डोकें ॥**
**देखोनियां जन हांसती सकळ । परी तें प्रेमळ आल्हादचि ॥**
**म्हणती योगभ्रष्ट पूर्वील हरिभक्त । गोवत्स विरक्त पहा कैसें ॥**

पुढे एके दिवशीं मोरोपंत नामक गृहस्थांनीं आपल्या घरीं जयरामस्वामीस कीर्तनास बोलाविलें. तो एकादशीचा दिवस होता. दोन प्रहरीं मोठ्या आनंदानें हरिकीर्तन सुरू झालें. जयराम गोसावी आपल्या शिष्यसमुदायासह सभास्थानीं बसले असून टाळमृदंगादि वाद्यघोषांत हरिगुणगायन चाललें होतें. मीही आपल्या आईबापांसह कीर्तनश्रवणास गेलें होतें, व माझें वासरूंही मजपाशींच बसलें होतें, परंतु लोकांनीं त्यास तेथून काढून दरवाजांत नेलें. ‘ येथें माणसांस बसण्यास जागा नाहीं तेथें जनावराची काय प्रतिष्ठा ?’ असें ते म्हणाले. मला फार वाईट वाटून मी रडूं लागलें. तेव्हां, वासराचें ओरडणें ऐकून मला रडूं येतें ही गोष्ट जयराम गोसावी यांस लोकांनीं सांगितली:—

**म्हणती ‘ एक मुली हिरंभटाघरीं[1] । ते आली श्रीहरिकीर्तनासी ॥**
**तिजसवें वत्स एक असे त्यासी । सांगातें तयासी हिंडविते ॥**
**तें वत्स बाहेरी घातलें अडचणीं । त्यालागीं ते सुनी रडतसे ॥ ’**

हें वर्तमान ऐकतांच विश्व ब्रह्ममय पाहणाऱ्या जयरामस्वामींनीं काय केलें ? बहिणाबाई सांगतात:—

**“ साक्ष अंतरींचा तो स्वामी जयराम । वत्स—अन्तर्याम ओळखिलें ॥**
**म्हणे ‘ आणा त्यासी, वत्सासी अन्तरीं । काय नाहीं हरि आत्मवेत्ता ॥**
**कथेलागीं होतो जीव कासावीस । पशु कीं तयास म्हणों नये ॥ ’**

“ नंतर जयरामस्वामींनीं तें वासरू कथेंत आणविलें व त्याला माझ्याजवळ बसविलें. त्याला पाहून मला आनंद झाला. माझें पूर्वपुण्य थोर म्हणून स्वामींनीं नंतर मलाही वत्सासह आपणाजवळ बोलाविलें व दोघांनाही कुरवाळून आमच्याकडे कृपादृष्टीनें पाहिलें.” पण स्वामींचें हें वर्तन लोकांस आवडलें नाहीं. बाई सांगतात—

---

१ बहिरंभटाचें संक्षिप्त नांव.

**“ कुरवाळोनी दोघां पाहे पूर्णदृष्टी । न मानेचि गोष्टी जनालागीं ॥**
**कथा होत असे गजर महाथोर । चित्त हें निर्भर वैष्णवाचें ॥**
**जयराम गोसावी याचें मनोगत। पुण्यशील सत्य उभयवर्ण ॥ ”**

ही मुलगी आणि तिचें वासरूं हीं दोघेंही पुण्यशील आहेत असें जयरामस्वामींस वाटलें. ते म्हणाले —

**“ कथेमाजी वत्स उभेंचि तिष्ठत । रूपीं सर्व चित्त आणूनियां ॥**
**हे मुली लहान वय ईचें थोडें । श्रवण हें आवडे नवल मोठें॥ ”**

मग स्वामींनीं “ या मुलीचे कोणी आप्त कीर्तनास आले आहेत काय ? ” अशी चौकशी केली तेव्हां माझ्या आईबापांचीं नावें लोकांनीं स्वामीस सांगितलीं व हिचा भ्रतारही योग्य आहे असेंही सांगितलें.

**“ भ्रतारही ईचा आहे बहु योग्य। परि इचें वैराग्य थोर दिसे ॥**
**मायबापासवें येतसे पुराणीं । वत्सही घेउनी समागमें ॥**
**मग म्यां आपुलें आपण पाहिलें। चरणीं घातलें लोटांगण ॥ ”**

आणि बहिणाबाईनीं स्वामींस लोटांगण घालतांच तिच्या वासरानेंही स्वामींच्या पायांवर डोकें ठेविलें. तेव्हां सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटलें.

**“ हिरंभट आणि आणीकहि जन । म्हणती हें चिन्ह कोण कळा ?॥ ”**

पुढें बाई सांगतात, “ मोरोपंतांच्या घरीं जयरामस्वामींच्या कीर्तनांत हा प्रकार घडल्यावर, कीर्तन समाप्त होतांच आम्हीं घरीं आलों. त्या वेळीं सुमारें दोन घटका रात्र झाली होती. गाईनें वत्साला दूध पाजलें. अग्निहोत्रासाठीं हिरंभटानें प्रातःस्नान केलें व आकाशांत कार्तिकाचे दिवे लाविले. पुढें—

**सडे संमार्जनें केलें स्नान तेथें । गोचें शृंग हातें कुरवाळिलें ॥**
**भ्रतारानें स्नान केलें आपुलिया । दक्षिणेची गया कोल्हापुर ॥**

इतकें होत आहे तों मिराबाई नामक कोणी स्त्री होती तिनें कीर्तनांत घडलेला प्रकार बहिणाबाईच्या भ्रतारास सांगितला. बाई म्हणतात—

**“ वत्साचा वृत्तांत माझेंही रुदन । भ्रताराचे कान तृप्त केले ॥**
**जयरामगोसावी विदेही अवस्था । तेणें हात माथां ठेवियला ॥**
**थोर इचें भाग्य तो यांसी बोलिला । आशीर्वाद दिला योग्य तेणें ॥ ”**

मिराबाईच्या तोंडून ही हकीकत ऐकतांच बहिणाबाईच्या भ्रतारास मोठा क्रोध आला.

**" जातीचा भिक्षुक आला बहुत राग । धांवला सवेग गृहाप्रती ॥ "**

आणि बहिणीबाईची वेणी धरून त्यानें तिला चांगला चोप दिला. तें पाहून हिरंभटास फार वाईट वाटलें. पण बाईच्या नवऱ्यानें आपला हात कांहीं आवरला नाहीं. बहिणाबाईचें दुःख पाहून गायदेखील ओरडूं लागली व वासरूं तर ओरडून ओरडून कासावीस झालें !

बहिणाबाईचें वय त्या वेळीं ११ वर्षांचें होतें. बाईच्या भ्रतारानें त्यांस इतकें बेदम मारलें तरी बाईचे आईबाप किंवा बंधु कांहीं बोलले नाहींत. कांहीं वेळानें पतीचा क्रोध शांत झाला असें पाहून बाईच्या आईबापांनीं त्यास विचारलें कीं, 'मुलीवर इतके कां रागावतां? तिनें असा कोणता भयंकर अपराध केला ?'

**" येरू म्हणे 'रात्रीं कथेंत प्रतिष्ठा । काय याची निष्ठा देखियेली ॥**
**कैंचें तें पुराण कैंची हरिकथा । मारीन अन्यथा नव्हे येथ ' ॥**
**इतुकें बोलोनियां भ्रतार पुनरपि । क्रोध तो नाटोपी अग्नीऐसा ॥**
**बहेणी म्हणे तेव्हां देह संकल्पिले । प्राक्तनाचें केलें कोण वारी ? ॥**

* * *

**आलें मना तंव मारिलें बळकट । बांधोनिया मोट टाकियेली ॥ "**

बहिणाबाईच्या भ्रताराचा हा क्रूरपणा पाहून हिरंभट इतका संतापला कीं, बाईच्या कुटुंबांतील माणसांस त्यानें " माझ्या घरांतून चालतीं व्हा; हा चांडाळ आपल्या पत्नीचा केव्हां जीव घेईल याचा नेम नाहीं, " असें स्पष्ट सांगितलें.

बिचाऱ्या बहिणाबाईनें केवळ भगवत्प्रेमासाठीं एवढ्या लहान वयांत इतका छळ सोसला हें ऐकून परमभागवत प्रल्हादाची आठवण कोणास होणार नाहीं ? बहिणाबाईचे गुरु भक्तशिरोमणि तुकाराम महाराज यांचा तर असा स्पष्ट आदेश आहे कीं—

**" जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥**
**येर प्रिया पुत्रा धना कोण लेखा । करिती तीं दुःखा पात्र शत्रु ॥ "**

परंतु आपल्या ईशप्रेमांत अंतराय आणणाऱ्या भ्रताराचा त्याग करण्याची कल्पनाही बहिणाबाईच्या मनांत आली नाहीं, व आली असती तरी त्या

कालांत तसें करणें तिला शक्यही नव्हतें. शिवाय अकरा वर्षांच्या मुलीच्या मनांत असले विचार कोठून येणार? पति हाच परमेश्वर आणि तो करील तें प्रमाण ही तत्कालीन स्त्रियांची समजूत. असो.

'माझें घर सोडून चालतीं व्हा,' असें जेव्हां हिरंभटानें बहिणाबाईच्या आईबापांस निक्षून सांगितले तेव्हां त्यांनीं त्याची कशीबशी समजूत घालून 'आजचा दिवस कृपा करून आम्हांस राहूं द्या, उद्यां सकाळीं आम्ही दुसरी जागा पाहतों,' अशी त्यास विनंति केली. बहिणाबाईची गाय आणि तिचें वासरूं यानीं तर त्या दिवशीं प्रायोपवेशन केलें! गवतास किंवा पाण्यास त्यांनीं तोंड लाविलें नाहीं. हा त्या जनावरांचा सत्याग्रह पाहून बहिणाबाईच्या निष्ठुर पतीनें बाईची मोट बांधली होती ती सोडली व तिला गाई-वत्सापाशीं नेलें. तेव्हां, बाई म्हणतात, "तीं—

**" ... ... ... ... । हुंबरलीं जैशीं पुत्र माता ॥**
**आपण देखिले वत्स आणि गाय । म्हणें प्राण जाय तरी बरा ॥**
**बहेणी म्हणे तयां तृण पाणी पाजीं । न घेती ते माझी थोर माया ॥"**

त्या दिवसापासून त्या गाईनें आणि तिच्या वत्सानें अन्नपाणी वर्ज्य केलें, इतकेंच नव्हे तर आपल्या जागेवरून उठण्याचेंही त्यांनीं बंद केलें! त्यामुळें बहिणाबाईनींही अन्नोदकाचा त्याग केला. त्या तिघांचा तो निग्रह पाहण्यास गांवांतील लोक येऊं लागले. कांहीं लोकांनीं हा वृत्तांत जयरामस्वामींस कळविला, तेव्हां तेही हिरंभटाच्या घरीं आले. बहिणाबाईच्या भ्रतारानें स्वामींस नमस्कार केला. हिरंभटाने त्यांस आसनावर बसवून त्यांचें पूजन केलें. लोकही पुष्कळ जमा झाले होते. एकंदर प्रकार पाहून स्वामींस मोठा आनंद झाला. मग—

**म्हणती 'ब्राह्मणा तूं इचा भ्रतार । सांगतों निर्धार ऐक चित्तें ॥**
**योगभ्रष्ट इचीं साधनें बळकट । तूं रे ईस कष्ट करूं नको ॥**
**स्वधर्मेंचि तुझी करील हे सेवा । उद्धरील जीवा आपुलिया ॥**
**तुझें कांहीं पदरीं पूर्वील सुकृत । तेणें हा सांगात प्राप्त झाला ॥**
**गाई आणि वत्स हे इचे सांगाती । अनुष्ठानें होती ऐक्यभावें ॥**
**इचा हेच गुरु हें इचें साधन । तोडील बंधन आपुलें हें' ॥**
**बहेणी म्हणे ऐसें बोलोनी जयराम । शिष्याचा संभ्रम फार होता ॥**

जयरामस्वामी आणखी म्हणाले, "हीं तिघेंही पूर्वजन्मीं एका जागीं अनुष्ठान करीत असत. ह्या दोघांच्या अनुष्ठानांत कांहीं अंतराय येऊन तें अपूर्ण राहिल्यामुळें ह्यांस गाईचा जन्म प्राप्त झाला. ह्या मुलीचें अनुष्ठान मात्र पूर्ण झालेलें असल्यामुळें हिची चित्तशुद्धि झाली." अशा प्रकारें बहिणाबाईच्या पतीची समजूत घालून जयरामस्वामी स्वस्थानीं गेले. पुढें द्वादशी होतांच त्या वत्साचा देहांतसमय जवळ आला, तेव्हां हिरंभटानें 'मूकं करोति वाचालं०' या श्लोकाचा प्रथमार्ध सहज म्हटला असतां 'यत्कृपा तमहं वंदे' हा सदर श्लोकाचा उत्तरार्ध त्या वत्सानें मनुष्यवाणीनें स्पष्ट उच्चारला! ही गोष्ट लोकांनीं प्रत्यक्ष पाहिली व ते आपापसांत त्यासंबंधानें बोलत असतां वत्सानें अकस्मात् प्राण सोडला. तेव्हां बहिणाबाई त्याजपाशीं धांवून गेल्या. बाई म्हणतात—

**"प्राणासवें प्राण जाऊं पाहे माझा । प्राक्तनासी दुजा प्रयत्न नाहीं ॥**
**गाई हुंबरडे दोहींवरी मान । टाकीं परी जाण शब्द कैंचा ॥**
**बहेणी म्हणे देह प्राक्तनें राखिलें । पुढें काय झालें कोण जाणे ॥"**

यावरून, दुःखातिरेकानें बहिणाबाई मूर्च्छित झाल्या हे उघड दिसतें. वत्सानें देह ठेवल्याचा वृत्तांत जयरामस्वामींस कळताच ते संतमंडळीसह त्या ठिकाणीं आले.

**मग सर्व श्रेष्ठ संतसाधुजन । करीत कीर्तन वत्स नेलें ॥**
**दिंडी पताकांनीं मिरविलें वत्स । गाय सवें तुच्छ यानीं देह ॥**
**हंबरडा हाणोनी चाले मागें मागें । गाय अंतरंगीं महादुःखी ॥**
**पुरूनियां वत्स आले सर्व जन । करूनियां स्नान गृहा गेले ॥**
**गाय वत्सापाशीं जाउनी हुंबरे । मागुती ते फिरे गृहासी ये ॥**
**मज अवलोकितां मी तों अचेतन । माझा देहीं प्राण आढळेना ॥**

वरील अभंगांत बाईनीं वर्णिलेली ही हकीकत इतकी हृदयद्रावक आहे कीं ती वाचतांना कोणत्याही सहृदय मनुष्याच्या डोळ्यांतून अश्रुपात झाल्याशिवाय राहणार नाहीं. आपल्या वत्साचा बहिणाबाईनें सांगितलेला वृत्तांत वाचून अनेक विचारतरंग मनांत उद्भवतात. त्यापूर्वी, त्या वेळीं आणि

त्यानंतर गाईचीं लक्षावधि वासरें होऊन गेलीं असतील, पण या बहिणाबाईच्या वासराचें चरित्र फार विलक्षण आहे व जयरामस्वामींसारख्या थोर पुरुषासही त्या वासराच्या ठिकाणीं कांहींतरी अलौकिकपणा आहे असें वाटलें म्हणूनच त्यानीं त्याच्या प्रेताची मिरवणूक काढून त्याला समाधि दिली. बहिणाबाईबरोबर कीर्तनास जाणें, तेथें मलमूत्र विसर्जन न करितां कीर्तन संपेपर्यंत उभें राहून एकाग्रचित्तानें कीर्तन ऐकणें, बाईनीं जयरामस्वामींच्या पायांवर डोकें ठेवतांच आपणही त्याप्रमाणें त्यांच्या पायांवर डोकें ठेवणें, आणि बहिणाबाईचा तिच्या नवऱ्यानें केलेला छल पाहून प्रायोपवेशनपूर्वक प्राणत्याग करणें ह्या त्या वासराच्या क्रिया, त्याचें अलौकिकत्व व बहिणाबाईशीं असलेला त्याचा पूर्वजन्मसंबंध उघड दाखवितात. अशा वत्साच्या प्रेताची जयरामस्वामींनीं आणि करवीरस्थ नागरिकांनीं समारंभपूर्वक मिरवणूक काढावी यांत कांहीं आश्चर्य नाहीं. वत्साचें प्रेत पुरल्यावर त्या जागीं लोकांनीं कदाचित् समाधीही बांधली असेल पण आतां दोन अडीचशें वर्षांनंतर त्या समाधीचा पत्ता कसा लागणार ? तरी पण कोल्हापुर येथील संशोधकांस हा एक चांगलाच विषय आहे यांत संशय नाहीं. असो.

वत्साच्या मृत्यूमुळें बहिणाबाईस किती दुःख झालें असेल हें वाचकांनीं कल्पनेनेंच ताडावें. त्याचें शब्दांनीं वर्णन करणें कठिण आहे. वासरानें प्राण सोडतांच बहिणाबाई ज्या मूर्च्छित पडल्या त्या कित्येक दिवस मूर्च्छितावस्थेंतच होत्या; व म्हणूनच 'पुढें काय झालें कोण जाणे' असें त्यांनीं म्हटलें आहे. वासराची प्रेतयात्रा निघालेली अर्थातच त्यांनीं पाहिली नाहीं. बिचारी गाय मात्र, वासराचें प्रेत ज्या ठिकाणीं पुरलें होतें तेथें जाऊन हंबरडे फोडी आणि ओशाळी होऊन परत येई ! वासराच्या प्रेतयात्रेबरोबर गायही हंबरडे फोडीत चालली होती हें वाचून तिच्याही अलौकिकतेविषयीं वाचकांची खात्री झाल्याशिवाय राहणार नाहीं. एकंदरींत, जयरामस्वामींनीं बहिणाबाईच्या नवऱ्यास सांगितल्याप्रमाणें, बहिणाबाई, तिची गाय व तिचें

---

१ हल्लीं 'भोलानाथ' या नांवाचा मुंबईंत जो एक बैल उत्तरेकडील एका मनुष्यानें आणला आहे त्याच्या अंगीं असे अद्भुत गुण आहेत.

वासरूं हीं पूर्वजन्मींचीं ऋणानुबंधी होतीं, असेंच धरून चालणें भाग आहे. मात्र, पूर्वजन्मावर ज्यांचा विश्वास नसेल त्यांची गोष्ट निराळी.

बहिणाबाई मूर्च्छितावस्थेंत असतां चौथ्या दिवशीं–प्रतिपदेस मध्यरात्रीं–कोणी एक ब्राह्मण स्वप्नांत त्यांच्याजवळ येऊन त्यांना म्हणाला, " बाई, सावध व्हा. " हे शब्द ऐकतांच बाई शुद्धीवर येऊन त्यांनीं डोळे उघडले, आणि पाहतात तों गाय नाहीं, वासरूं नाहीं आणि लोकही नाहींत. समोर आई बसली असून बंधु, पिता व पति हेही जवळच बसले आहेत आणि दिवा पेटतो आहे. बाई म्हणतात,—

**" तेथुनियां मन करुनी सावध। स्मरणीं स्वतःसिद्ध चित्त केलें ॥**
**बहेणी म्हणे देह सर्वही विकळ । परि तें निश्चळ चित्त माझें ॥**
**उघडोनियां नेत्र पाहें जंव पुढें । तंव दृष्टीपुढें पांडुरंग ॥ "**

आणि जें पंढरपुर त्यांनीं पूर्वी पाहिलें होतें तें त्यांच्या डोळ्यांपुढें दिसूं लागलें. जयरामस्वामीही दिसूं लागले.

**" ब्राह्मण स्वप्नांत देखिला तो जाण । त्याची आठवण मनीं वाहे ॥**
**न दिसे आणिक नेत्रांपुढें जाण । नामाचें स्मरण मनीं राहे ॥ "**

पूर्वी ज्या हरिकथा त्यांनीं ऐकल्या होत्या त्याही त्यांना आठवूं लागल्या. तुकारामबुवांचे गोड अभंग त्या म्हणूं लागल्या तेव्हां त्यांना तुकोबांच्या दर्शनाची उत्कंठा लागली. " ज्याचे अभंग इतके सुंदर तो जर मला भेटेल तर माझ्या जीवास मोठा संतोष होईल असें मला वाटलें.

**तुकोबांचा छंद लागला मनासी । ऐकतां पदांसी कथेमध्यें ॥**
**तुकोबाची भेटी होईल तो क्षण । वैकुंठासमान होय मज ॥**
**तुकोबाची कानीं ऐकेन हरिकथा । होय तैसें चित्ता समाधान ॥**
**तुकोबाचें ध्यान करुनी अंतरें । भेटतां अपार सुख आहे ॥**
**बहेणी म्हणे तुका सद्गुरु सहोदर । भेटतां अपार सुख आहे ॥ "**

यावरून, तुकोबांची कविता त्यांच्या हयातींतच सर्व महाराष्ट्रभर कशी पसरली होती व जयरामस्वामींसारखे नामांकित संतकवीदेखील आपल्या कीर्तनांत तुकोबांच्या अभंगांचा कसा उपयोग करूं लागले होते हें स्पष्ट होतें. तुकोबाची लोकप्रियताही यावरून दिसतेच, पण जयरामस्वामींसारखे ब्राह्मण संत

निरभिमानपणें त्यांची कविता कीर्तनांत म्हणूं लागले होते हें ऐकून समाधान वाटतें. आणि बहिणाबाईचें तरी केवढें भाग्य! येवढ्या अल्पवयांत इतकी अंतःशुद्धि होऊन तुकोबांचे अभंग कानीं पडतांच त्यांच्या दर्शनाचा ध्यास मनास सारखा लागून रहावा हें भावी पारमार्थिक उत्कर्षाचें पूर्वचिन्ह होय; व यावरून पूर्वजन्मीं बहिणाबाईची आध्यात्मिक उन्नति पुष्कळच झालेली असली पाहिजे हें उघड दिसतें. नाहीं तर तुकारामबुवांचे अभंग खुद्द त्यांच्या मुखांतून ऐकणारे लोक त्या वेळीं काय थोडे होते ? असो. तुकाराममहाराजांच्या दर्शनाचा ध्यास आपणास कसा लागला होता हें बहिणाबाईनें पुढील अभंगांत सांगितलें आहे:—

**" मत्स्य जैसा जळावांचुनी चरफडी । तैसी ते आवडी तुकोबाची ॥**
**अंतरींचा साक्ष असेल जो प्राणी । अनुभवें मनीं जाणेल तो ॥**
**तृषितासी जैसें आवडे जीवन । तैसा पिंड प्राणेवीण तया ॥**
**बहेणी म्हणे हेत तुकोबाचे पायीं । ऐकोनियां देहीं पदें त्याचीं ॥ "**

बाई पुढें म्हणतात, " संचित नाहींसें करील असा सद्गुरूशिवाय दुसरा कोण समर्थ आहे ? यासाठीं सद्गुरु चांगला असावा, कीं ज्याच्या कृपेनें आणि उपदेशानें संसारातील श्रमाचा परिहार होईल. सद्गुरूशिवाय त्रिविध तापांची शांति कोण करील? सद्गुरु जर भेटला नाहीं तर जन्ममरणाचा फेरा कोण चुकवील ? मला असें वाटूं लागलें कीं सद्गुरु तुकोबा जेव्हां मला भेटतील तेव्हांच माझ्या वासनेचा क्षय होईल. बहेणी म्हणे माझा जाऊं पाहे जीव । कां बा नये कींव तुकोबा रे.

**न बोलवे शब्द अंतरींचा धांवा । नाइके तुकोबा काय कीजे ॥**
**अदृष्ट करंटें साह्य नव्हे देव । अंतरींची हांव काय करूं ॥**
**तेरा दिवस ज्यानें वह्या उदकांत । घालुनियां सत्य वांचविल्या ॥**
**महाराष्ट्र शब्दांत वेदांतींचे अर्थ । बोलिला लोकांत सर्वद्रष्टा ॥**
**अंतर साक्ष आहे निरूपणीं हेत । जडे परी चित्त ओळखेना ॥**
**बहेणी म्हणे मीच असेन अपराधी । अन्याय त्रिशुद्धी काय त्याचा ॥ "**

तुकारामबुवांच्या अभंगांच्या वह्या इंद्रायणीच्या डोहांत तेरा दिवस सुरक्षित राहिल्या या खुद्द बुवांनींच सांगितलेल्या गोष्टीच्या सत्यतेचा बहिणाबाईनीं दिलेला हा पुरावा लक्षांत ठेवण्यासारखा आहे. असो. पुढें बहिणाबाईनीं—

" बहुत अंतरीं शोक आरंभिला । कां मज विठ्ठला मोकलिलें ॥
त्रिविध तापानें तापलें मी बहू । जाईना का जीऊ प्राण माझा ॥
तंव अकस्मात सातविया दिनीं । नामसंकीर्तनीं घोषयुक्त ॥
तुकाराम रूपें येऊनी प्रत्यक्ष । म्हणे पूर्वपक्ष सांभाळिजे ॥
नको करूं चिंता आहें मी तुजपाशीं । घेईं अमृतासी हातींचिया ॥
गाय केलें वत्स मुखीं निघे धार । अमृत हें सार सेवीं हेंचि ॥
ठेउनियां कर मस्तकीं बोलिला । मंत्र सांगितला कर्णरंध्रीं ॥
म्यांही पायांवरी ठेविलें मस्तक । दिधलें पुस्तक मंत्रगीता ॥
कार्तिकांत वद्य पंचमी रविवार । स्वामीचा विचार गुरुकृपा ॥
आनंदलें मन चिद्रूप कोंदलें । उठोनि बैसलें चमत्कारें ॥
मंत्र आठवती तुकोबास्वरूपें । स्वप्नामाजी कृपा पूर्ण केली ॥ "

तुकारामबुवांनीं बहिणाबाईस स्वप्नांत दृष्टांत दिला त्या वेळीं ते जिवंत होते, परंतु समाधिस्थ झाल्यावरही, पट्टशिष्य निळोबा, कचेश्वर आणि संत-चरित्रकार महीपति यांस त्यांनीं स्वप्नांत दर्शन दिल्याची कथा प्रसिद्ध आहे. स्वप्नांत तुकारामबुवांनीं बहिणाबाईस जें अमृत पाजलें त्याची चव कशी होती ? बाई सांगतात :—

" अमृत पाजिलें चवी अनारसी । साक्षी ज्याची त्यासी मनामाजी ॥ "

पुढें तुकोबांविषयींची स्वतःची भावना बाईनीं वर्णिली आहे :—

" जयाचिया पदें होतसे विश्रांति । त्याची देहाकृति विठ्ठलचि ॥
विठ्ठलासी तया नाहीं भेदभाव । ऐसें माझें मन साक्ष आहे ॥
पांडुरंग तुका पांडुरंग तूं का । वेगळीक देखा केंवि होय ॥
कलियुगीं बौद्धरूप धरी हरि । तुकोबाशरीरीं प्रवेशला ॥
तुकोबाची बुद्धि पांडुरंगरूप । मन तें स्वरूप तुकोबाचें ॥
तुकोबाचीं सर्व इंद्रियें चालक । पांडुरंग देख सत्य आहे ॥
तुकोबाचे नेत्र तेही पांडुरंग । श्रोत्र ते अभंग रूप त्याचें ॥
तुकोबाचे हात लिहिताती जें जें । तें तें तें सहजें पांडुरंग ॥
सर्वही व्यापार तुकोबाचे हरि । आपणचि करी अद्वयत्वें ॥
बहेणी म्हणे रूपें व्यापक तुकोबा । ध्यान माझ्या जीवा हेंचि वाहे ॥ "

तात्पर्य, तुकारामबुवांची अमृतोपम अभंगवाणी श्रवण करून बहिणाबाईस त्यांचा अगदीं ध्यास लागून राहिला. ध्यानीं, मनीं, स्वप्नीं त्यांस तुकोबा दिसूं लागले. प्रस्तुत चरित्र-लेखाच्या प्रारंभींच सांगितल्याप्रमाणें, श्रीसमर्थ रामदास, रंगनाथ, जयराम, वामन, आनंदमूर्ति, केशवस्वामी इत्यादि अनेक ब्राह्मण संत महाराष्ट्रांत त्या वेळीं विद्यमान असतां व त्यांपैकीं जयरामस्वामींशीं तर बहिणाबाईचा चांगलाच परिचय असतां, या ब्राह्मण स्त्रीनें त्यांपैकीं कोणाचेंही शिष्यत्व न स्वीकारतां तुकोबाचें शिष्यत्व पत्करलें यावरून तिच्या मनांत जातिभेदमूलक श्रेष्ठत्व–कनिष्ठत्वाच्या कल्पनेचा लवलेशही नव्हता हेंच सिद्ध होतें.

पुढें बहिणाबाई सांगतात, " भ्रतारानें माझी मोट बांधून मला मारलें त्याचें दुःख त्या वत्सास होऊन चौथ्या दिवशीं त्यानें प्राणत्याग केला हे पूर्वी सांगितलेंच आहे. पुढें एका ब्राह्मणानें स्वप्नात येऊन 'बाई सावधान चित्त कर' असें सांगितलें त्याचाही उल्लेख पूर्वी केलाच आहे. त्याप्रमाणें मी सावधान होऊन राहिलें असतां तुकोबाच्या दर्शनाची मला मोठी उत्कंठा लागून राहिली. वत्साच्या मृत्यूनंतर सातव्या दिवशीं तुकोबानीं स्वप्नांत येऊन—

**"केलें समाधान पाजिलें अमृत। वत्सासि करीत गायभेटी॥**
**अमृत पाजुनी सांगितला मंत्र। जो कां हा सर्वत्र लोक जपती॥**
**मस्तकीं हस्त ठेवुनियां कृपा। केली त्या स्वरूपा तोचि जाणे॥**
**कृपेचा महिमा आहे तो अपार। वत्स बोले सार श्लोक अर्ध॥**
**आठवे दिवशीं सावध इंद्रियें। अमृतें घालीयें तुकोबाच्या॥**
**तेधवां ते गाय देखिली सन्मुख। निमालेंसे देख वत्स कळे॥**
**म्हणे या वत्सातें पाजिलें अमृत। तयासी तो मृत्यु कदा नाहीं॥**
**अमर तें वत्स आहे मजपाशीं। चित्त अमृतेंसी घेत गोडी॥ "**

इतक्या सगळ्या गोष्टी अवघ्या आठ दिवसांत घडून आल्या. पुढें ज्ञाननिधि समर्थ जयरामस्वामींनीं अंतर्दृष्टीनें माझी स्थिति पाहिली व हिरंभटास बोलावून त्यांनीं माझी विचारपूस केली. हिरंभटानें आपल्या घरीं झालेला सर्व वृत्तांत स्वामींस कथन केला. तो म्हणाला—

**" स्वप्नगत गुरु तुकोबाचे रूपें । स्वप्नींचिया कृपे बोध केला ॥**
**सावध होउनी ते मुली बैसली । गाय संबोधिली कुर्वाळुनी ॥**
**दुग्ध दोहुनियां घेतलें तियेनें । पाणी आणि तृण भक्षीतसे ॥**
**परी ते मुलीचें रूप पालटलें । पूर्ण तें दाटलें हृदय तिचें ॥**
**तुकोबाचा छंद अंतरीं लागला । मायबापें तिला सांगताती ॥**
**भ्रतार हा तिचा वेडावला राहे । उगाचि तो पाहे तियेकडे ॥**
**छांदस होउनी बैसला घरांत । तुकोबासी चित्त लावुनियां ॥ "**

बाईची व तिच्या भ्रताराची ही हकीकत ऐकून जयरामस्वामींस मोठा संतोष वाटला. त्यांच्या मनांत बाईविषयीं कृपा उत्पन्न होऊन तिचा भाव पाहण्यासाठीं ते हिरंभटाच्या घरीं आले. त्यांना पाहून बहिणाबाईस मोठा आनंद झाला व प्रेमानें त्यांचा कंठ दाटून आला. त्यांनीं मनातल्या मनांतच स्वामींस वंदन करून त्यांस आरती केली. बाई म्हणतात--

**" मजवरी दृष्टि कृपेची ओतली । प्रेमाची गुंतली माय जैशी ॥ "**

मग बाईची मानसपूजा ग्रहण करून स्वामी स्वस्थलीं गेले. तेथें ते आसनावर स्वस्थ चित्तानें बसले असतां तुकारामबुवांनीं त्यांस मनोमय दर्शन देऊन—

**" करी नमस्कार भेटुनी आनंदें । अत्यंत आल्हादें स्वामी सखा ॥ "**

इतकेंच नव्हे तर त्याच वेळीं बुवांनीं बहिणाबाईसही मनोमय दर्शन देऊन त्याच्या मुखांत कवळ घातला व—

**" मज म्हणे आलों जयरामभेटीसी । तुजही मानसीं ओळखिलें ॥**
**तुम्ही आतां इथें राहूं नका कदा । आत्मज्ञानबोधा न संडावें ॥ "**

अशा रीतीनें बहिणाबाईस तुकोबांचें दर्शन होऊन, 'तुम्ही आतां येथें राहूं नका,' अशी आज्ञा झाल्याचें वर्तमान लोकांत प्रगट होतांच बाईच्या दर्शनास लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटूं लागल्या. परंतु आपल्या घरीं लोक जमलेले पाहून बाईच्या भ्रताराचें मस्तक अगदीं भणाणून गेलें. बाईविषयींचा त्याचा तिरस्कार विकोपास गेला--

**" म्हणे ही बाईल मरे तरी बरें । ईस कां पामरें भेटताती ॥**
**काय आतां घुमें येईल अंगासी । देव इचें पोसी पोट कैसें ॥**
**बहेणी म्हणे ऐसी भ्रताराची चिंता । जाणोनी अनंता कळों आलें ॥ "**

बाईच्या भ्रताराचें म्हणणें असें कीं आपण वेदपठण करणारे ब्राह्मण आणि तुकाराम हा तर शूद्र. त्यानें माझ्या बायकोस स्वप्नात दर्शन दिलें त्यामुळें ती बिघडली ! आतां मी काय करूं ?

**" कैंचा जयराम कैंचा पांडुरंग । माझा झाला भंग आश्रमाचा ॥**
**आम्ही काय जाणों नाम हरिकथा । भक्ति हे तत्त्वता नसे स्वप्नीं ॥**
**कैंचे संतसाधु कैंची भावभक्ति । भिक्षुकांचे पंक्ती वसों सदा ॥ "**

अशा रीतीनें भलताच युक्तिवाद करून बाईच्या भ्रतारानें बाईचा त्याग करून वनांत जाण्याचें ठरविलें. " लोक हिला नमस्कार करणार, आणि ही मला तृणासमान लेखणार ! लोक येऊन हिच्याबरोबर 'कथानुवाद' करीत बसणार आणि ही आम्हाला नीच मानणार ! हिची विचारपूस करण्यासाठीं लोक आमच्या घरीं जमतात आणि आम्ही ब्राह्मण असून आम्हास कोणी ढुंकूनदेखील विचारीत नाहीं. गोसावीणबाई या प्रतिष्ठित नांवानें लोक हिला संबोधितात आणि आमचें कोणी नांवही घेत नाहीं ! " या प्रकाराबद्दल बाईच्या भ्रतारास इतकें वाईट वाटलें कीं वनांत जाण्याचा आपला निश्चय त्यानें कायम केला. मग सासूसासऱ्यास नमस्कार करून तो म्हणाला, " माझी पत्नी तीन महिन्यांची गरोदर आहे. हिला देवपिसें लागलें आहे, म्हणून हिची चांगली काळजी घ्या व हिचें हे वेड घालविण्याचा प्रयत्न करा. मजविषयीं म्हणाल तर अतःपर हिचें मुखावलोकनही करण्याची माझी इच्छा नाहीं.

**" न पाहें मी मुख सर्वथा इयेचें । हीनत्व आमुचें कोण फेडी ? ॥**
**भंडिमा सोसून कोण राहे येथें । ऐसिया स्त्रियेतें कोण पाळी ? ॥ "**

बहिणाबाईच्या भ्रताराच्या या वर्तनावरून तो अगदीं अरसिक आणि ग्राम्य असून पारमार्थिक वृत्तीचा त्याच्या ठायीं लवलेशही नव्हता हें उघड दिसतें. वयाच्या तिसाव्या वर्षी बहिणाबाईशीं त्याचें दुसरें लग्न झालें त्या वेळीं, बाईचें वय नऊ वर्षांचें होतें. अशा लहान मुलीस, केवळ नवरेपणाच्या जोरावर ज्यानें इतक्या निर्दयतेनें वागविलें आणि मारलें झोडलें त्याची कोणी विचारपूस केली नाहीं आणि त्याला कोणी मान दिला नाहीं यांत आश्चर्य तें काय ? असो.

भ्रताराचें वरील अप्रिय भाषण ऐकून बहिणाबाईस मोठा विचार पडला. त्यासंबंधाची हकीकत खुद्द बाईच्याच शब्दांत ऐकणें विशेष मनोरंजक असल्यामुळें त्यांचेच चार अभंग येथें देतों :—

१

" काय म्यां अदृष्टा करावें आपण । आलें जें ठाकून सोसिजे तें ॥
नाहीं येत वारें अंगासी माझिया । घुमारीन काय नव्हे माझी ॥
स्वधर्म आपुला रक्षुनियां मनें । शास्त्राच्या श्रवणें देव साधूं ॥
भ्रताराची सेवा तोचि आम्हा देव । भ्रतार स्वयमेव परब्रह्म ॥
तीर्थ भ्रताराचें सर्व तीर्थ जाण । तया तीर्थावीण निरर्थक ॥
भ्रतारवचनासी उलंघीन जरी । पापें माझ्या शिरीं पृथिवीचीं ॥
धर्म-अर्थ-काम-मोक्षासी अधिकार । भ्रतार साचार वेद बोले ॥
हा माझा निश्चय मनांतील हेत । भ्रतारेंसी चित्त लाविलेंसे ॥
भ्रतारसेवेनें सांग हा परमार्थ । भ्रतारेंच स्वार्थ सर्व आहे ॥
भ्रतारावांचुनी अन्य देव जरी । येईल अंतरीं ब्रह्महत्या ॥
सद्गुरु भ्रतार साधन भ्रतार । हा सत्य निर्धार अंतरींचा ॥
बहेणी म्हणे देवा भ्रताराचे मनीं । तुवां प्रवेशोनी स्थिर केलें ॥

२

भ्रतार गेलिया वैराग्य घेउनी । पांडुरंगा जनीं जिणें काय ॥
प्राणेंवीण देह काय पावे शोभा । रात्रीवीण प्रभा चंद्राचिया ॥
भ्रतार तो जीव देह मी आपण । भ्रतार कल्याण सर्व माझें ॥
भ्रतार जीवन मी मत्स्य तयांत । कैसेनि वांचत जीव माझा ॥
भ्रतार तो रवि मी प्रभा तयाची । वियोग हा त्यासी केंवि घडे ॥
बहेणी म्हणे माझ्या जीवाचा निर्धार । बोलें पैं विचार हरि जाणे ॥

३

भ्रतारें वैराग्य घेतलीयावरी । जीव हा निर्धारीं देईन मी ॥
वत्सासाठीं देह अचेतन पडे । हा तंव रोकडें परब्रह्म ॥
भ्रताराचें तीर्थ न सांपडे जरी । पापें माझ्या शिरीं त्रैलोक्याचीं ॥
चित्त हें भ्रतारावीण जरी जाय । तरी केंवि राहे प्राण माझा ?॥

**भ्रतारदर्शनावीण जाय दिस । तरी तेचि राशी पातकाच्या ॥**
**बहेणी म्हणे मज आज्ञाचि प्रमाण । ब्रह्म सनातन स्वामी माझा ॥**

**४**

**पाषाण विठ्ठल स्वप्नांतील तुका । प्रत्यक्ष कां सुखा अंतरावें ? ॥**
**घेईन उदंड सेवासुख हेंही । साक्ष या विदेही आहे मज ॥**
**भ्रताराची सेवा पतिव्रता करी । तरी ते उद्धरी उभय कुळें ॥ "**

प्रिय वाचक हो, परमार्थमार्गांत जिची पुष्कळच प्रगति झाली होती व परमार्थदृष्ट्या जिची योग्यता तिच्या भ्रताराहून फार मोठी होती अशा एका अल्पवयी हिंदु स्त्रीचे हे उद्गार वाचून तुम्हीं 'रोमांचव्याप्तकाय' झालां असाल, नाहीं ? जगांतील इतर देशांतल्या स्त्रिया आणि अस्सल हिंदु स्त्रिया यांच्या स्वभावांत जें मोठें अंतर आहे तें हेच होय. नवऱ्यानें लहानपणापासून इतका छल केला, ताडन केलें, कटु शब्दाची लाखोली वाहिली, व शेवटीं मुखावलोकन न करण्याच्या उद्देशानें तो अरण्यांत जाण्यास निघाला, तरी जी साध्वी त्याच्यासंबंधानें एकही तिरस्कारव्यंजक शब्द न उच्चारता, उलट त्याला 'ब्रह्म सनातन स्वामी माझा' असें म्हणते तिच्याविषयीं, स्वसंस्कृतिनिंदक नवमतवाद्यांशिवाय, कोणाच्या मनात आदरभाव उत्पन्न होणार नाहीं ? असो.

बहिणाबाईच्या पतीनें त्यांना सोडून जाण्याचा निश्चय केला खरा पण तो सिद्धीस गेला नाहीं. बाई म्हणतात, " त्यांच्या ( पतीच्या ) शरीरास अकस्मात् काहीं व्यथा जडली. एकसारखा सात दिवस त्यांच्या शरीराचा दाह होऊं लागला. ओळखीच्या माणसाचेंही भाषण ते ऐकून घेईनात. मी मात्र अहोरात्र त्यांच्याजवळ सारखी बसून होत्यें. ते औषध घेईनात; एक महिनाभर त्यांनीं अन्नग्रहण केलें नाहीं. त्यांना भयंकर वेदना होत होत्या. पुष्कळ देवदेवतांना गाऱ्हाणीं केलीं, नवस केले, परंतु रोग हटेना. शेवटीं, त्यांस असें वाटू लागलें कीं आतां मरण येईल तर बरे. आपण पांडुरंगाची, तुकोबाची, निंदा केली त्याचें हें प्रायश्चित्त आपणास भोगावें लागत असेल, असाही विचार त्यांच्या मनांत आला. तेव्हां त्यांनीं प्रार्थना केली कीं —

**"जरी तुकाराम निंदिला त्या गुणें । असेल दुखणें व्यथा मज ॥**
**तरी चमत्कार दाखवावा सद्या । जीवीं विश्वंद्या तुकाराम ॥ "**

बाई म्हणतात, "अशा रीतीनें माझ्या भ्रतारास पूर्ण पश्चात्ताप झाला. तो अंतर्साक्ष पांडुरंगास कळतांच, कोणी एक वृद्ध ब्राह्मण माझ्या पतीपाशीं येऊन त्यास म्हणाला, "अरे, तुला मृत्यूची इच्छा कां झाली? तुझ्या मनाला इतका वैताग कशानें आला? आपल्या धर्मपत्नीचा त्याग करण्यास कां प्रवृत्त होतोस? अगोदर, हिनें अपराध काय केला आहे याचा विचार कर आणि मग रागाव. तुला जर वांचण्याची इच्छा असेल तर हिचा अंगीकार कर. ही जर स्वधर्म सोडून वागूं लागली तर मग तूं हिला खुशाल सोडून जा. परंतु " ही आहे विरक्त निश्चयें हरिभक्त । तुवांही निश्चित करावेंसें ॥ " असें केलेंस तर तुझें कल्याण होईल असेंही त्या ब्राह्मणानें सांगितलें. तेव्हां बाईच्या भ्रतारानें त्याच्या पायांवर डोकें ठेविलें व इत्थंभूत हकीकत त्यास निवेदन करून म्हटलें, " महाराज, मला आतां जीवदान द्या.—

**ये व्यथेपासुनी वांचवीं स्वामिया । जीव तुझ्या पायां लावीन मी ।**
**स्त्रियेसी सर्वथा न बोलें आपण । हरीसी शरण जीवें भावें "॥**
**केला नमस्कार प्रत्यक्ष उठोन । होईल कल्याण म्हणे द्विज ॥**

बाई म्हणतात, " त्या दोघांचें हें भाषण मी ऐकत होत्यें. माझ्या भ्रतारास अनुताप झालेला पाहून मी त्यांस लोटांगण घातलें. तो ब्राम्हणही तत्काळ अदृश्य झाला, व त्याच क्षणीं माझ्या भ्रताराची व्यथाही दूर झाली. बहेणी म्हणे देव कृपा करी तरी । सर्व सिद्धि द्वारीं तिष्ठतील ॥ "

एकंदरींत, रामेश्वरभट्ट वाघोलीकर यांनीं तुकारामबुवांचा अधिक्षेप केल्यामुळें त्यांची जी स्थिति झाली तीच बहिणाबाईच्या नवऱ्याची, तुकोबांची निंदा केल्यामुळें झाली. असो.

येवढा अनुभव आल्यावर बहिणाबाईच्या पतीनें तिजविषयींची आपली द्वेषबुद्धि सोडून दिली, व तो त्यांच्यांशीं चांगल्या रीतीनें वागूं लागला. मग त्यानें बहिणाबाईच्या आईबापांस सांगितलें कीं देवानें ब्राह्मणरूपानें येऊन आमची भावी स्थिति आम्हास आगाऊच सांगून ठेवली आहे. तरी तुम्ही आतां आपल्या मूळच्या गांवीं—देवगांवीं—जाऊन रहा. आम्ही आमचें शेष आयुष्य आतां भगवद्भक्तींत घालविणार. यापुढें, मी पत्नीसह अरण्यवास करण्याचें ठरविलें आहे.

**" हो आतां कल्याण अथवा अकल्याण । आम्ही तों संपूर्ण भक्ति करूं ॥**
**तुकोबाचे गांवीं जाऊनीच राहों । मनींचा दढावो धरूनियां ॥**
**ऐसी पालटली भ्रताराची बुद्धि । स्वामी कृपानिधि अंतरसाक्ष ॥**
**काय एक देव करील तें नव्हे । प्रत्यक्ष अनुभव सर्व जनां ॥ "**

नंतर ही सर्व मंडळी तुकोबांच्या दर्शनार्थ देहू गांवाकडे निघाली. मृत वत्साची आई कपिला गाय बरोबर होती. इंद्रायणीतीरीं आल्यावर सर्वांनीं स्नान करून देहू येथील श्रीपांडुरंगमूर्तीचें दर्शन घेतलें. मंडळींच्या मनास मोठा आनंद झाला. देवळांत तुकोबा पांडुरंगाची आरती करीत होते. त्यांस सर्वांनीं भक्तिपूर्वक वंदन केलें. बहिणाबाईनीं स्वप्नांत जशी तुकोबांची मूर्ति पाहिली होती तशीच हुबेहूब ती त्यांस या वेळीं दिसली.

मध्यान्हकालीं क्षुधाशमनार्थ बहिणाबाईचा भ्रतार गांवांत भिक्षा मागण्यास गेला असतां कोंडाजी नामक एका ब्राह्मणानें त्यास आपल्या घरीं जेवणाचें आमंत्रण दिलें. तेव्हां त्यानें त्यास सांगितलें कीं, " आम्ही एकंदर पांच माणसें आहोंत; इतक्या माणसांची सोय तुमच्या येथें कशी होणार ? " तेव्हां कोंडाजी म्हणाला, " तुम्ही सर्वच मंडळी इकडे या. ईश्वरकृपेनें सर्व यथास्थित होईल. वस्तीस एखादी जागा पाहून तेथें रहा व मध्यान्हकालीं भोजनास इकडे या. "

त्या वेळीं देहू येथें कुप्रसिद्ध मंबाजी गोसावी रहात असे. त्याचें घर चांगलें प्रशस्त पाहून बहिणाबाईच्या पतीनें त्याजपाशीं राहण्यास जागा मागितली. तेव्हां मंबाजीस मोठा क्रोध येऊन तो त्याला मारावयास उठला, इतकेंच नव्हे तर त्यानें त्यास घराबाहेर हांकून लाविलें. नंतर ही मंडळी एका ओवरींत राहिली. दुपारीं सर्व माणसें कोंडाजीच्या घरीं जेवावयास गेलीं. जेवण झाल्यावर कोंडाजीनें विचारलें, " तुम्ही कोठून आलां व कोठें जाणार ? " तेव्हां मंडळीनें आपला पूर्ववृत्तांत त्यास सांगितला. तो ऐकून कोंडाजी म्हणाला :—

**" सोमवारीं आहे अमावास्या पुढें । रहा भक्तिकोडें सुख घ्यावें ॥**
**नित्य हरिकथा होतसे देऊळीं । तुकोबा माउली वैष्णवांची ॥**
**रहा येथें तुम्हां भक्षावया धान्य । देऊं हेंही पुण्य तुम्हां घडे ॥ "**

आणि या त्याच्या आग्रहास मान देऊन व तुकोबांच्या कीर्तनाचा लाभ घ्यावा या उद्देशानें मंडळीनें देहू येथें मुक्काम केला. बहिणाबाई म्हणतात—

**" देवळांत कथा सर्वकाळ होत । श्रवण करीत दिनरात्रीं ॥**
**तुकोबांची कथा वेदांतील अर्थ । पावे माझें चित्त समाधान ॥**
**तुकोबाचें ध्यान पूर्वी कोल्हापुरीं । जें स्वप्नामाझारी देखियेलें ॥**
**तेंचि ध्यान डोळां प्रत्यक्ष देखोनी । आनंद लोचनीं हेलावत ॥**
**दिनरात्रीं निद्रा नये तिळभरी । तुकोबा अंतरीं प्रवेशला ॥**
**बहेणी म्हणे येती सुखाचे डोलावे । जाणती अनुभवें जाणते जे ॥"**

" घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्ता आत्मस्थिति सांडईन ॥" अशी प्रतिज्ञा करणाऱ्या तुकोबांसारख्या महावैष्णवाचें कीर्तन आणि बहिणाबाई-सारखी श्रोतेमंडळी, मग त्या कीर्तन-रंगाचें काय वर्णन करावें ? असो. बहिणाबाईची मंडळी देहू येथें असतां एके दिवशीं मंबाजी गोसावी बहिणा-बाईच्या भ्रतारास म्हणाला, " अहो, तुम्ही व तुमची पत्नी, दोघेंही विरक्त दिसतां. तरी माझें शिष्यत्व तुम्ही कां पत्करीत नाहीं ? " ही गोष्ट मंबाजीनें पुनः पुनः दोन चार वेळ काढली, तेव्हां बाईच्या पतीनें त्यास स्पष्ट सांगितलें कीं, " तुमच्या अनुग्रहाची आम्हांस जरूरी नाहीं. आम्ही दुसऱ्या गुरूचा उपदेश पूर्वीच घेतला आहे." परंतु मंबाजीस तें खरें वाटेना; व म्हणून बहिणाबाईच्या भ्रतारानें कोल्हापूर येथें घडलेला सर्व वृत्तांत त्यास निवेदन केला. तो ऐकतांच तुकारामद्वेष्ट्या मंबाजीच्या अंगाचा रागानें अगदीं तिळपापड झाला. तो उसळून म्हणाला, " काय गप्पा मारतां ? स्वप्नांतल्या गुरूकडून कधीं कोणाचें समाधान झालें आहे ? जोंपर्यंत सद्गुरु-सेवा घडली नाहीं व प्रत्यक्ष सद्गुरूनें मस्तकावर हात ठेवला नाहीं तोंपर्यंत मनुष्य अनुग्रहशून्यच समजला पाहिजे. तुकाराम तर बोलून चालून शूद्र, त्याला ज्ञानप्राप्ति कशी होणार ?

**स्वप्नींचा अनुग्रह गुरु केला शूद्र । तोहि बळीभद्र ज्ञानहीन ॥**

तुम्ही या गुरुभक्तीच्या गप्पा मजपाशीं मारूं नका; तुम्ही शूद्राचे शिष्य म्हणवितां ही गोष्ट ब्राह्मणांस कळवून तुम्हांस वाळीत टाकीन तरच मी नांवाचा मंबाजी ! " येवढें नुसतें बोलूनच मंबाजी थांबला नाहीं, तर ह्या मंडळींशीं

त्यानें उघडउघड द्वेष मांडला. एके दिवशीं बहिणाबाईस वाटेंत मंबाजी भेटला असतां त्या त्याला नमस्कार करावयास गेल्या, तोंच तो दूर होऊन बाईस म्हणाला, “तुमची जात कोणती आहे कोण जाणे! तुम्हीं सोनार आहांत कीं गोळक आहांत? तुमच्या ठायीं ब्राह्मणाची क्रिया कांहींच दिसत नाहीं; म्हणून आम्ही तर तुम्हांला शूद्र समजतों. तुम्ही जर कोणाचे घरीं जेवावयास जाऊन भ्रष्टाकार कराल तर तुम्हांला मी दिवाणांत खेंचल्यावांचून राहणार नाहीं.” मंबाजीनें दिलेली ही धमकी बहिणाबाईनें आपल्या भ्रतारास, देहूचे कुळकर्णी महादाजीपंत यांस व कोंडाजीस सांगितली. तेव्हां पंत व कोंडाजी म्हणाले, “मंबाजीचा हा निव्वळ दुष्टपणा आहे. असल्या उठाठेवी करण्याचें वस्तुतः त्याला कांहीं कारण नाहीं.”

परंतु मंबाजीची द्वेषबुद्धि वाढतच चालली. बाई म्हणतात—

**“परंतु तो द्वेष चालवी अत्यंत । मारूं पाहे घात चिंतुनियां ॥**
**म्हणे ‘हे ब्राह्मण गुरु तरी शूद्र’। हेंचि तया छिद्र सांपडलें ॥**
**द्वेषही वाढला अत्यंत अद्भुत । सर्वांही लोकांत कळों आलें ॥**
**बहेणी म्हणे देव छळे नाना परी । निश्चय निर्धारीं पाहतसे ॥”**

मंबाजीच्या या हकीकतीवरून व तुकारामबुवांचा त्यानें छल केल्याची जी हकीकत बुवांच्या चरित्रांत आली आहे तीवरून, हा मंबाजी म्हणजे त्या वेळचें एक मोठें प्रस्थच होतें असें दिसतें. त्याच्या दुष्टपणामुळें महादाजीपंत कुळकर्णी, कोंडाजी, यांच्यासारखे देहू गांवांतले सज्जनदेखील त्याला भीत असत. असो.

आपाजी गोसावी या नांवाचे एक विख्यात राजयोगी पुण्यांत रहात असत. त्यांस मंबाजीनें पत्र लिहिलें कीं, ‘तुकोबा गोसावी हा जातीनें शूद्र असून देवळांत नेहमीं कथा करतो व ब्राह्मण त्याच्या पायांवर डोकें ठेवतात! रामेश्वरभट्ट हे थोर विद्वान् ब्राह्मणदेखील त्याला नमस्कार करतात. आम्हास तर हा मोठा अधर्म वाटतो; कारण हें वर्तन अगदीं वेदबाह्य आहे. ह्या अधार्मिक तुकोबास शासन करण्यास आपण समर्थ आहांत, तरी त्याला

---

१, २, तुकारामचरित्रांत ह्या दोघांचाही उल्लेख आला आहे. तुकोबांचे हे चाहते व साहाय्यकर्ते होते.

आपण पुण्यास बांधून न्यावें. शिवाय आणखी एक गोष्ट येथें नमूद करण्यासारखी आहे ती ही कीं, एक नवीन जोडपें येथें आलें असून त्यानें तुकारामाचें शिष्यत्व पत्करलें आहे. हीं नवराबायको स्वतःस ब्राह्मण म्हणवितात, परंतु वस्तुतः तीं सोनार आहेत. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं गांवचे कुळकर्णी ह्या जोडप्यास मोठा मान देतात, तेव्हां आतां या प्रकारास काय म्हणावें? हा जो स्वधर्माचा उघड उघड उपमर्द होत आहे, त्याला आपण कांहीं तरी आळा घालाल या आशेनें हें पत्र लिहीत आहें. ह्या धर्मभ्रष्ट लोकांस जर योग्य शासन केलें नाहीं तर उद्यां राज्यदेखील बुडेल!" मंबाजीचें हें पत्र वाचून आपाजी गोसावी यांच्या अंगाची अगदीं लाहीलाही झाली. ते आपल्याशींच म्हणाले, "तुकाराम शूद्र असून लोकांचे नमस्कार ग्रहण करतो? कोण हा अधर्म!

**सोनाराची जात म्हणविती ब्राह्मण। तयांचें दर्शन घेऊं नये॥**
**शूद्राचा अनुग्रह घेताती ब्राह्मण। भ्रष्टाकार पूर्ण होत असे॥**

अशा या पापी लोकांस शिक्षा केलीच पाहिजे!" मग त्यांनीं मंबाजीस उत्तर पाठवून कळविलें कीं "तुम्ही लिहिलेला मजकूर समजला. योग्य वेळीं जें काय करावयाचें तें करूं."

इकडे मंबाजीनें बहिणाबाई व त्यांचा भ्रतार यांच्यामागें सारखें टुमणें लावलें कीं तुम्ही देहू सोडून चालतीं व्हा. यामुळें त्या उभयतांस मोठी काळजी लागली. बाई म्हणतात—

**"कोणाचें न घेतां न बोलतां कांहीं। नसोनी अन्यायी द्वेष कां हा?॥**
**देवासी आठवीं चिंतुनी मानसीं। साक्ष तूंचि यासी पांडुरंगा॥**
**माझें अंतरींचें जाणतोसी तूंची। चित्तांत द्वेषासी थार नाहीं॥**
**हें विघ्न आणिलें यासी तूं निवारीं। तुकारामा शिरीं आहेसी तूं॥**
**बहेणी म्हणे देवा संचितासारखीं। नाना सुखदुःखें प्राप्त होती॥"**

बहिणाबाईनीं देहूस येतांना कोल्हापुरची आपली गाय बरोबर आणली होती. ती दूध देत असे. ह्या गाईस मंबाजीनें आपल्या घरांत नेऊन बांधून ठेवलें आणि तिला तो सोट्यानें बडवूं लागला. गाईचे दर्शन होईना म्हणून बहिणाबाईस फार वाईट वाटलें; व त्यामुळें तुकोबाही फार कष्टी झाले.

मंबाजीनें तीन दिवस गाय बांधून ठेवली होती व तेवढ्या वेळांत तिला गवत, पाणी वगैरे कांहीं न मिळाल्यामुळें ती सारखी ओरडत होती. तिसऱ्या दिवशीं सकाळीं तुकोबा निजून उठले तेव्हां त्यांची पाठ सुजली आहे असें दिसून आलें. सोट्यांच्या आघातांचे वळही त्यांच्या पाठीवर स्पष्ट दिसत होते. मंबाजीकडून गाईस मिळत असलेला मार तुकोबांस लागत होता. गाईच्या मुक्ततेविषयीं तुकोबांनीं पांडुरंगाची फार विनवणी केली. इतक्यांत असा चमत्कार झाला कीं मंबाजीच्या घरास अकस्मात् आग लागली. चोहोंकडून लोक धांवले व त्यांनीं आग विझविली. गाय सारखी हंबरडे फोडीत होती. तीन दिवस ज्या गाईचा शोध लागत नव्हता ती मंबाजीनें आपल्या घरांत बांधून ठेवलेली पाहून लोकांस मोठा संताप आला. त्यांनीं गाय सोडून बाहेर आणली तेव्हां तिच्या पाठीवर माराचे वण स्पष्ट दिसत होते. लोकांनीं बहिणाबाईच्या भ्रतारास बोलावून आणलें आणि, 'ही आपली गाय सांभाळ' म्हणून सांगितलें. आणि तुकोबांनीं काय केलें? बाई सांगतात—

**" तुकोबा धावुनी करी प्रदक्षणा । नमस्कारी ' गुण धन्य तुझे ॥**
**दाखविलें स्वप्न मज माये तुवां । न कळेचि धांवा केला मग ॥**
**तुझा माझा आत्मा एक सर्वगत । ते साक्षी निश्चित आली मज ' ॥ "**

तुकोबांचे हे कळवळ्याचे उद्गार ऐकून बहिणाबाईसही फार वाईट वाटलें. त्या म्हणतात—

**" मजही तैसेच क्लेश झाले फार । साक्ष हें अंतर विठ्ठलाचें ॥ "**

दुष्ट मंबाजीनें गाईच्या पाठीवर ओढलेल्या रट्ट्याचे वण तुकोबांच्या पाठीवर उमटलेले सर्वांनीं स्पष्ट पाहिले. पुढें, ही हकीकत रामेश्वरभट्टांस समजतांच ते धावून आले व त्यांनीं तुकोबांचें दर्शन घेतलें; व गाईच्या आणि तुको-

१ हे वाघोली गांवचे रहिवासी, मोठे विद्वान् होते. आरंभीं तुकोबांच्या छलकांपैकीं हे एक होते. तुकोबांनीं आपले अभंग इंद्रायणींत बुडवावे अशी आज्ञा यांनींच केली होती; परंतु त्या अभंगांच्या वह्या तेरा दिवसांनीं सुरक्षित वर आल्या हें पाहून व यांच्या शरीराचा दाह झाला असतां तो तुकोबांनीं शमविला त्यामुळें हे पुढें तुकोबांचे निस्सीम भक्त झाले.

त्यांचें समाधान झाल्यास करून घ्यावें, अशी कोणाला जिज्ञासा उत्पन्न झाली, तर ती केवळ अस्थानींच आहे असें केव्हांही म्हणतां येणार नाहीं. कोणी मांत्रिक, अंगांत आलेला, ज्योतिषी किंवा सामुद्रिक आला असतां त्याला प्रश्न विचारून घेण्याची जशी स्वाभाविक प्रवृत्ति असते, तसाच बहुतेक हा प्रसंग आहे. म्हणून या प्रसंगीं आणखी एक प्रश्न उपस्थित करण्याकडे मानवी मनाची प्रवृत्ति होणें क्षम्य आहे. तो प्रश्न असा कीं, एका जन्मांतील मृत्यु आणि दुसऱ्या जन्माचा प्रारंभ यांच्यामध्यें किती काळ जातो ? बहिणाबाईच्या या तेरा जन्मांच्या हकीकतीमध्यें या प्रश्नाला कोठें कांहीं उत्तर सांपडतें काय, याचा आपण थोडासा तपास करूं. छांदोग्योपनिषदामध्यें या प्रश्नाबद्दलचा उल्लेख क्वचित् प्रसंगीं आलेला आहे, व शंकराचार्यांनीं ब्रह्मसूत्रांवर जें भाष्य लिहिलें आहे त्यांतही ओघानें या विषयाचा उल्लेख केलेला आहे. परंतु कांहीं जन्म लवकर प्राप्त होतात आणि कांहींना पुष्कळ अवधि लागतो, असें फक्त सामान्यत्वेंकरून त्यांत सांगितलेलें आहे; कालासंबंधीं विशेष नियम कांहींच सांगितलेला नाहीं. ”

“ महाभारत, पुराणें, योगवासिष्ठ, गुरुचरित्र, इत्यादिकांतून पूर्वजन्माच्या ज्या कथा आहेत, त्यांत मधील अंतरें ठरविण्याला गमक अशीं प्रमाणें फारच थोडीं आढळतात. त्यामुळें तेथें कांहींच निश्चय करितां येत नाहीं. प्लेटोनें, तसेंच थिऑसफिस्ट पंथांतील कांहीं लेखकांनीं यासंबंधीं प्रसंगवशात् जीं कांहीं विधानें केलेलीं आहेत, त्यांवरून त्यांच्या कल्पनेप्रमाणें एका जन्माचा शेवट आणि दुसऱ्या जन्माचा प्रारंभ यांच्यामध्यें शेंकडों* वर्षें

---

* अलीकडे स्पिरिच्युॲलिझम म्हणून जें एक नवीन शास्त्र अस्तित्वांत येऊं पहात आहे त्या शास्त्राचा अभ्यास करणाऱ्या लोकांचेंही असेंच म्हणणें आहे कीं, मनुष्यप्राण्याचा आत्मा कांहीं वर्षें परलोकीं राहतो व नंतर तो पुनर्जन्म धारण करितो. ‘ प्लँचेट ’ च्या साहाय्यानें आमंत्रित केलेल्या एका आत्म्यास, दुसऱ्या एखाद्या आत्म्यास पाठवून देण्याची विनंति केली असतां “ त्या आत्म्यानें पुनर्जन्म धारण केला असल्यामुळें त्याला पाठवून देतां येत नाहीं ” असें उत्तर पहिल्या आत्म्याकडून अनेक वेळां मिळतें असें ते लोक सांगतात. ब्रह्मसूत्रांत मात्र याच्या उलट ‘ तृणजलूका ’ न्याय सांगितला आहे. —ग्रंथकर्ता

लोटत असलीं पाहिजेत असें दिसतें, परंतु बहिणाबाईच्या या हकीकतीवरून इतकीं अतिशय वर्षें मध्यंतरीं लोटत असतील असें दिसत नाहीं. बहिणाबाईनेंही मध्यंतरीं किती वर्षें लोटत होतीं, याबद्दल कोठेंच कांहीं स्पष्ट उल्लेख केलेला नाहीं. परंतु तिचे तेराही जन्म लवकर लवकर होत गेले असें अनुमान काढण्याला तिच्या कवितेमध्यें कित्येक ठिकाणीं कांहीं आधार आहेत. बहिणाबाई आपल्या आठव्या जन्मीं वेरूळ येथील धर्मदत्त नामक एका क्षत्रियाच्या पोटीं जन्मास येऊन अठरा वर्षांची होऊन निवर्तल्यानंतर फिरून '**नववीये जन्मीं तेथेंचि जन्मलें। नऊ वरुषें केलें स्थान तेंचि॥ तेचि माता पिता तेचि बंधुवर्ग**' असें बहिणाबाई म्हणते. आठव्या जन्मांत बहिणाबाई धर्मदत्ताच्या पोटीं आली तेव्हां त्याचें कमींत कमी वय धरलें तरी तें निदान १८ वर्षांचें असलें पाहिजे. त्या वर्षी त्याला मुलगी होऊन ती १८ वर्षांच्या वयाची होऊन मरण पावली असतां त्या वेळीं त्याचें वय ३६ वर्षांचें असलें पाहिजे. पुढें तीच मुलगी म्हणजे बहिणाबाई आपल्या नवव्या जन्मीं जेव्हां त्याच्या पोटीं आली, तेव्हां तो अतिशय वृद्ध झालेला असला तर पराकाष्ठा ६० वर्षांचा झालेला असेल; कारण या वयाच्यापलीकडे सामान्यतः संततिजननसामर्थ्य मानण्यांत येत नाहीं. तेव्हां अशा प्रकारची कल्पना केली तरी बहिणाबाईचा आठवा जन्म आणि नववा जन्म यांच्या दरम्यान पराकाष्ठा २४ वर्षें गेलीं असावींत. याच्यापेक्षां कमीच गेलीं असलीं पाहिजेत; जास्त जाणें मात्र शक्य नाहीं."

"बहिणाबाईनें आपल्या तेरा जन्मांच्या जीवंतपणाच्या आयुष्याची म्हणून एकंदर बेरीज ३५१ वर्षांची असल्याचें सांगितलें आहे. परंतु वास्तविक पाहतां हा आंकडा बरोबर नाहीं. तिनें ज्या ज्या जन्माचें आयुष्यमान सांगितलें आहे त्या त्या जन्माच्या त्या त्या आयुष्यमानाची बेरीज केली असतां ती ३५१ होते हें खरें आहे, परंतु बहिणाबाईनें आपल्या चौथ्या, पाचव्या व सहाव्या जन्मांचीं वयमानें मुळींच कोठें सांगितलेलीं नाहींत. तीं[1] अंदाजानें मिळविलीं असतां तिच्या तेरा जन्मांच्या आयुष्यमानाची बेरीज

---

१ कदाचित् या तीन जन्मीं ती अगदींच अल्पायुषी होऊन वारली असेल.

सुमारें ४०० होईल. म्हणजे अठराव्या¹ शतकांतील बहिणाबाईचे तेरा जन्म लागोपाठ मधल्या अंतराशिवाय झाले असें मानलें, तर बहिणाबाईचा या तेरा जन्मांपैकींचा पहिला जन्म चौदाव्या² शतकांत झाला असें प्राप्त होतें. परंतु प्रत्येक जन्मामध्यें कांहीं तरी अंतर गेलेलें असलेंच पाहिजे. परंतु तें अंतर फार नसावें, हें पूर्वीच्या आठव्या आणि नवव्या जन्मामधील अंतराच्या विवेचनावरून दिसून येत आहे. याशिवाय आणखीही एक कारण दिसत आहे, तें असें कीं, बहिणाबाईनें आपल्या जन्मांचीं ठिकाणें दिलेलीं आहेत, त्यांपैकीं पहिल्या जन्माचें ठिकाण बेटावद हेंच गांव होय, याबद्दल कोणालाही शंका येण्याचें कारण नाहीं. आतां बेटावद हें नांव कांहीं फारसें जुनें नाहीं. हें पौराणिक नांव नाहीं. हें संस्कृत³ नांव नाहीं. हें अलीकडील काळांतील आणि अपभ्रष्ट भाषेंतील तळोदें ( व्युत्पत्तीच्या दृष्टीनें तल+उदक किंवा तल देश ), सावदें, शहादें वगैरेसारख्या खानदेशांतील इतर गांवांच्या नांवांशीं अंशतः साम्य असलेलें ) कांहीं तरी एक नांव आहे. तेव्हां आतां बहिणाबाई ही आपल्या पहिल्या जन्माचें ठिकाण आपल्या तेराव्या जन्माच्या भाषेंत बदलून न सांगतां पहिल्या प्रचलित असलेल्या रूढ शब्दोच्चारपद्धतीप्रमाणें स्वाभाविक सांगत आहे, अशी सरळ कल्पना घेऊन जोंपर्यंत आपण चाललों आहों, तोंपर्यंत बेटावद या गांवाला ज्या कालीं बेताउद असें म्हणत असतील तो काळ चौदाव्या शतकापेक्षां पराकाष्ठा दोन तीन शतकांहून फारसा मागें असेल असें मानण्याला कांहीं कारण

---

(१) येथें 'सतराव्या शतकांतील' असें पाहिजे. कारण बाईचा जन्म शके १५५० त व मृत्यु १६२२ त झाला. यांत ७८ मिळविले म्हणजे इ. स. १६२८ हा जन्म सन व १७०० हा मृत्युसन येतो. अर्थात् हें सतरावें शतक. ( २ ) येथें 'तेराव्या शतकांत' असें पाहिजे. (३) 'बेटावद' हे नांव मूळचें 'वेत्रायुध' असण्याचा संभव आहे; निदान 'वेत्र' या शब्दपासून तें झालेलें असावें; पुढचा शब्द काय असेल तो असो. 'वेत्र' या संकृत शब्दाचें 'बेट' हें अपभ्रष्ट रूप होय. माळव्यांतील पुराणप्रसिद्ध 'वेत्रवती' नदीचें 'बेटवा' हें अपभ्रष्ट नांव येथें उदाहरणादाखल देतां येईल.

—ग्रंथकर्ता

नाहीं. ही विचारसरणी आपण ग्राह्य धरली, तर दहा अकराव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंतच्या दरम्यानच्या काळामध्यें बहिणाबाईचे हे तेरा जन्म झालेले असावेत, असें अनुमानानें म्हणतां येतें. याच्यापेक्षां जास्त अनुमानें काढण्याला मूळ ग्रंथांत जास्त आधार नाहींत; यामुळें या अज्ञेय प्रदेशांतील ज्ञान मिळविण्याची जिज्ञासा मोठ्या कष्टानें येथेंच थांबवावी लागत आहे, त्यास इलाज नाहीं."

बहिणाबाईनीं आपल्या अंतकालीं, घाईघाईनें नमूद करून ठेवलेल्या आपल्या बारा पूर्वजन्मांच्या तुटपुंज्या व त्रोटक माहितीच्या आधारानें कै. प्रो. शिवरामपंत परांजपे यांनीं केलेलें हें विस्तृत विवेचन त्यांच्या विद्वत्तेस शोभण्यासारखें आहे यांत संशय नाहीं. जितक्या निरनिराळ्या दृष्टींनीं या विषयाचा विचार करणें शक्य होतें तितक्या सर्व दृष्टींनीं विचार करून, त्यावरून जेवढीं अनुमानें काढतां येण्यासारखीं होतीं तेवढीं सर्व त्यांनीं काढलीं आहेत व म्हणूनच, अशा या सुंदर लेखाचा संग्रह एखाद्या मासिक पुस्तकांत होण्यापेक्षां खुद्द बहिणाबाईच्या या चरित्रांतच होणें अधिक योग्य होय, हें लक्षांत घेऊन सदर लेखाच्या बऱ्याच मोठ्या भागाचें अवतरण मी येथें मुद्दाम केलें आहे.

आतां प्रोफेसरसाहेबांच्या सूक्ष्म दृष्टींतून निसटलेल्या दोन गोष्टींचा येथें उल्लेख करून मी पुढें वळतों. पहिली गोष्ट ही कीं, बहिणाबाईच्या तेरा जन्मस्थलांपैकीं ज्या सात स्थळांचीं नांवें बाईनें दिलेलीं आहेत, तीं सर्व स्थळें या भरतखंडांतलींच आहेत व सहा स्थळें तर खुद्द महाराष्ट्रांतलींच आहेत. यावरून, एकदां या कर्मभूमींत–भारतवर्षांत–जन्मास आलेला मनुष्यप्राणी, पुनः दुसऱ्या कोणत्याही देशांत जन्म न पावतां, मुक्त होईपर्यंत, सगळे जन्म याच देशांत घेतो असें अनुमान काढतां येईल कीं काय हें वाचकांनीं ठरवावें. दुसरी गोष्ट ही कीं, बाईनीं आपल्या तेरा जन्मांतल्या आईबापांच्या नांवांपैकीं जीं नांवें नमूद केलीं आहेत, त्यांतील अकराव्या जन्मापर्यंतचीं, केदार, सात्त्विक, वर्धमान, धर्मदत्त, कौशिक आणि गोकर्ण हीं बापांचीं व रूपवंती, भामिनी आणि अद्भुता हीं आईचीं नावें हल्लीं फारशीं प्रचारांत नसलेलीं परंतु पूर्वीं रूढ असलेलीं अशीं आहेत. त्याचप्रमाणें, वारुणी,

हेमकळा, आणि सौजिन्या हीं खुद्द बहिणाबाईचीं, अनुक्रमें, त्यांच्या पहिल्या, तिसऱ्या व अकराव्या जन्मांतलीं नांवें अशाच प्रकारचीं आहेत. दुसऱ्या जन्मातील गुरूचें सुवर्मा हें नांवही जुन्यांपैकींच आहे. यावरून, बाईनीं दिलेली हकीकत, कालक्रमानें होत गेलेल्या नांवांच्या सुधारणेसही धरून आहे असें दिसतें. अस्तु.

आतां पुनर्जन्मासंबंधानें दोन शब्द लिहितों. अलीकडे आपल्या देशांत व पाश्चात्य देशांतही पूर्वजन्माची स्मृति असलेल्या अनेक व्यक्तींचीं उदाहरणें दृष्टोत्पत्तीस आलीं असून त्यांतील कांहीं उदाहरणांच्या विश्वसनीयतेविषयीं, प्रत्येक गोष्ट अगदीं तावून सुलाखून पाहणाऱ्या शास्त्रज्ञांचीदेखील खात्री होऊन चुकली आहे. मि. आर्थर लॅमरले यांच्या 'Prediction' नामक ग्रंथांत या प्रश्नाची चर्चा करून शेवटीं ' पुनर्जन्मसिद्धांतावांचून मानवी जीवनांतील विषमतेचा प्रश्न दुसऱ्या कोणत्याही रीतीनें समाधानकारकपणें सुटत नाहीं," असा निष्कर्ष सांगितला आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं तर भगवद्गीतेंत " तुझे पूर्वजन्म तुला आठवत नाहींत, पण माझे सगळे पूर्वजन्म मला अगदीं स्पष्टपणें आठवतात," असें अर्जुनास अगदीं स्वच्छ सांगितलें आहे. अस्तु.

## बहिणाबाईची संप्रदायपरंपरा

आदिनाथ शंकर–मत्स्येंद्रनाथ–गोरक्षनाथ–गहिनीनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञानेश्वर–सच्चिदानंदबाबा–विश्वंभर–राघवचैतन्य–केशवचैतन्य–बाबाजी चैतन्य–तुकाराम–बहिणाबाई.

यांपैकीं आदिनाथांपासून ज्ञानेश्वरांपर्यंतचीं सहा नांवें ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीच्या अखेरीस जशीं दिलीं आहेत तशींच आहेत. बहिणाबाईनीं दिलेल्या वरील परंपरेवरून तुकारामबुवा हे ज्ञानेश्वरांच्या परंपरेंतले ठरतात व त्यामुळें ' ज्ञानोबा माउली तुकाराम ' हें भजन करणाऱ्या वारकऱ्यांस आनंद वाटेल यांत संशय नाहीं; परंतु तुकोबाचे दुसरे शिष्य निळोबा यांनीं दिलेल्या परंपरेशीं बहिणाबाईची परंपरा जुळत नाहीं. निळोबांनीं दिलेली परंपरा येणेप्रमाणें :—महाविष्णु ( हंस )–ब्रह्मदेव–नारद–व्यास–राघवचैतन्य–केशवचैतन्य–बाबाजी चैतन्य–तुकाराम–निळोबा.

बहिणाबाई व निळोबाराय हीं दोघेंही तुकाराम महाराजचे शिष्य असतां त्यांच्या परंपरा कांहींशा भिन्न कां असाव्या हें मोठें गूढ आहे व हें गूढ ह. भ. प. पांगारकर यांसदेखील उकलतां आलें नाहीं. मला मात्र असें वाटतें कीं बहिणाबाईंचीच परंपरा खरी असावी.

पुणें येथील भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या शके १८३७ च्या वार्षिक इतिवृत्तांत बहिणाबाईचा शिष्य दीनकवि याची थोडीशी माहिती आली आहे. या कवीचा 'पंचीकरण' या नांवाचा १८ अध्यायाचा एक ओवीबद्ध ग्रंथ आहे तो त्यानें 'कृष्णापंचक्रोशीं'त 'चंदनगिरीतळवटी' येथें शके १६५२ साधारण संवत्सर या वर्षी लिहिला. या ग्रंथाच्या १८ व्या अध्यायाचे शेवटीं स्वतःचें वृत्त देतांना कवीनें बहिणाबाईचाही उल्लेख केला आहे. दीन कवि म्हणतो :—

**सिंधुजळाची मवणी । कोण करिता असे अवनी ।**
**तैसी योगाब्जनी- । सरोवर बहेणी सद्गुरु ॥**

**अनंत जन्मींचीं साधनें । ते मज झालीं उत्तीर्णें ।**
**पावन जालों दर्शनें । स्पर्शनें स्वामीच्या ॥**

**सकळ्गु ज्ञानदानी । केवळ चिन्मयरत्नाची खाणी ।**
**करी बाळपणीं... । अंगीकारू दीनाचा ॥**

**वर ... ना भीसी । दीन रक्षी पायांपाशीं ।**
**नामजप अहर्निशीं । नेणें देवासी दुजया ॥**

**नाहीं देवउपासना । नेणें ध्यानयोगसाधना ।**
**बाईवांचूनिया मना । नावडे जाणा आणीक ॥**

**तवं यात्रा पंढरीची आली । आज्ञा समर्थांची जाली ।**
**मूर्ति विठोची देखिली । तेथें जाली झडपणी ॥**

**येउनी जडला आंगेंसी । बुडवील प्रपंचासी ।**
**चिरा पडिला लोकलाजेसी । मातापितयासी अतिदुःख ॥**

**पूर्वप्रारब्धाची गती । पिता बळें व्यापार करविती ।**
**येणेंजाणें पुणयाप्रती । तेथें अपूर्व वर्तलें ॥**

एक दुर्बळ ब्राह्मण । करी ज्ञानेश्वरीचें पारायण ।
त्यातें अध्याय मागून । नित्य पठण होतसे ॥
एको विष्णु महद्भूत । लागलें देखोनी ज्ञाननाथ ।
त्यामाजी आपण प्रवेशत । बुडाला हेत आघवा ॥
एक होतें दोन्ही जालीं । शेखीं लंगोटी दिधली ।
पुढें आज्ञा केली । जावें भेटी बाईच्या ॥
भेटी होतां बाईची । म्हणती झडपणी महद्भूताची ।
जाली असे आतां याची । सुटिका केविं होय ॥
आतां सांगिजे विचारास । त्याचा कीजे अभ्यास ।
तरी कांहीं येक सुखास । पावसी बापा ॥
कांहीं त्याचा अभ्यास करीं । ... तरींचें व्यापे बाहेरी ।
नवल अनुग्रहाची परी । जालें आनें आन ॥
भये होतें तें गेलें । मीपणाचें भान उडालें ।
होतें परंपरे जें आलें । तें कोंदाटलें अंतर्बाह्ये ॥
तें झाडितां न झडे । अखंड उभें मागें पुढें ।
रूपेंवीण अरूप गाढें । सदट दाटे सघन ॥
असो हे अनुभवाची बोल । बहेणाबाई सद्गुरु सखोल ।
ऐकोनी संतां येती डोल । बोबडे बोल हे माझे ॥

बहिणाबाईचा शिष्य हा दीन कवि कोणत्या गांवचा रहिवासी होता हें समजत नाहीं; त्यानें जें ग्रंथरचनेचें स्थल सांगितलें आहे तें कृष्णानदीच्या पंचक्रोशींतलें चंदनगिरी डोंगराच्या पायथ्याजवळचें एखादें गांव असावें; व तेंच त्याचें राहण्याचें ठिकाण असावें असें वाटतें. असो.

बाईच्या कवितेचा जो संग्रह रा. उमरखाने यांनीं प्रसिद्ध केला आहे त्यांत अभंग, ओव्या, पदें, श्लोक, आरत्या वगैरे मिळून बाईच्या एकंदर ५८१ कविता समाविष्ट झालेल्या आहेत. शिवाय, बाईचा मुलगा विठ्ठल यानें बाईवर रचलेल्या दोन आरत्या शेवटीं दिल्या आहेत. रा. उमरखानें यांनीं सदर ग्रंथाच्या प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे कीं, " हा हस्तलिखित प्राचीन

ग्रंथ संत बहिणाबाई यांचे वंशजांपाशीं होता. त्यांना मी हा ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याची उत्कट इच्छा प्रदर्शित केल्यावरून, त्यांनीं अनमान न करतां तो दिला, याबद्दल मी त्यांचा आभारी आहें." यावरून, बाईच्या वंशजांपाशीं असलेली बाईची सर्व कविता रा. उमरखाने यांनीं प्रसिद्ध केली आहे हें उघड दिसतें. अर्थात्, याशिवाय बाईची आणखी कांहीं कविता अनुपलब्ध असेल असें अनुमान करण्यास फारशी जागा आहे असें वाटत नाहीं. परंतु 'मुमुक्षु' पत्राच्या ता. १९ फेब्रुवारी १९१४ च्या अंकांत त्या पत्राचे संपादक ह. भ. प. पांगारकर हे लिहितात, "रा. उमरखाने यांनीं बाईच्या कवितेचा आणखी शोध चालविला असून, नवीन माहिती व अभंग त्यांना मिळत आहेत. ती सर्व माहिती व ते सर्व अभंग प्रसिद्ध झाल्यावर बहिणाबाईच्या चरित्रावर अधिक प्रकाश पडेल." यावरून, छापलेल्या कवितेबाहेर बहिणाबाईची आणखी कांहीं कविता असून त्यांतली थोडीशी कविता रा. उमरखाने यांस उपलब्ध झाली असावी असें वाटतें. परंतु, या गोष्टीस आतां २४ वर्षें होऊन गेलीं तरी सदर कविता व माहिती ज्या अर्थी त्यांनीं अद्याप प्रसिद्ध केली नाहीं, त्या अर्थी त्यांना फारशी नवीन कविता मिळाली नसावी किंवा मिळाली असून कांहीं अपरिहार्य कारणामुळें ती प्रसिद्ध करतां आली नसावी, असा तर्क करणें भाग आहे. बहिणाबाईनीं एखादा स्वतंत्र सलग ग्रंथ लिहिलेला नसून त्यांची सर्व कविता 'स्फुट कविता' आहे व त्यामुळें ती इतस्ततः विखुरलेली असणें शक्य आहे. बाईची सर्व कविता जर उपलब्ध होईल तर तींत, तुकोबांच्या निर्याणापासून बाईच्या निर्याणापर्यंतच्या सुमारें ५० वर्षांच्या कालांतला बाईच्या आत्मचरित्राचा भाग कदाचित् सांपडण्याचा संभव आहे.

बहिणाबाईची कविता अगदीं सोपी असून अपरिचित असे फारसे जुने शब्द तींत नाहींत. कांहीं ठिकाणची रचना जरी थोडीशी ओबडधोबड आहे तरी त्यावरून इतकेंच फार तर म्हणतां येईल कीं प्रसंगविशेषीं बाईनीं भाषेकडे फारसें लक्ष दिलेलें नाहीं. परंतु बाईचा पारमार्थिक अधिकार आणि आध्यात्मिक अनुभव फार मोठा असल्यामुळें व त्यांची सगळीच कविता स्वयंस्फूर्तिजन्य असल्यामुळें एक प्रकारचें दिव्य तेज त्या कवितेंत सर्वत्र

चमकत आहे. ही सगळी कविता पारमार्थिक असून, भक्ति, वेदांत वगैरे विषयांचें विवेचन तींत आलें आहे. आतां नमुन्यादाखल बहिणाबाईच्या कवितेंतले कांहीं निवडक उतारे येथें देतां.

## अभंग

१ आम्ही तों निर्हेत साक्ष ऐसी येत । भोगांमाजी चित्त क्षण नाहीं
आतां मना तुझें येथें काय चाले । निर्हेत पाउलें विठ्ठलाचीं
मनांत पाहिलें बुद्धींत गाइलें । चित्तांत ध्याइलें विठ्ठलासी
वासना गाळिली सर्वही चाळिली । शांति स्थिरावली विठ्ठलीं हे
काम क्रोध लोभ मत्सराचें अंग । झाला पांडुरंग आपणचि
बहेणि म्हणे मना हेतूचा उगाणा । करूनी निर्वाणा पाहतसे

२ नयन गोंविले ध्यानीं केशवाचे । श्रवण ते हरीचे कीर्तनीं हो
विवेकें इंद्रियां दाखवुनी सुख । गोंविलीं आणिक नाठविती
वाचा हे गोंविली नामसंकीर्तनीं । सेवा मुक्तपाणि केशवातें
पाय तीर्थयात्रा देवांच्या दर्शना । कर्मेंद्रिय खुणा ओळखाव्या
दहाही इंद्रियें विवेकें गोंविलीं । मना तूं निर्बळी याचि योगें
बहेणी म्हणे मना विषयसेवनीं । न येती नेमुनी टाकिलीं तीं

३ भक्ति हें कारण साधन वरिष्ठ । रोकडें वैकुंठ हातीं वसे
स्थिर करीं चित्त प्रेम अखंडित । पावसी अच्युत पद पाहें
भक्तीपाशीं ज्ञान वैराग्य आंदणें । सर्वही साधनें लया जाती
बहेणि म्हणे भक्ति विरक्तीचें मूळ । चित्त हें निश्चळ करीं कां रे

४ नामसंकीर्तन सर्वकाळ जया । भक्तिवंत तया म्हणों आम्ही
क्षण एक नाहीं नामेविण वाचा । सोल हा भक्तीचा सर्वकाळ
नेत्रीं हरिध्यान मुखीं तें कीर्तन । सर्वदा श्रवण मोक्षशास्त्रें
सेवा घडे हातें पायीं प्रदक्षिणा । विश्रांति धारणा आत्मयाची
आठही प्रहर नाहीं आराणुक । संतांघरीं रंक होउनि ठेला
बहेणि म्हणे भक्ति खरी मोक्षदाती । पाहिजे संगती संतसेवा

५ प्रपंच असत्य कळों आला जया । विषय हे तया नावडती
उदासीनापरी वर्ततो प्रपंचीं । आशा हे मनाची सांडोनियां
मनाचा स्वभाव संकल्प विकल्प । होय साक्षीरूप तयांचाही
बुद्धीचा निश्चय अनुसंधानीं चित्त । अहंकारीं हेत अहंतेचा
सर्वही मायिक व्यवहार जाणती । निश्चय अद्वैतीं ठेवुनियां
बहेणि म्हणे माया सत्य ना असत्य । श्रीगुरूनें तथ्य सांगितलें

६ ब्रह्म तों अद्वय श्रुतीचे संमतें । वेगळी माया ते म्हणों कैसी
कोणासी पुसावें मायेचें ठिकाण । सद्गुरूवांचून सत्य जाणा
सुवर्ण कांकण नाम मात्र भिन्न । ज्ञानदृष्टी जाण ओळखावें
तोय तरंग एक भेद नाममात्र । ऐक्य हें सर्वत्र ज्ञानदृष्टी
सूत वस्त्र दोन्ही ऐक्यता सहजें । ज्ञानदृष्टी ओजें पाहिलिया
बहेणि म्हणे ऐसा पाहतां विवेक । सहजचि ऐक्य मायाब्रह्मीं

७ सूर्याचिये घरीं राहणें जयासी । अंधकार त्यासी स्वप्नीं नाहीं
तैसा स्वानुभवी न देखे तो माया । ब्रह्म तो अद्वयानंद अंगें
परीस तो जाणे काय सोनें लोह । निर्ममते मोह कदा नाहीं
बहेणि म्हणे न लागे तृषा ते जीवना । पूर्णत्वें भावना भावशुद्धि

८ सूर्याचिये अंगीं भासलें मृगजळ । सूर्य तो केवळ नेणे तया
तैसी जाण माया ब्रह्मींच आभासे । परी स्पर्श नसे ब्रह्मत्वासी
चुंबकासंन्निध लोहासी भ्रमण । सूर्यसत्ते जन वर्ततसे
बहेणि म्हणे ऐसा अनुभव पाहिजे । स्वसुखीं राहिजे निरंतर

९ दृश्य आणि द्रष्टा दर्शनेंसमवेत । ब्रह्म सदोदित सर्व काळ
काय घेऊं काय सोडूं कोणीकडे । अनंत ब्रह्मांडें रोमरंध्रीं
ध्येय ध्याता ध्यान ज्ञेय ज्ञप्ति ज्ञान । साध्य तो साधन आपण झाला
बहेणि म्हणे द्वैत स्वप्नामाजी नसे । अवघाचि प्रकाशे राम माझा

वरील अभंगांत व्यक्त झालेलें बहिणाबाईचें विलक्षण अध्यात्मज्ञान पाहून वाचकांस मोठें कौतुक व आश्चर्य वाटेल यांत संशय नाहीं. " बाईचें हें वेदांतज्ञान पाहून आमच्या स्वतःच्या ज्ञानाच्या आकुंचितपणाबद्दल लाज

वाटते," अशा अर्थाचे उद्गार कै. गुलाबराव महाराजांसारख्या अधिकारी पुरुषानें काढले ते उगाच नव्हत.

"आपणास मोक्षमार्गाचें ज्ञान करून देणारा अधिकारी पुरुष कोणी भेटत नाहीं. निव्वळ शब्दज्ञान सांगून स्वतःची प्रशंसा करणारांचा भरणा मोठा," असा स्वानुभव सांगतांना बाई म्हणतात—

१० जेथें पुसों जावें तेथें अभिमान। आपुलेंचि ज्ञान प्रतिष्ठी तो
जाणोनी अंतर न सांगती कोणी। कोणाचे वचनीं स्थिर राहों ?
तप हें लक्षण सांगती धारणा। नाना उपासना नाना मंत्र
एक ते सांगती पंचमुद्रा जप। एवं खटाटोप आसनाचा
एक ते सांगती तीर्थें तपें व्रत। एक ते अनंत पूजाविधि
बहेणि म्हणे आतां नव्हे स्थिर मन। जेथें तेथें गुण अविद्येचा

११ कामाचे विकिले क्रोधाचे जिंकिले। लोभाचे अंकिले सर्व भावें
तयांसी पुसतां काय देती सुख। अंतरीं विवेक नाहीं जयां
आशेलागीं जयां आंदण दिधलें। ममतेचे झाले सेवक ते
बहेणि म्हणे तेचि ग्रासिले मायेनें। आम्हां सोडवणें केवीं होती

संतमहिमा—

१२ दुसरियाचे दुःखें शिणे ज्याचें चित्त। तोचि एक संत ओळखावा
तयासी पुसतां हरील तो शीण। दुःख घे हिरोन रोकडेंचि
परोपकार जया आलासे विभागी। शांति हें सर्वांगीं डोलतसे
बहेणि म्हणे नाहीं आपुलें पारिखें। वर्ततो विवेकें ज्ञानदृष्टी

श्रीपांडुरंगवर्णन—

१३ माझा दीननाथ दीनबंधु हरि। नांदे भीमातीरीं पंढरिये
विटे नीट उभा समचरण साजिरीं। पाउलें गोजिरीं सकुमार
वैजयंती माळा रुळतसे गळां। कांसेसी पिंवळा पीतांबर
भाळीं ऊर्ध्व पुंड्र कुंडलें गोमटीं। चंदनाची उटी सर्वांगासी
शिरीं टोप साजे रत्नाचा साजिरा। काढियेला तुरा मोतियांचा
जैशा हिऱ्याच्या शोभती दंतपंक्ति। बहेणि म्हणे ध्याती हृदयामाजी

उपदेश—

१४ आणिलें उसनें पांचांचें शरीर । साधावया सार मोक्षपंथ
येथें तुवां जरी मांडिला आळस । होइल तरी नाश स्वहिताचा
भाड्याचें घोडें करूनी आणिलें । पाहिजे साधिलें कार्य त्वरें
बहेणि म्हणे ज्याचें नेईल तो धनी । होईल ते हानि स्वहिताची

मृत्युलोकीं पुनः पुनः जन्म घेणें कोणास भाग पडतें ?—

१५ कर्म करी देहीं धरूनी फळाशा । द्वैताचा वळसा जयापाशीं
तयासी हा जाण प्राप्त मृत्युलोक । रजोगुणी एक ओळखावा
गर्व जयापाशीं क्रोध सर्व काळ । निद्रा ते जवळ ठेविलीसे
मोहाची सांखळी सर्व काळ कंठीं । परस्त्रिया दृष्टी न्याहाळीत
आलियानें घरा इंद्राची संपत्ति । समाधान चित्तीं नाहीं जया
पापिया निष्ठुर विषयांचा ध्यास । जया अविश्वास सर्व काळ
चुंबक निंदक भूतमात्रीं द्रोह । नाहीं निःसंदेह चित्त ज्याचें
बहेणि म्हणे ऐसा वर्ते जो मानसीं । मृत्युलोकीं त्यासी देह घेणें

बहिणाबाईचे कांहीं अभंग तुकोबांच्या अभंगांशीं अगदीं सदृश आहेत. खालील अभंग पहा :—

१६ भक्तिप्रेमसुख न कळे आणिकां । पंडितां वाचकां वैदिकांसी
जीवन्मुक्त जरी झाला आत्मनिष्ठ । भक्तिप्रेमसुख दुर्लभ त्या
अभेदुनी भेद स्थापिला पैं अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख
बहेणि म्हणे देव कृपा करील कांहीं । तरीच हें ठायीं पडे वर्म

आतां तुकारामबुवांच्या खालील अभंगांशीं वरील अभंग ताडून पहा—

भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां । पंडित वाचकां ज्ञानियांसी
आत्मनिष्ठ जरी जाले जिवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्यां
तुका म्हणे कृपा करील नारायण । तरीच हें वर्म पडे ठावें

किती विलक्षण साम्य ! तुकारामबुवांचे अभंग बहिणाबाईच्या नित्यपाठांत असल्याचा हा परिणाम आहे.

बहिणाबाईनीं ब्राह्मणांचें महत्त्व फार वर्णिलें आहे, परंतु ब्राह्मणाच्या जातींत जन्म पावला तो ब्राह्मण अशी मात्र त्यांची ब्राह्मण्याची व्याख्या नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. यासंबंधानें त्यांनीं खालील अभंगांत केलेलें विवरण मननीय आहे:—

**१७ जीव हा ब्राह्मण म्हणावें इत्यर्थ। तरी येथें अर्थ सांपडेना**
**सर्वां ठायीं जीव सारिखाचि एक। पशुपक्षी देख चांडाळादि**
**पुढें जीव होती मागें बहु झाले। ब्राह्मणत्व आलें नाहीं तयां**
**बहेणि म्हणे जीव प्राणिमात्रीं एक। ब्राह्मणत्व देख म्हणों नये**

**१८ जरामृत्युभय सर्वांसी समान। तरी ते ब्राह्मण केंवि म्हणों**
**यालागीं विवेक धरूनि मानसीं। ब्राह्मणपदासी ओळखावें**
**मातापितयाचे जाळिलें शरीरा। ब्रह्महत्या नरा केविं नोहे**
**बहेणि म्हणे देह ब्राह्मण तो नव्हे। विवेकवैभवें विचारितां**

**१९ आतां वर्ण हाचि ब्राह्मण म्हणावा। तरी तो अनुभवा नये कांहीं**
**ब्राह्मणावेगळा वर्णही अतीत। पाहतां निश्चित भासतसे**
**श्वेत तो ब्राह्मण क्षत्री तो आरक्त। वैश्य वर्ण पीत नाहीं ऐसें**
**कृष्णवर्ण शूद्र नाहीं ऐसा भेद। आयुष्याचा नाद सारिखाचि**
**बहेणि म्हणे वर्ण ब्राह्मण तो नव्हे। विवंचुनी पाहें मनामाजी**

**२० आतां यातीलागीं म्हणावें ब्राह्मण। तरी तें निर्वाण नये चित्ता**
**निरसुनी सर्वही विचारावें हातें। उरे तें आईतें ओळखावें**
**ऋष्यशृंगी झाला मृगीचीये पोटीं। गौतम शेवटीं कुशास्तरणीं**
**जंबुक ऋषी तो जन्मला जांभुळीं। वाल्मीकाची कुळी वारुळीं ते**
**कैवर्तकीपोटीं व्यास तो जन्मला। विश्वामित्र झाला क्षेत्रणीचा**
**वसिष्ठाचा जन्म उर्वशी-उदरीं। अगस्ति निर्धारीं कलशोद्भव**
**नारद प्रसिद्ध ठाउका सर्वांसी। दासी हे तयासी प्रसवली**
**बहेणि म्हणे जाती नव्हेचि ब्राह्मण। ब्राह्मणाचो खूण वेगळीच**

पुढें पाडित्य, ब्रह्मकर्म, इत्यादिकांचाही ब्राह्मण्याशीं कांहीं संबंध नाहीं असें स्पष्ट सांगून, खऱ्या ब्राह्मण्याची व्याख्या बाईनीं पुढीलप्रमाणें केली आहे :–

२१ गुणांत असोन गुणासी नातळे । क्रियेसी न कळे अणुमात्र
तोचि रे ब्राह्मण ओळखावा जनीं । द्वैत तया स्वप्नीं आढळेना
षडुर्मिरहित षडभाव नातळे । दोषाचेनि मेळे सांपडेना
बहेणि म्हणे सत्य न सांडी सर्वथा । ब्राह्मण तत्त्वता तोचि एक

२२ निर्विकल्प जया समाधि जोडली । चित्तासी अमोलीं परब्रह्मीं
तोचि एक खरा ब्राह्मण वेदार्थें । आणिक तीं मतें पाखंडाचीं
सर्वां भूतीं एक आत्मा देखियेला । शांतीचा ओतिला मूर्तिमंत
बहेणि म्हणे जैसें आकाश सर्वत्र । तैसा तो एकत्र जगामाजी

२३ शम दम सर्व साधिले नवगुण । संतोपसंपन्न सर्वदा जो
ब्राह्मण वरिष्ठ श्रेष्ठाचाही श्रेष्ठ । जयाचेनि भ्रष्ट मोक्ष पावे
तृण मोक्ष दंभ गेला अहंकार । वृत्ति निर्विकार सर्व कर्मीं
बहेणि म्हणे ज्याची निरसली वासना । ब्राम्हण तो जाणा ब्रह्मनिष्ठ

स्फुट अभंग :—

२४ अनुताप हा अग्न लागला अंतरीं । आतां कृपा करीं जगन्नाथा
तापत्रयें फार पीडिलें शरीर । न लगे संसार स्वर्ग तोही
पडलीं इंद्रियें धडाडित अंगें । कृपा करीं वेगें पांडुरंगा
बहेणि म्हणे सुख तेंचि झालें दुःख । ऐसा हा विवेक संचारला

२५ चित्तशुद्धि होय भक्तीचेनि योगें । होईल वाउगें दृश्यजात
वैराग्य संचरे मनामाजी जाण । जैसें हें वमन सर्व तैसें
विषय असत्य राहिलें तें जळ । वाटतें सकळ भ्रांतिरूप
बहेणि म्हणे जया शुद्ध चित्त नाहीं । प्रपंच तो कांहीं ना सुटेचि

२६ अनुतापें विरक्त होईल मानस । विषयांचा ध्यास तुटेल तैं
वाटेल जैं चित्ता नावडती जन्म । इंद्रियांसी नेम होय तेव्हां

स्वर्गसंसाराची तुटेल आवडी । होय देशोधडी कामक्रोध
बहेणि म्हणे ऐसें होय जैं अंतर । तैंच होय वर सद्गुरूचा

२७ विधिहीन वर्ते वेदांसी न मानी । श्रेष्ठ अव्हेरूनी वर्ततसे
तया दुर्जनासी नरकयोनीं जन्म । जाणावा अधम तमोगुणी
करितसे घात विश्वास देउनी । हिंसक अवगुणी मंदबुद्धि
अखाद्यभक्षण अचोष्यचोषण । अपेयाचें पान सुख जया
न धरी भय मनीं नरक होती मज (?) । वर्तेणें सहज पापबुद्धि
बहेणि म्हणे ऐसा जाणा तमोगुणी । पडेल पतनीं हीनमति

२८ रूप नसोनियां डोळियासी दिसे । तेजही प्रवेशे नेत्रांमाजी
तें रूप चोरटें ओळखें तूं चित्ता । बुद्धीचा आरुता पैस जये
सगुण निर्गुण लक्षातीत वस्तु । झाला जेथें अस्तु इंद्रियांचा
बहेणि म्हणे शब्दीं न सांपडे तरी । शब्द त्याभीतरीं अंतर्बाह्य

२९ बोध नंद बुद्धि यशोदा गोकुळीं । जन्म झाला कुळीं गौळियाचे
तें रूप सांवळें पहा डोळेभरी । बाह्य अभ्यंतरीं ओतप्रोत
नवविध नवमास पूर्ण झाले तेथ । कृष्ण अखंडित जन्मला तो
बहेणि म्हणे रूप सांवळें सुकुमार । राक्षसांचा भार उतरिला

३० चालतां पाउलीं पंढरीच्या वाटे । ब्रह्मसुख भेटे रोकडेंचि
दिंडी ध्वजा भार चालती अपार । मृदंग गंभीर स्वर देती
हमामा हुंबरी घालिती परवडी । होउनी उघडी विष्णुदास
बहेणि म्हणे ऐसा आनंद वाटेचा । कोण तो दैवाचा देखे डोळां

३१ तुलसीवृंदावनीं गाईचें गोठणीं । बैसतां भजनीं देव जोडे
नाहीं या संशय पाहिजे विश्वास । साक्ष अंतरास येत असे
वृंदेसी वचन दिलें नारायणें । तुजला टाकून न वसें कोठें
मग ते तुलसी झाली अंगें वृंदा । म्हणोनि गोविंदा प्रीति तिची
बहेणि म्हणे करा तुलसीस्मरण । केलिया पावन तीन्ही लोक

३२ आत्मज्ञान डोळां दिसे ऐसें नाहीं । लक्षी जैसें पाहीं कांहीं मना
बुद्धीचा उपरम होईल सर्वेही । आत्मज्ञान ठायीं पडे तेव्हां
आत्मज्ञान नव्हे सुवर्णाचा गोळा । चंद्र सूर्य मेळा सांपडेल
बहेणि म्हणे ज्ञान साधेल संगतीं । संतांचे निश्चितीं बुद्धियोगें

३३ माझिया हा मनें घेतला उच्चाट । पहावें वैकुंठ पंढरी हे
सांडोनियां सर्व कामधाम धंदा । वेधलें गोविंदा गोपिराजा
अधरापासुनी भेदियेलें चक्रें । इंद्रियें एकत्रें करूनियां
प्राणाचा निरोध करूनी पाहिलें । निश्चयें गाईलें नाम तुझें
तंव पुढें नाद गर्जताती नाना । तेथील धारणा ठाकियेली
सोहंशब्द तोही अरुणचि पाहें । लक्षीं लक्ष जाये मिळोनियां
सद्गदित कंठ दाटतांचि मन । करोनियां स्नान चंद्रभागे
बहेणि म्हणे देव विठ्ठल पाहिला । द्वैतभाव गेला हारपोनी

३४ आम्हां जितेंचि मरणें । मेलेपणीं जीत जाणें
काय करूं ऐसें झालें । तुकारामें मज केलें
शब्द आमुचा खुंटला । निःशब्दाचा उदयो झाला
बहेणि म्हणे शक्ति नाहीं । शक्तीवीण वर्तू देहीं

३५ नव्हे करणीची आहांच । जीवें पायीं जडलों साच
आतां टाकिलें करावें । शरण केशवासी जावें
देउनि प्रपंचासी फांटी । पाय तुझे धरिले कंठीं
वैरी गांजिती छळिती । परि हे तुझे पाय चित्तीं
नखीं देती जरी सुया । तुज न सोडीं देवराया
जरी केलासी साह्यकरी । बहेणि म्हणे दया करीं

३६ माझिया रे मना सखया सज्जना । ऐक तूं प्रार्थना विनवीतसें
सांडीं हें मीपण अहंतालक्षण । निवांत आपण सुखी राहें
किती वणवण करिसी भ्रमण । व्यर्थ वायांविण श्रम देहीं

मायामृगजळापाठीं कां लागसी । कष्ट कां भोगिसी चौऱ्याशींचे
येणें काय हित घडों पाहे तुज । धरीं कांहीं लाज सज्जनाची
बहेणि म्हणे गेले संत जया वाटां । पावले ते निष्ठा सुखरूप

३७ सच्छास्त्रश्रवण सत्संगसेवन । देव तयाहून आणिक नाहीं
शिष्टासी सन्मान शास्त्रांचा अभिमान । असे तोचि जाण ब्रह्मनिष्ठ
शांति क्षमा दया उपजे भूतकृपा । तोचि एक देखा ब्रह्मनिष्ठ
बहेणि म्हणे कर्मे ब्रह्म जया माने । तोचि पैं जाणे ब्रह्मरूप

३८ धन्य तें गोकुळ धन्य ते गोपाळ । धन्य लोकपाळ पुण्यशील
धन्य तोचि देश धन्य तोचि वंश । जेथें हृषीकेश अवतरले
धन्य तेचि माता धन्य तोचि पिता । जन्म कृष्णनाथा ज्यांचे कुशीं
धन्य त्या गोपिका कृष्णीं तन्मयता । धन्य ते सरिता कृष्ण पाहे
धन्य वृंदावन धन्य गोवर्धन । चारी नारायण गाई सदा
धन्य तो दिवस धन्य तोचि मास । जन्मला अविनाश कृष्ण सखा
बहेणि म्हणे धन्य नरनारीबालकें । घेती कृष्णसुखें सर्व काळ

३९ लाचावलें मन नव्हे त्यावेगळें । देखिलें सांवळें परब्रह्म
झाली तन्मयता हालेना पापणी । घेत असे धणी स्वरूपाची
विसरलें मन आपलें आपण । पडोनि ठेलें शून्य मी–तूंपणा
नाठवे मीपण पडला विसरू । इंद्रियव्यापारू पारूषला
राहिलीं इंद्रियें अचेतन वृत्ती । मना आत्मस्थिति लागलीसे
लागल्या पैं वृत्ति खुंटली हे गति । बहेणि तें भोगिती आत्मसुख

४० अष्टधा प्रकृति तेचि ह्या गोपिका । अष्टभाव देखा गोपाळ हे
क्रीडती गोकुळीं सदा या शरीरीं । स्वानंदें निर्भरीं परमानंद
इंद्रियगोधनें विषयतृणचरें । दुभती अपारें निजसत्त्वें
गोरसाचे डेरे अखंड संचले । सुखें सुखावले स्वानुभवें

**तेणें सुखानंदें नाचती गोपाळ । करिती गदारोळ गोपिका त्या**
**बहेणि म्हणे जेथें कृष्णाचा अवतार । तेथें व्यभिचार स्वप्नीं नाहीं**

श्रीकृष्णचरित्रांतील रासक्रीडादि प्रकरणांत व्यभिचार सूचित करणाऱ्या ज्या कथा आल्या आहेत त्यांचा अर्थ संत कोणत्या प्रकारें लावतात हें बहिणाबाईच्या या अभंगावरून लक्षांत येईल. ' बहेणी म्हणे जेथें कृष्णाचा अवतार। तेथें व्यभिचार स्वप्नीं नाहीं,' या चरणात कृष्णचरित्रांतील व्यभिचाराची कल्पना बाईनीं साफ धुडकावून लावली आहे. ' शिवकल्याण ' यानींही भागवताच्या दशमस्कंधावरील आपल्या टीकेंत, अध्यात्मदृष्टीनें या कथाचा खरा अर्थ फार सुंदर रीतीनें विशद केला आहे.

बहिणाबाईची उपलब्ध कविता लक्षपूर्वक वाचल्यावर एक गोष्ट ठळकपणे नजरेस येते ती ही कीं ही सगळी कविता सारख्याच दर्जाची नाहीं. काहीं कविता फार भारदस्त, प्रासादिक आणि प्रसन्न असून, बाकीची कविता ओढूनताणून रचल्यासारखी दिसते. यावरून, तुकोबांचा अनुग्रह होऊन बाईस आत्मज्ञान प्राप्त झाल्यानंतर त्यांनीं जी कविता रचली तो एक भाग व त्यापूर्वी रचलेली कविता हा दुसरा भाग, असे या कवितेचे दोन भाग करण्यास हरकत नाहीं. ह्या दुसऱ्या भागांतील बहुतेक कविता तुकोबाच्या कांहीं अभंगांचें निव्वळ शब्दातर आहे.

तुकोबानीं आपणास उपदेश दिल्याचा उल्लेख बहिणाबाईनीं पुढील अभंगात केला आहे :—

**४१ तुकारामरूपें प्रत्यक्ष बोलत । होईं सावचित्त सावधान ॥**
**पाहे परतोनी आपुलिया दिठी । सांगितली गोष्टी एक कानीं ॥**
**तयाचा उच्चार करूं नये वाचे । झालेंसे चित्ताचें समाधान ॥**
**बहेणि म्हणे मना केलासे प्रकाश । अस्ता उदयास ठाव नाहीं ॥**

## सौरी

**४२ काजळ कुंका भुलसी वेड्या सौरियांच्या वेषा ।**
**मुळीं कामा पडिला चिरा म्हणोनि नाचों ऐशा ॥**

निलाजऱ्या जाय बोलसी तूं काय ।
लटिक्यामागें हिंडोनि तुज हाता येतें काय ॥
विषयाचा धुमस घेउनि हिंडसी आम्हांमागें ।
मुळींचा तो ठाव रिता विनोद कोणासंगें ॥
बहेणि म्हणे सौरीपुढें झांकण तें काय ।
खरें खोटें अवघें तुझें कळे अंतर्बाह्य ॥

बहिणाबाईनीं रचलेल्या एकंदर ११ आरत्या त्यांच्या पद्यसंग्रहांत छापल्या आहेत त्या फार सुंदर आहेत.

बहिणाबाईच्या श्लोकांचा नमुना :—

४३ गुरुकृपा जरि पूर्ण असे तया । शरण त्या श्रुतिशास्त्र कथा तया ॥
हरिहरादिक किंकर दास हे । म्हणतसे बहिणी कवतूक हें ॥

४४ गुरू तो खरा जो बरा ज्ञाननिष्ठ । स्वधर्मक्रिया पाळि जो वेदनिष्ठ ॥
जया ज्ञान तत्त्वार्थ शुद्ध प्रकाशे । बहेणी म्हणे ब्रह्म सर्वत्र भासे ॥

४५ निजगुरु निजदाता भेटतां कोण चिंता ।
भवतमशमकर्ता शोकसंतापहर्ता ॥
त्रिभुवनिं सुखदानी भक्त-दासाभिमानी ।
बहिणि म्हणतसे तो राम तूका निदानीं ॥

## पद

४६ सांगितलें तें करिं रे सुमना ॥ ध्रु० ॥
शांति मनीं धरिं, क्रोध दुरी करिं, वासना विवरीं, रे सुमना ॥
देव सखा करिं, भाव मनीं धरिं, भक्तिसि तूं वरिं, रे सुमना ॥
बहेणि म्हणे जरि, नाइकसी तरि पडशिल तूं दुरि, रे सुमना ॥

रामदास, वामन, रंगनाथ, केशवस्वामी, आनंदमूर्ति इत्यादि तुकाराम-समकालीन संतांचा उल्लेख बहिणाबाईच्या उपलब्ध कवितेंत सांपडत नाहीं. जयरामस्वामी वडगांवकरांचा व देहू येथील मंबाजी आणि रामेश्वर भट्ट यांचा उल्लेख मात्र प्रसंगानुरोधानें त्यांनीं केला आहे.

" ज्ञानप्रकाश " या नांवाचें २९ ओव्यांचें बहिणाबाईचें एक वेदांत-प्रकरण आहे त्याच्या शेवटीं त्या म्हणतात:—

**जयासी स्वहितचि करणें । तेणें शुद्ध भावार्थ धरणें ।**
**करावें अध्यात्मज्ञानाचें शोधन । जेणें लाधे निधान परब्रह्म ॥**
**बहेणि म्हणे गुरुकृपा जेथें । ज्ञानासि काय उणें तेथें ।**
**परी निष्ठाबळ पाहिजे यथार्थ । तेव्हां भगवंत प्राप्त होय ॥**

बहिणाबाईच्या कवितेंतले असे आणखी किती तरी वेंचे देण्यासारखे आहेत, परंतु विस्तारभयास्तव मी हात आंखडता घेतों; व बाईचा मुलगा विठ्ठल यानें बाईवर केलेल्या दोन आरत्यांपैकीं एक आरती येथें देऊन हा लेख पुरा करितों.

**बहिणाबाईची आरती**

**सांगसि सकळां मृत्यु पांचा दिवसांचा ।**
**प्रायश्चित्तविधि सारुनि द्विज पुजिले हरि वाचा ॥**
**सकळां आशीर्वचनें देउनि गीतेचा ।**
**स्मरणीं तत्पर होउनि अष्टादश याचा ॥ १ ॥**
**जयदेव जयदेव जय बहिणाबाई ।**
**अंतीं आरति उजळुनि मानस तव पायीं ॥ ध्रु० ॥**
**ज्ञानेश्वरिचें करिसी पारायण अंतीं ।**
**निशिदिनिं सावध करणें लावुनि निज पंथीं ॥**
**रामस्मरणीं तत्पर वाचा रूपवती ।**
**न कळे तवरूपमहिमा जाणितला संतीं ॥ २ ॥**
**दशनादाचे ध्वनी तूं सांगसी सकळां ।**
**वैष्णव जयजयकारें तुळसीच्या माळा ॥**
**आले हरिहरब्रह्मादिक जन ऋषिमेळा ।**
**न कळे पामर जन या भगवत्पथलीला ॥ ३ ॥**
**धन्य शतशोडशवरि द्वाविंशतकाळीं ।**
**धन्य आश्विन शुद्ध प्रतिपदा बुधमेळीं ॥**
**सद्गुरुभजनीं सावध राहुनि ते काळीं ।**
**त्यागुनि तूं देह निजपद पावसि वनमाळी ॥ ४ ॥**

धन्य घटिका धन्य पळलव तें जाणा ।
धन्य धन्य जन ते देखति तव निधना ॥
धन्य प्रणितातीर्थे शिवपुर निजस्थाना ।
तेथें तूं स्थिर राहुनि करिसी गुरुध्याना ॥ ५ ॥

आरति याचि थाटें गायन जन करिती ।
रामस्मरणें सर्वहि आनंदें वदती ॥
नेणों स्वर्गींहुन त्या देवांच्या पंक्ती ।
आल्या मज्जनवेळे त्या प्रणितातीर्थीं ॥ ६ ॥

मृदंग वाद्य नाना परिच्या गजरानें ।
तुलसी बुक्का उडवुनि मिरवत नगरानें ॥
गर्जत हरिनामाच्या श्रेणी अधरानें ।
प्रणितातीर्थीं मज्जन केलें मग ध्यानें ॥ ७ ॥

पूर्वें हनुमंत शोभे सहित अश्वत्थें ।
पश्चिमभागीं सुस्थळ रामेश्वर जेथें ॥
उत्तरभागीं सन्निध हें प्रणितातीर्थ ।
दक्षिणभागीं भगवति दुर्गा माता ते ॥ ८ ॥

ऐसें स्थळ अति उत्तम शिवपुर ते स्थानीं ।
समाधि घेउनि राहसि तूं देह–अवसानीं ॥
त्रिकाळ आरति पूजन इच्छित फळदानी ।
पावति तव करवरदें सुत विठ्ठल चरणीं ॥ ९ ॥

---

# वेणाबाई रामदासी

**वेणूबाईऐसी भक्ति कोठें नाहीं।**
**अद्भुतचि पाहीं प्रेमा जिचा ॥**

—भीमस्वामीकृत समर्थचरित्र

वेणाबाई ऊर्फ वेणूबाई ही श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या शिष्यवर्गापैकीं एक प्रमुख शिष्या होती व तिची बरीच कविता उपलब्ध आहे. हिचें स्वतंत्र चरित्र कोणी जुन्या कवीनें लिहिलेलें नाहीं; हिचे शिष्य गिरिधर यांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत, परंतु त्यांनींही हिचें चरित्र लिहिलेलें नाहीं. वेणाबाईसंबंधाची कांहीं त्रोटक माहिती रामदासी-वाङ्मयांत इतस्ततः पसरलेली आढळते, तिच्या आधारानें धुळें येथील विद्वान् व कार्यैकनिष्ठ रामदासी श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं ‘ श्रीसीतास्वयंवर ’ ग्रंथाच्या आरंभीं तिचें अल्पचरित्र दिलें असून, ‘ विविधज्ञानविस्तार ’ मासिकाच्या एका अंकात ‘ पुरुषोत्तम ’ नामक एका लेखकांनीं ‘ समर्थशिष्या वेणाबाई ’ या शीर्षकानें एक वाचनीय लेख लिहिला आहे व ह्या दोन्ही लेखांच्या आणि ‘ दासविश्रामधाम ’ ग्रंथाच्या आधारानें प्रस्तुत चरित्रलेख मी लिहीत आहे.

कोल्हापुर येथील देशपांडे आडनांवाच्या देशस्थ ब्राह्मणकुलांत वेणाबाईचा जन्म झाला होता. त्यांचा जन्मशक उपलब्ध नाहीं, परंतु तो शके १५४९ असावा असा आपला अंदाज श्री. देव यांनीं नमूद केला आहे. वेणाबाई लहानपणापासूनच शांतस्वभावी व विरक्तवृत्तीची होती. पुढें अल्पवयांतच मिरज येथील एका गृहस्थाशीं तिचें लग्न झालें व लग्नानंतर लवकरच तो गृहस्थ वारल्यामुळें वेणाबाई दहा वर्षांची होण्यापूर्वीच, दुर्दैवानें, तिला वैधव्य आलें. आपल्यावर केवढी भयंकर आपत्ति ओढवली आहे याची यथार्थ कल्पना त्या वयांत तिला कोठून होणार ? पण पतीशिवाय आपला जन्म आपल्याला घालवावा लागणार येवढा अंधुक विचार तिच्या मनांत

आला व त्या भावी दुःखास तोंड देण्याची तयारी तिनें चालविली. येवढ्या अल्पवयांत वैधव्यदशा प्राप्त झालेल्या या मुलीस तिच्या सासरच्या मंडळीकडून कोणत्या रीतीनें वागविण्यांत आलें असेल याची कल्पना करणें कठिण नाहीं. तरीपण, वेणाबाईची सासू, त्या वेळच्या इतर सासवांप्रमाणें, अगदींच कजाग होती असें वाटत नाहीं. कारण वेणाबाईस ती पोथ्यापुस्तकें वाचण्यास परवानगी देत असे. वेणाबाईच्या कुलोपाध्यायानें तिला एकनाथी भागवत वाचण्यास सांगितलें होतें व त्याप्रमाणें त्या ग्रंथाचें पारायण ती मोठ्या भक्तिभावानें करीत असे. एकनाथी भागवत हें महाराष्ट्रवाङ्मयभांडारांतलें एक अमूल्य रत्न आहे; व त्याच्या प्रभेनें संसारांधकारांत चांचपडणाऱ्या अनेक दुःखी जीवांस चिरशांतीचा राजमार्ग दाखविला आहे. अशा सद्ग्रंथाच्या वाचनांत आणि मननांत वेणाबाई लहानपणींच रंगून गेली हे तिचें मोठेंच पारमार्थिक भाग्य होय.

श्रीसमर्थ रामदासस्वामी हिंडत हिंडत मिरजेस गेले असतां एके दिवशीं भिक्षेसाठीं ते वेणाबाईच्या घरीं आले आणि त्यांनीं तुंबाभर दूध मागितलें. तेथें वेणाबाईची सासू होती ती म्हणाली ‘ दूध आहे, पण तें मारुतीच्या नैवेद्यासाठीं ठेवलें आहे, तेव्हां देतां येत नाहीं. ’ मारुतीस दुधाचा नैवेद्य दाखविण्याचा नवस तिनें केला होता. सासूबाईनीं दूध नाहीं म्हटलें म्हणून वेणाबाईस वाईट वाटलें. समर्थांस पाहून त्यांच्याविषयीं तिच्या मनांत आदरभाव उत्पन्न झाला होता. समर्थांस रिक्तहस्तानें परत पाठवूं नये म्हणून नैवेद्याच्या दुधांतलें थोडेंसें दूध त्यांस देण्याची आपल्या सासूस तिनें विनंति केली, परंतु तेवढ्या अवधींत समर्थ निघूनही गेले ! तेव्हां वेणाबाईस फार वाईट वाटलें. पुढें कांहीं दिवसांनीं समर्थ वेणाबाईच्या घरीं पुनः भिक्षेस आले असतां, वेणाबाई पुढील चौकांत तुलसीवृंदावनापाशीं एकनाथी भागवत वाचीत बसली होती, तिला त्यांनीं विचारलें, ‘ हें कोणत्या ग्रंथाचे पारायण चाललें आहे ?’ वेणाबाईनें सांगितलें, ‘ एकनाथी भागवताचें. ’ ही येवढी लहान मुलगी एकनाथी भागवतासारखा गहन ग्रंथ वाचते, पण तिला त्यांत काय समजत असेल कोण जाणें, अशी शंका समर्थांस येऊन त्यांनीं तिला विचारलें, ‘ मुली, तुला यांतलें कांहीं समजतें का ? ’ वेणाबाई म्हणाली, ‘ भक्तिभावानें पोथी वाचावी येवढेंच मला ठाऊक.

त्यांत काय सांगितलें आहे आणि तें कसें आचरणांत आणावयाचें हें मला कोठून समजणार? तरीपण मी आपणास यासंबंधानें कांहीं प्रश्न विचारतें, त्यांचीं उत्तरें जर आपण कृपा करून द्याल तर बरें होईल.' असें म्हणून वेणाबाईनें समर्थांस २५ प्रश्न विचारले. ते पंचवीस प्रश्न एका अभंगांत गोंवून व त्यांच्या उत्तरांचा दुसरा एक अभंग रचून समर्थांनीं ते दोन्ही अभंग वेणाबाईस लिहून दिले. हे अभंग येणेंप्रमाणें:—

## वेणाबाईचे पंचवीस प्रश्न

"नमूं वागेश्वरी शारदा सुंदरी ।
श्रोता प्रश्न करी वक्तयासी ॥
वक्तयासी पुसे जीव हा कवण ।
शिवाचें लक्षण सांगा स्वामी ॥
सांगा स्वामी आत्मा कैसा तो परमात्मा ।
बोलिजे अनात्मा तो कवण ॥
कवण प्रपंच कोणें केला संच ।
मागुता विसंच कोण करी ॥
कोण ते अविद्या सांगिजे जी विद्या ।
कैसें आहे आद्याचें स्वरूप ॥
स्वरूप ते माया कैशी मूळ माया ।
ईस चाळावया कोण आहे ॥
आहे कैसें शून्य कैसें तें चैतन्य ।
समाधान अन्य तें कवण ॥
कवण जन्मला कोणा मृत्यु आला ।
बद्ध मुक्त जाला तो कवण ॥
कवण जाणता कोणाची हे सत्ता ।
मोक्ष हा तत्त्वता कोण सांगा ॥
सांगा ब्रह्मरूप सगुण निर्गुण ।
पंचवीस प्रश्न ऐसे केले ॥

## त्यांचीं उत्तरें

नमूं वेदमाता नमूं त्या अनंता ।
प्रश्न सांगों आतां श्रोतयाचे ॥
श्रोतयाचे प्रश्न जीव हा अज्ञान ।
जया सर्व ज्ञान तोचि शिव ॥
शिवपर आत्मा त्यापर परमात्मा ।
बोलिजे अनात्मा अनिर्वाच्य ॥
वाच्य हा प्रपंच माईक जाणावा ।
घडामोडी देवापासुनियां ॥
विषय अविद्या त्या लावी ते विद्या ।
निर्विकल्प आद्याचें स्वरूप ॥
कल्पना हे माया तत्त्व मूळमाया ।
यासी चाळावया चैतन्यचि ॥
नकार तें शून्य व्यापक चैतन्य ।
ईश्वर अनन्य समाधान ॥
जीव हा जन्मला जीवा मृत्य आला ।
बद्ध मुक्त जाला तोचि जीव ॥
ईश्वर जाणता ईश्वराची सत्ता ।
मोक्ष हा तत्त्वता ईश्वरचि ॥
ईश्वर निर्गुण चेष्टवी सगुण ।
हेचि ब्रह्मखूण दास म्हणे ॥

श्री. शंकर श्रीकृष्ण देव व श्री. ‘ पुरुपोत्तम ’ या दोघांनींही, हे अभंग आपल्या लेखांत उद्धृत केले असून ते समर्थांनीं वेणाबाईस लिहून दिले असें म्हटलें आहे; पण मला तें खरें वाटत नाहीं. एक तर, पहिल्या अभंगांत आरंभींच ‘ श्रोता प्रश्न करी वक्तयासी ’ असे शब्द असल्यामुळें हा अभंग समर्थांच्या असल्याच इतर अभंगांसारखा सर्वसाधारण स्वरूपाचा दिसतो, प्रासंगिक दिसत नाहीं व दुसरें असें कीं, मिरजेंत ज्या ठिकाणीं समर्थांची व वेणाबाईची गांठ पडली त्या ठिकाणीं त्यांच्या, वक्ता आणि

श्रोता अशा भूमिका नव्हत्या. म्हणून, वरील प्रसंगीं वेणाबाई आणि समर्थ यांच्या दरम्यान हीं प्रश्नोत्तरें झालीं असतील हें संभवनीय दिसत नाहीं. तथापि, येवढें मात्र खरें कीं वेणाबाई व समर्थ यांचें थोडेंसें संभाषण या प्रसंगीं झालें असावें व वेणाबाईच्या मनावर समर्थांच्या भाषणाची चांगलीच छाप पडली असावी. पुनः समर्थांचें दर्शन कधीं होईल असा तिला ध्यास लागून राहिला. भिक्षासमयीं समर्थांनीं उच्चारलेले ' जयजय रघुवीर समर्थ ' हे शब्द तिच्या कानांत सारखे घुमूं लागून तिची वृत्ति तदाकार होऊं लागली. हेच आपले गुरु आणि हेच आपणास परमार्थाचा योग्य मार्ग दाखवितील अशी तिची भावना होऊन पुनः समर्थांची भेट कधीं होईल अशी तिला उत्कंठा लागून राहिली. सामान्यतः पाहिलें तर त्या वयात कोणत्याही मुलीच्या मनांत असले विचार येणें जवळ जवळ अशक्यच; परंतु बहिणाबाई, वेणाबाई वगैरे स्त्रिया या सामान्य नियमास अपवादभूत होत.

समर्थदर्शनास उत्सुक झालेली वेणाबाई कांहीं दिवसांनीं मिरजेहून माहेरीं कोल्हापुरास गेली, तेव्हां तेथें समर्थ आपल्या शिष्य-समुदायासह येऊन राहिले होते व तेथें त्यांचीं कीर्तनें चालू होतीं. आईबापांना विचारून वेणाबाई नित्यनियमानें कीर्तनास जात असे. एके दिवशीं तिनें समर्थांच्या पायांवर डोकें ठेवून आपणास अनुग्रह द्यावा अशी विनंति केली. ती मान्य करून समर्थांनीं तिला राममंत्रोपदेश दिला. अशा रीतीनें वेणाबाई कृतार्थ झाली खरी, पण तिची ही परमार्थवृत्ति तिच्या सासूसासऱ्यांना किंवा आईबापांना फारशी आवडली नाहीं. शिवाय टवाळ लोकांचीही टकळी सुरू झाली. प्रत्येक गोष्ट दोषैकदृष्टीनें पाहण्याची बहुजनसमाजाची स्वाभाविक प्रवृत्ति असल्यामुळें ही देशपांड्यांची तरुण विधवा मुलगी या ब्रह्मचारी बुवाच्या नादीं लागली आहे, असाच वेणाबाईच्या वर्तनाचा अर्थ सामान्य लोकांनीं केला व त्या प्रकारचीं त्यांचीं बोलणीं वेणाबाईच्या आईबापांच्या कानावर येऊं लागलीं. सुनेला यांनीं स्वैर सोडलें आहे असें म्हणून वेणाबाईच्या सासूसासऱ्यांनाही लोक नांवें ठेवूं लागले. आईबाप व सासूसासरा यांनीं वेणाबाईस त्या मार्गापासून परावृत्त करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण तिच्या वृत्तींत बदल झाला नाहीं. ती म्हणे :—

**पद**

**रामनामेंविण मज कंठेना ॥ ध्रु० ॥**
**कोणी वंदिती कोणि निंदिति।**
**वास मी त्यांची पाहीना ॥ १ ॥**
**हृदयीं धरिले सद्गुरुचरण।**
**प्राणांतींहि विसंबेना ॥ २ ॥**
**वेणीचें निजधन रामचि जीवन।**
**होणार तें कां सुखें होइना ॥ ३ ॥**

मीराबाई, बहिणाबाई, सखूबाई वगैरे स्त्रियांचाही असाच छल त्यांच्या आप्तेष्टांनीं व समाजांतील कुटाळ लोकांनीं केला, परंतु त्या छलास भिऊन त्या आपल्या उच्च ध्येयापासून च्युत झाल्या नाहींत, व म्हणूनच त्याचीं नांवें आज सर्वतोमुखीं होऊन राहिलीं आहेत आणि त्यांचीं चरित्रें लिहिलीं जात आहेत. भगवद्भक्तीच्या भुताने ज्याला एकदां झडपलें तो आप्तेष्टांच्या रागालोभाची आणि कुटाळांच्या टवाळकीची पर्वा करीत नाहीं. कारण हें भूत मोठें जबर आहे. ‘ भूत जबर मोठें ग बाई। झालि झडपण करुं गत काई ’ या पद्यांत एकनाथांनीं आणि ‘ तेंचि भूत गे माय तेंचि भूत गे ’ या पद्यांत समर्थांनीं ज्या भूताचें वर्णन केलें आहे तेंच हें पंचमहाभूतांच्याही पलीकडचें महाभूत होय. प्रल्हादाला, नारदाला, ध्रुवाला, शुकाचार्यांना याच भुतानें पछाडलें होतें; आणि ज्ञानदेव, नामदेव, मीराबाई, नरसी मेहता, तुलसिदास, एकनाथ, तुकाराम इत्यादिकांच्या मानगुटीस हेंच भूत बसलें होतें. या भुताचे चाळेही मोठे विचित्र आहेत. हें भूत ज्या व्यक्तीला झडपील ती व्यक्ति सुंदर कविता करील, मोठमोठे ग्रंथ रचील आणि लक्षावधि लोकांस आपल्यामागें नाचावयास लावील. दुर्दैवाची गोष्ट येवढीच कीं या भूताकडून पछाडलें जाण्याचें भाग्य फारच थोड्या लोकांच्या नशिबीं असतें. असो. वेणाबाईनें लोकापवादाच्या भयानें किंवा वडील मंडळीच्या धाकानें भगवद्भक्तीचा त्याग केला नाहीं. प्रभुपदीं अनन्यभावानें शरण जाऊन, श्रीसमर्थांनीं दिलेला रामनाममंत्राचा जप करण्यांत, ग्रंथवाचनांत आणि कीर्तनश्रवणादिकांत ती आपला कालक्षेप करूं लागली. रामाच्या ठिकाणीं तिची वृत्ति कशी रंगून गेली होती हें तिच्या पुढील पद्यावरून वाचकांच्या लक्षांत येईल:—

**तुझी तुझी तुझी तुझी पावना रामा ॥ ध्रु० ॥**
**भावें अभावें कुभावें, परि तुझी, पावना रामा ॥ १ ॥**
**सुष्ट हो दुष्ट हो नष्ट हो, परि तुझी, पावना रामा ॥ २ ॥**
**हीन दीन अपराधी, वेणी म्हणे परि तुझी, पावना रामा ॥ ३ ॥**

'अखंड सहवास होऊन निरंतर श्रीचरणसेवा घडावी,' अशी वेणाबाईंनीं श्रीसमर्थांची प्रार्थना केली, परंतु अजून वेळ आली नाहीं असें सांगून व मनाचे श्लोक, अभंग, पदें वगैरे निरंतर वाचण्यास व त्यांचें एकांतांत मनन करण्यास सांगून श्रीसमर्थ पर्यटणास गेले. श्रीसद्गुरुचरण अंतरले म्हणून वेणाबाईस अतोनात दुःख झालें. तिची परमार्थबुद्धि जों जों वाढत चालली तों तों जननिंदेलाही जोर येत चालला. वेणाबाईनें या निंदेची पर्वा केली नाहीं, पण तिच्या आईबापांना ती जननिंदा दुःसह वाटूं लागली. यापेक्षां "कारटी मरती तर बरें होतें" असें त्यांना झालें व शेवटीं त्यांनीं तिला विष दिलें असेंही म्हणतात. आतां समर्थकृपेनें ह्या विषाचा तिजवर कांहीं परिणाम झाला नाहीं ही गोष्ट निराळी. हा परिणाम कां झाला नाहीं यासंबंधानें 'दासविश्रामधाम' ग्रंथांत अशी माहिती दिली आहे :—"वेणाबाई आपला हेका सोडीत नाहीं असें पाहून तिच्या आईबापांनीं तिला विषप्रयोग करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें, तुपांत विष कालवून तें तिला पाजलें. हें विष किती जलाल होतें हें आत्मारामबुवा सांगतात—

**कराड प्रांतींचें विष महादारुण।**
**पोटीं प्रवेशतां मोहरीप्रमाण।**
**पाणी न मागतां जाय प्राण।**
**ठाउक असे बहुतेकां ॥**

असलें हें जलाल विष वेणाबाईला तिच्या आईबापांनीं दिल्यावर तिच्या अंगाचा भयंकर दाह होऊं लागला व म्हणून ती एका खोलींत जाऊन तळमळत पडली. तेव्हां तिच्या आईबापांनीं खोली बाहेरून बंद केली व तिला कुलूप लावलें. वेणाबाईस सर्पदंश झाला आहे असें त्यांनीं लोकांस सांगितलें. इकडे वेणाबाईनें समर्थांचा धांवा सुरू केला, तेव्हां

समर्थ तत्काळ त्या ठिकाणीं प्रगट झाले व त्यांनीं आपली छडी तिच्या अंगावरून फिरविली. त्याबरोबर वेणाबाईचें दुःख नाहींसें होऊन ती राम राम म्हणत उठून बसली व तिनें समर्थांचे पाय धरले. वेणाबाई गौरवर्ण होती, ती अंगांत विष जिरल्यामुळें काळी झाली व तें पाहून समर्थ म्हणाले, " हें आतां ठीक झालें, कारण —

**फिरावें लागतें अरण्यांत । सोसावें लागतें उष्ण शीत ।**
**नाजुकपणाचें हें नव्हे कृत्य । नीळ कवच घातलें श्रीरामें ॥**
**देहचतुष्टय निरसलें रोकडें । कां पाहसी फिरफिरों अंगाकडे ।**
**आपणेंचि वस्तु होऊनि धडफुडे । होय कीं नोहे संशयो कां ? ॥ "**

पुढें समर्थ तिला म्हणाले :—

**" देशकेंद्र वदती ' तरलीस माय । स्वस्थ नांदावें फिटलें भय "।**

तेव्हां वेणाबाईनें सांगितलें—' महाराज, आपला वियोग मला आता सहन होणार नाहीं. यापुढें मी आपल्याच सहवासांत राहणार.' समर्थ म्हणाले, ' ठीक आहे. ' खोलींत कोणी तरी बोलत आहे हें वेणाबाईच्या आईबापांनीं ऐकलें तेव्हां त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. खोलीच्या खिडक्या बंद आहेत, बाहेरून लावलेलें कुलूप जशाचें तसें आहे, मग दुसरा मनुष्य आंत गेला कसा ? म्हणून त्यांनीं कुलूप काढून खोलीचें दार उघडलें, तों समर्थमूर्ति आंत बसलेली त्यांच्या दृष्टीस पडली. मार्ग मोकळा होतांच समर्थ बाहेर पडले आणि एकदम मार्गस्थ झाले. हा चमत्कार पाहतांच, वेणाबाईच्या आईबापांस असें वाटलें कीं श्रीरामकृपेनेंच जिचा जीव वांचला ती आतां आपली नव्हे, रामाची आहे व म्हणून वेणाबाईला त्यांनीं समर्थांबरोबर जाण्यास परवानगी दिली.

इतकें झाल्यावर मग वेणाबाईनें माहेर सोडलें व ती समर्थांच्या सान्निध्यांत जाऊन राहिली. समर्थांनीं आपल्या मठांतील निरनिराळीं कामें निरनिराळ्या शिष्यांकडे सोंपविलीं होतीं; व त्यांपैकीं उपाहाराचें काम त्यांनीं वेणाबाईकडे दिलें होतें. तेवढें काम केल्यावर जो वेळ उरे तो सद्गुरुसेवेंत, ग्रंथ-वाचनांत आणि काव्यरचनेंत वेणाबाई घालवीत असे. सद्गुरुसेवा अंतरेल म्हणून आमरण ती इतरत्र कोठें गेली नाहीं. तिनें एखाद्या मठाचें

महंतपद स्वीकारावें अशी समर्थांची इच्छा होती, पण तिनें तें मान्य केलें नाहीं. परंतु, असें असूनही वेणाबाईचा शिष्यसमुदाय बराच मोठा होता असें गिरिधरकृत ' समर्थप्रताप ' ग्रंथांतील एतद्विषयक उल्लेखावरून दिसतें; व आजमितीलाही त्यांच्या परंपरेंतील कित्येक मठ आहेत. यावरून असें अनुमान निघतें कीं श्रीसमर्थसान्निध्यांत राहून वेणाबाईही शिष्यांना अनुग्रह देत असावी. अशा एका शिष्यावर श्रीसमर्थांच्या आज्ञेवरून त्यांनीं अनुग्रह केल्याची कथा ' दासविश्रामधामां ' त दिलेली आहे.

श्रीसमर्थांच्या ज्या अनेक शिष्यिणी होत्या त्यांत वेणाबाईचा अधिकार फार मोठा होता. शिष्यिणींपैकीं फक्त वेणाबाईसच सभेमध्यें उभें राहून कीर्तन करण्याची श्रीसमर्थांची अनुज्ञा होती.

> **" वेणाबाईवांचूनि कांहीं । इतरां कन्येसी सभेसी कीर्तनआज्ञा नाहीं ।**
> **येकासनीं बैसोनि कीर्तन करणें पाहीं । प्रसंगानुसारें मर्यादें ॥ "**
>
> —समर्थप्रताप, अ० २०, ओवी ३१.

वेणाबाईचा मठ मरीचि क्षेत्रीं म्हणजे मिरजेस असे व हल्लींही आहे व तेथून वेणाबाईची पालखी दासनवमीस सज्जनगडावर जात असते.

समर्थांची वेणाबाईवर अत्यंत प्रीति होती. एकदां कृष्णावेणेच्या वाळवंटांत त्यांनीं वेणाबाईचें वस्त्र वाळतांना पाहिलें; तेव्हां तें घेऊन त्याची त्यांनीं मेखला केली व ती अकरा दिवस आपल्या गळ्यांत घातली. गिरिधरस्वामींनीं ' समर्थप्रतापां ' त या प्रसंगाचें वर्णन केलें आहे तें येणेंप्रमाणें :—

> **" उद्धव महंतें पूजा जंव आणिली ।**
> **तंव समर्थआंगींची पूजा विचित्र देखिली ।**
> **वेणीपरंपरादीक्षा समर्थें स्वयें अंगीकारिली ।**
> **आपण कंठमेखला करूनियां ॥**
>
> **आकरा दिवस येक आंगीं मेखला राहे ।**
> **उद्धव महंत अक्रा दिवस वाट पाहे ।**
> **समर्थपूजा मी कैं आतां लाहें ।**
> **समर्थदेवें जाणितलें ॥**

समर्थ म्हणती उद्धवा वेणीवस्त्र ऐसें आहे ।
माझा मजला देवगृह अंगिकार करणें पाहे ।
उत्कट भक्ति येथें येकनिष्ठ राहे ॥
... ... ... ॥"

"समर्थ परळीच्या किल्ल्यावर असतांना वेणूबाई त्यांच्या भोजनाची सोय करीत असत. त्यांचा असा क्रम असे कीं समर्थांचा स्वयंपाक करावा व त्यांचें ताट वाढून तें एका खोलींत ठेवावें. मग समर्थ तेथें येऊन एकांतीं भोजन करीत. त्या प्रसंगीं तेथें कोणीही येऊं नये अशी त्यांची आज्ञा असे. एकदां वेणूबाई नित्याप्रमाणें तेथें ताट ठेवून स्वयंपाकघरांत आल्या. कांहीं वेळानें त्यांच्या लक्षांत आलें कीं, ताटांत एक जिन्नस वाढावयाचा राहिला. ही गोष्ट लक्षांत येतांच त्या तो जिन्नस घेऊन लगबगीनें समर्थांस वाढावयास निघाल्या. त्या खोलीचें दार किंचित् उघडतात तोंच त्यांना समर्थ एका विशाल मारुतीसह भोजन करीत असलेले दिसले. तो प्रकार पाहतांच वेणाबाईंना मूर्च्छा आली. आसपास शिष्यमंडळी होती. ती लागलीच धांवली, पण बाई शुद्धीवर आल्या नाहींत. खोलींत समर्थांचें भोजन होतच होतें. पण त्यांना ही गोष्ट सांगण्याचें कोणास धैर्य होईना. कारण त्यांची शिस्त तशीच कडक होती. कांहीं वेळानें ते बाहेर आले. पण त्यांचें लक्ष वेणाबाईकडे गेलें नाहीं. तेव्हां आकांनीं[1] प्रार्थना केली कीं, 'महाराज, वेणूस उठवावें.' त्यावर समर्थ म्हणाले, 'नैवेद्यसमयीं आंत येऊं नये, मग ही कां आली?' आका म्हणाल्या, 'महाराज, आपण मायबाप, आपल्याकडे पोर आलें तर तें काय दंडास पात्र होतें?' यावर समर्थ हांसले. त्यांनीं वेणूबाईच्या अंगावरून हात फिरविला व त्यांना सावध केलें."

"वेणूबाईचें भक्तिबळ दांडगें असल्यामुळें त्या कधींकधीं आपलें म्हणणें समर्थांस ऐकावयास लावीत. वासुदेव बाबा कन्हेरीकर म्हणून एक चतुर व गुणग्राही पंडित होता. तो समर्थसंप्रदायांतला होता. या गृहस्थाला मोठा विद्यामद होता. त्यानें त्रयोदशाक्षरी मंत्र नवीन निर्माण करून आपला संप्रदाय वाढविला. याप्रमाणें तो परमार्थांत बिघडलेला पाहून त्याला समर्थांनीं—

१ समर्थांची दुसरी प्रमुख शिष्या.

**म्हणितलें काय रे कापट पोटीं।**
**जालासि वेगळा पडोनि परमठी।**
**भुललासी कुसंगें मानासाठीं।**
**सत्य गुरुधर्मा अव्हेरुनि ॥ ८३ ॥**

**नाडोन आपणु दुजयासी बुडविणें।**
**रे वंचका कां गुरुक्रमासि त्यजणें।**
**विघदानें धरिसी अभिमान।**
**... ... ... ॥ ८४ ॥**

—दासविश्रामधाम, ९०.

इतकें बोलून समर्थांनीं वासुदेव बाबाचें स्वहस्तें पारिपत्य केलें. त्याला कृतकर्माचा फार पश्चात्ताप झाला. पण त्याच्यासंबंधीं समर्थांपुढें बोलण्याची कोणाची छाती होईना. ”

“ एकदां वेणूबाई समर्थांसह प्रातःकालीं गंगेस स्नानास जात होत्या. त्या वेळीं, मागें दिलेलें ‘ तुझी तुझी तुझी तुझी पावना ’ हें पद त्या म्हणों लागल्या. तें करुणस्वरांतलें पद ऐकून समर्थ प्रसन्न झाले. ते म्हणाले, ‘ ज्याची मनांत अपेक्षा असेल तें माग. तें मी तुला देईन. ’ यावर त्या नमन करून म्हणाल्या. ‘ आम्हांला सौख्याची काय वाण ? आपली कृपा असावी म्हणजे झालें.’ असें म्हणून त्यांनीं वासुदेवगोसाव्याची हळूच गोष्ट काढली. त्या म्हणाल्या, ‘ स्वामीच्या कृपेनें सर्वांनीं सारखेंच सुखी असावें, त्यांपैकीं एक जर दुःखी झाला तर मनाला रुखरुख लागून राहते. वासुदेव गोसावी आपला एकनिष्ठ शिष्य; पण दुर्दैवानें त्याच्या हातून अन्याय घडला. परंतु त्याचा तरी उद्धार कोण करणार ? तो आपणच केला पाहिजे. त्याला तीर्थप्रसाद देऊन आणि बोध करून त्याची शुद्धता आपण केली पाहिजे. ’ वेणाबाईंची ही विनंति मान्य करून समर्थांनीं वासुदेव गोसाव्यावर कृपा केली.”

वेणाबाईचा कंठ फार मधुर असून त्या गाणीं फारच चांगलीं म्हणत. ‘ दासविश्रामधाम ’कर्ते आत्मारामबुवा म्हणतात—

**" धन्य वेणाई वेणुमोहित । वेणुविण गाय सप्रेमयुक्त ।**
**वेणुधर हरि होय तटस्थ । वेणांकधरवाणी मोहळे ॥ ३५ ॥"**

—खंड २०, अ० ८८.

समर्थांचें वेणाबाईवर अपत्यवत् प्रेम असे :—

**" मनींची जीवींची गोष्टी यथार्थ । भक्तिवेणीसी सांगती समर्थ ।**
**कां जे श्रीरामउपासकांपासीं गुह्यार्थ । आत्माराम निरोपिती ॥ "**

—किता, समास १३, ओ. ४७.

वेणाबाईला एकदां एक साक्षात्कार झाल्याचा उल्लेख 'समर्थप्रतापा'-च्या तेराव्या समासांत शेवटीं आला आहे :—

**" वेणाबाईसी साक्षात्कार जाला ।**
**समर्थांपासीं सध्या सांगितला ।**
**स्वामि त्रिभुवन गृहस्थ एक स्वप्नीं देखिला ।**
**जनयात्रा वाटे लावितसे ॥ "**

" समर्थांपुढें दुसऱ्या कोणाचें चाललें नाहीं तर या लाडक्या कन्येचें चाले. श्रीसमर्थदर्शनास येऊन कोणी कांहीं विषयांची चर्चा सुरू केली तर श्रीसमर्थांच्या आज्ञेनें कित्येक वेळां वेणाबाईच समाधानाचीं उत्तरें देत," वगैरे हकीकत 'समर्थप्रतापां'त वर्णिली आहे. वेणाबाई शके १६०० चैत्र वद्य १४ रोजीं सज्जनगडावर समाधिस्थ झाल्या. त्यांची समाधि गडावर मंदिराच्या बाहेर वायव्येकडील ओवरींत आहे.

**" वेणाबाईसीं समर्थसदनीं वास करणें ।**
**समर्थसदनीं देवार्चन देवार्चनीं पूजणें ।**
**समर्थसदनीं करावें प्रसादपारणें ।**
**कथाकीर्तनें करावीं समर्थसदनीं ॥**
**समर्थचरणीं भक्तिवेणी उत्पन्न ।**
**समर्थचरणीं अंतीं उर्ध्वपंथीं लीन ।**
**अधिष्टानीं पावली संस्थान ।**
**चिताभूमीसी भक्तिचंपक निघाला ॥"**

पूर्वी जेथें हा चंपकवृक्ष होता तेथें आता तुलसीवृंदावन व पादुका आहेत. वेणाबाईच्या निर्याणाची कथा आत्मारामबुवाकृत ‘दासविश्रामधामा’च्या १११ व्या ‘सोपानां’त दिली आहे ती अशी:—रामदासस्वामी सज्जनगडावर जाऊन राहिले तेव्हां त्यांनीं आपल्या बहुतेक शिष्यांस महंत करून ठिकठिकाणच्या मठांत पाठविलें, परंतु वेणाबाईनें मात्र समर्थचरण शेवटपर्यंत सोडले नाहींत. आपणास मोठेपणा मिळावा, आपला मानसन्मान व्हावा, आपली महंती वाढावी अशी इच्छा तिनें कधींच केली नाहीं. समर्थांच्या सन्निध राहून त्यांची अखंड सेवा करावी येवढाच तिचा हव्यास होता. तिनें एखाद्या मठांत महंतीण होऊन रहावें अशी समर्थांची इच्छा होती, पण आपण श्रीगुरुचरणाजवळच समाधि घेणार असे तिनें स्पष्ट सांगितलें. पुढें वेणाबाईला एकदां असें वाटलें कीं आपण देहासकट वैकुंठास जाऊन तेथील वर्तमान घेऊन यावें व हा आपला विचार तिनें समर्थांस कळविला. तो ऐकून तिचा मृत्युकाल जवळ आला आहे हें समर्थांनीं जाणलें व ते तिला म्हणाले, ‘बाई, वैकुंठीं जाण्याची इतकी घाई कशाला? तूं आपलीं पक्वान्ने कर. तुझ्या हातचे जेवण मला फार गोड लागतें. तूं एकदां स्वस्वरूपीं लीन झाल्यावर हें भोजनसौख्य आम्हास कोठून मिळणार?’ हे समर्थांचें भाषण ऐकून वेणाबाईच्या डोळ्यांत प्रेमाश्रु येऊन ती म्हणाली, ‘महाराज, क्षमा करा. आपल्यासारखें कैवल्यनिधान हातीं असतां मी वैकुंठाची इच्छा केली, हा खरोखर माझा अपराध आहे.’ हें ऐकून समर्थांनीं हास्य केलें. तरीपण पुढें पुढें वेणाबाईची उदासीनता वाढत चालली व आपला देह तिला तृणवत् वाटूं लागला. पुढें एकादशीपर्व जवळ आलें. तेव्हां समर्थ तिला म्हणाले, ‘वेणूबाई, तूं आपला प्राकृत सीतास्वयंवर ग्रंथ एकांतीं प्रेमानें वाचीत असतेस; पण आम्हाला कांहीं तें काव्य तूं कधीं वाचून दाखवीत नाहींस, तुला लाज वाटते. पण आतां लाज भीड कांहीं न धरतां त्या ग्रंथावर तूं कीर्तन कर.’ ‘आज्ञा प्रमाण’ असें म्हणून वेणाबाईनें कीर्तनाची तयारी केली. कीर्तनास श्रोत्यांची दाटी होऊं लागली. नित्य नियमानें कीर्तन चालू असतां चैत्र वद्य १४ शके १६०० या दिवशीं समर्थांनीं शिष्यांस आज्ञा केली कीं ‘प्रेतदहनाचें सर्व साहित्य तयार ठेवा.’ हें ऐकतांच लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. कोणी मेलें नसतां

ही प्रेतदहनाची तयारी करण्यास समर्थ कां सांगत आहेत याचा उलगडा न झाल्यामुळें लोक नाना प्रकारांनीं बोलूं लागले. कोणी म्हणाला, 'हा रामदास मूळचा पिसाट, पण मध्यंतरीं जरा शुद्धीवर होता. परंतु आतां त्याचें वेड पुनः सुरू झालें असें वाटतें.' कांहीं भ्याड होते ते म्हणाले, 'यानें प्रेत-दहनाचें साहित्य आणवून चिताही रचण्याची तयारी केली आहे, तेव्हां आतां याच्या या दांडगट चेल्यांनीं जर एखाद्या जिवंत माणसास धरून चितेंत लोटलें तर घेतां काय?' असो. वेणाबाईचें कीर्तन संपून आरती होतांच ती समर्थांपाशीं गेली आणि आपला वीणा त्यांच्या हातीं देऊन व त्यांच्या पायांवर डोकें ठेवून तिनें तेथेंच प्राण सोडला! मग तिचें प्रेत स्वतः समर्थांनीं उचललें व शिष्यांकडून सर्व विधिविधान करवून, प्रेताचें दहन केलें:—

**गुरुराज वदती धन्य पुण्यखाणी।**
**कैवारी जियेचा कोदंडपाणी।**
**अन्य नरस्पर्श जन्मापासून।**
**न जाला जाली कृतार्थ॥**

पुढे कृष्णातटीं बाईची उत्तरक्रिया समर्थांनीं करविली. "मंडळी स्नानाला गेली त्या वेळीं आकांनीं फार आकांत केला. हें पाहून उद्धवगोसावी आकाला म्हणाले, 'आपण स्वामीची सेवा सतत करीत असून नश्वरा-विषयीं शोक करतां? आश्चर्य आहे!' हें ऐकून आका म्हणाल्या, 'तुम्ही सांगतां हें मला स्वामिकृपेनें कळतें, पण या नश्वर जगाचा चमत्कार पहा! कांहीं केल्या चित्ताची व्यग्रता झाल्याशिवाय राहत नाहीं.' असें म्हणून त्या वेणाबाईचे एक एक गुण आठवून शोक करूं लागल्या. त्या म्हणाल्या, 'वेणाबाईची योग्यता काय सांगूं? मला तिची एक गोष्ट आठवली, ती मी तुम्हांला सांगतें, ऐका.' असें म्हणून आकानीं उद्धवगोसाव्यांस वेणाबाईची एक गोष्ट सांगितली ती—

"समर्थ रामघळींत होते. मला कऱ्हाड व बत्तिशिराळें येथें उत्साहाचे साहित्याकरितां जावयाचें होतें. तेव्हां मी येथील उत्साहाची इतर व्यवस्था वेणूबाईकडे सोंपविली. जातांना मी देवाला म्हणालें, 'देवा, मी जातें. मठीं वेणू आहे. तुला तिचे हातून जी कांहीं सेवा घ्यावयाची ती तूं घे. मी

हिचा हवाला तुजवर ठेवितें.' अशी विनंति करून मी गांवाला गेलें. इकडे वेणू साहित्यास लागली, तों तिला शीतज्वराचा अत्यंत उपद्रव होऊन तिची प्राणांतिक अवस्था झाली. तिला नित्याप्रमाणें शीतज्वर आला. त्या वेळीं तिनें विठ्ठल गोसावी व भानजी गोसावी यांस सांगितलें, 'मला श्रीचे देवालयांत घेऊन जा.' त्याप्रमाणें त्यांनीं तिला उचलून नेलें. पण तिच्यानें उभें रहावेना. तेव्हां तिला उपरण्यानें खांबास बांधून उभें केलें. मग तिनें श्रीपुढें एक करुणापर अभंग[1] म्हटला:—

**पतितपावना जानकीजीवना । अरविंदनयना रामराया ॥**
**आका गांवा गेली मज व्यथा जाहली । दयाळा राहिली नवमी तुझी ॥**
**आका गांवा जातां निर्विलें समर्था । तो भाव रघुनाथा साच करीं ॥**
**नवमीसमारंभ पाहों द्यावा बरवा । मग देह राघवा जाओ राहो ॥**
**ऐकोनि करुणा अयोध्याराणा । मूर्तीच्या नयना अश्रु आले ॥**
**ऐकोनि वचन पतितपावन । कृपेचें पोषण वेणूवरी ॥**

ही वेणूची प्रार्थना ऐकून श्रीरघुपतीनें आपले गळ्यांतील हार काढून तिच्या गळ्यांत घातला. त्याबरोबर तिचा शीतज्वर नाहींसा झाला. मग तिनें उपरणें सोडून श्रीस साष्टांग नमस्कार घातला. हा प्रकार होत आहे तोंच तेथें समर्थ आले. ते तिला म्हणाले, 'वा ! वा ! वेणे, आजपर्यंत तूं माझ्यापाशीं राहून या क्षुद्र देहाच्या ममतेनें त्याच्या रक्षणाकरितां श्रीस संकटांत घालावें हेंच कां शिकलीस?' ती म्हणाली, 'महाराज, श्रीस संकटांत टाकलें तें क्षुद्र देहाकरितां नव्हे, तर उत्सवाची सेवा या देहाकडून व्हावी, इतकीच काय ती श्रीची प्रार्थना केली.' यावर समर्थ म्हणाले, 'असो. इतःपर श्रीवर असें संकट घालूं नकोस.'

सज्जनगडावर ज्या ठिकाणीं वेणाबाईच्या देहाचें दहन केलें तेथें तिची समाधि आहे. 'दासविश्रामधाम'कर्ते आत्मारामबुवा लिहितात, "वेणाबाईचे जे गुरुबंधु व इतर साधुसंत तिच्या मृत्युकालीं उपस्थित नव्हते

१ हा अभंग खुद्द वेणाबाईचा दिसत नाहीं. वेणाबाईनें देवाची प्रार्थना केली तीच कोणी तरी अभंगरूपानें वर्णिली असावी.

त्यांना श्रीरामानें वेणाबाईच्या रूपानें दर्शन दिलें.” असो. अशा रीतीनें या परमपुण्यशील स्त्रीनें आपली जीवितयात्रा पूर्ण केली.

आतां वेणाबाईच्या कवितेकडे वळूं. वेणाबाईला लहानपणापासूनच लिहितां वाचतां येत होतें व पुढें समर्थसान्निध्यांत तिचें संस्कृताचेंही थोडें-बहुत अध्ययन झालें. वेणाबाईकृत ‘श्रीसीतास्वयंवरा’च्या प्रस्तावनेंत श्री. शंकरराव देव लिहितात, “ लौकिक दृष्टीनें पाहिलें तर वेणाबाई थोर विदुषी होत्या. भारत, भागवत, रामायण इत्यादि ग्रंथ त्यांना चांगले अवगत होते. पूर्वकालीं होऊन गेलेल्या साधुसंतांच्या ग्रंथांचेंही त्यांनीं परिशीलन केलें होतें. प्रस्तुत ‘ सीतास्वयंवरा’शिवाय त्यांचीं दोन स्फुट प्रकरणें व कांहीं अभंग, पदें, आरत्या वगैरे उपलब्ध आहेत. याशिवाय, ‘ सिंहासन ’ व ‘ उपदेशरहस्य ’ अशीं त्यांचीं आणखी दोन प्रकरणें व कितीएक अभंग, पदें वगैरे असावींत असें माझें नुसतें अनुमान आहे. जीं दोन प्रकरणें उपलब्ध आहेत म्हणून म्हणतों तीं २६ श्लोकांचें ‘ कौल ’ व ४४ श्लोकांचें ‘ श्रीरामगुहसंवाद ’ हीं होत. ”

वेणाबाईची कविता अगदीं साधी, घरगुती भाषेंत रचिलेली आहे. मुक्तेश्वरी उच्च दर्जाचें काव्य या कवितेत फारसें नाहीं, पण स्त्रीस्वभावसहज मार्दव आणि सहृदयता या दोन गुणांच्या बाबतींत ही कविता दुसऱ्या कोणत्याही कवीच्या कवितेस हार जाणार नाहीं. शिवाय वेणाबाईच्या ‘ सीतास्वयंवर ’ ग्रंथांत देशस्थ ब्राह्मणांतील लग्नविधीविषयींच्या तत्कालीन चालींरीतींचें, पक्कान्नादिकांचें जें वर्णन आलें आहे तें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचें आहे. ‘कौल’ व ‘ श्रीरामगुहसंवाद ’ हीं वेणाबाईचीं प्रकरणें माझ्या अवलोकनांत नाहींत म्हणून त्यांच्यासंबंधानें श्री. शंकरराव देव यांनीं जें काय लिहिलें आहे तेंच मी येथें उतरून घेतों.

## कौल

रावणाचा वध करून चौदा वर्षांनीं राम सीतेसह परत येऊन भरतास भेटले. नंतर ते सिंहासनाधिष्ठित झाल्यावर प्रजा त्यांजपाशीं कौल मागावयास आली. कौल म्हणजे राजाकडून प्रजेस मिळणारें अभयपत्र. तेव्हां प्रजेनें रामापाशीं कोणता कौल मागितला तो ह्या श्लोकांत दिला आहे. मागा

तुम्हांला काय पाहिजे तें, असें प्रभु रामचंद्रानें आश्वासन दिल्यावर प्रजेनें एक एक मागणें मागावें व रामानें तें लिहून ठेवण्यास लक्ष्मणास सांगावें, असा या प्रकरणाचा विषय आहे.

**" रघूराज सिंहासनीं सौख्यदाता ।**
**प्रजा कौल मागावयाला उदीता ॥**
**प्रभू बोलिला रे अपेक्षीत मागा ।**
**नका हेत ठेऊं समस्तैक सांगा ॥ "**

आपलीं सर्व गाऱ्हाणीं ऐकून घेऊन तीं दूर करण्याविषयीं राजाराम तत्पर आहेत असें पाहून प्रजेनें मोकळ्या मनानें एक एक मागणें मागावयास सुरुवात केली, बाकी म्हणून कांहीं ठेवली नाहीं.

**" बहू कष्टलों पातलों जी स्वदेशा ।**
**प्रजा बोलती कौल दे राघवेशा ॥**
**भुमीनें कदा पीक सांडूं नये रे ।**
**वदे राम लक्षुमणा हें लिही रे ॥**

* * *

**समर्था कदा रोगवारें नको रे ।**
**वदे राम लक्षुमणा हें लिही रे ॥ "**

अशा रीतीनें प्रजेनें रामापाशीं सर्व कांहीं मागितलें. पेवें, धन, धान्य, गाई, बैल, गाड्या, भाग्य, मनासारिखीं पुत्रकन्याकळंत्रें, समृद्धि, सौख्य, सुस्वरूपता, तारुण्य, शक्ति, शुभ ग्रह, निर्विघ्नता, धर्मपरायणता, दया, चातुर्य, पुण्यवासना, अमरत्व, निष्कपटपणा, पवित्रपणा इत्यादि ज्याला म्हणून जें कांहीं सुचलें तें त्यानें तेथल्या तेथें सर्वांच्या तर्फेनें मागून घेतलें. जणूं काय जेवढें मागितलें तें थोडेंच झालें, असें वाटून प्रजेनें रामापाशीं आणखी एक मागणें मागितलें कीं, आतां सुचलें तें मागितले आहे, पण यापुढें आणखी केव्हांही कांहीं आठवलें तर तें मागावयास आम्हीं तुझ्या दरबारीं येऊं, तेव्हां थेट तुझ्या चरणापाशीं येऊन दाद मागण्यास दरम्यान कोणाची आडकाठी ठेवूं नकोस.

**" तुझ्या दर्शनीं आडकाठी नको रे ।**
**वदे राम लक्षुमणा हें लिही रे ॥ "**

आणि प्रजेनें रामापाशीं शेवटचें मागणें मागितलें:—

**“ प्रभु क्लेश घेऊनि विश्रांति द्यावी ।**
**देहे तोंवरी भक्ति तूझी घडावी ॥**
**वेणीस्वामी ऐशापरी कौल दे रे ।**
**वदे राम लक्षुमणा हें लिही रे ॥ ”**

## रामगुहसंवाद

श्रीरामगुहसंवादाचे ४४ श्लोक आहेत. हेंही प्रकरण पहिल्याइतकेंच गोड आहे. त्रैलोक्याधिपति रामचंद्र, जानकी व लक्ष्मण यांसह वनवासास निघून भागीरथीच्या पवित्र तीरीं आले. आपणास गंगापार नेण्याविषयीं रामांनीं गुहाची प्रार्थना केली, तेव्हां आपण कोण म्हणून गुहानें त्यांना प्रश्न केला. त्याचें उत्तर राम देतात:—

**“ असों तापसी तीर्थवासी वनासी ।**
**तपा जातसों ऊतरीं गूणरासी ॥**
**तुझी तोयतारी त्वरें आणिं तीरीं ।**
**परदेसियां पाववीं पैलपारीं ॥ ”**

रामाच्या या म्हणण्यावर गुहाचा मुळींच विश्वास बसला नाहीं; आणि कोणाचा बसला असता ? त्यांच्या त्या रम्य, सुकुमार मूर्ति पाहून हे तापसी तीर्थवासी आहेत असें कोणास खरें वाटलें असते ? गुहानें आपला संशय स्पष्ट दर्शविलाच—

**“ नव्हां तापसी ना नव्हां तीर्थवासी ।**
**नव्हां या जनांसारिखे क्षेत्रवासी ॥**
**चहूं आश्रमांवेगळीं भासतांहां ।**
**नये नेम कर्ता असे दीसतांहां ॥ ”**

त्या त्रिवर्गाची शांत व गंभीर वृत्ति पाहून गुहाची त्यांच्यावर पूर्ण भक्ति बसली. आपण कोण आहांत हें खरें सांगा, आपण तापसी किंवा तीर्थवासी नसून कोणी तरी थोर विभूति आहांत, पण मला निश्चय करतां येत नाहीं, आपलें नांव कृपा करून सांगा.

**"वदा नाम स्वामी बहू कंठ दाटे।"**

गुहाची अकारण जडलेली भक्ति पाहून श्रीरामाच्यानें उडवाउडवीचें उत्तर देववेना. गुहाची निष्कपट निष्ठा पाहून रामांनीं त्यास आपली सर्व स्थिति, गति कळविली. तेव्हां गुहानें अत्यंत प्रेमभरानें

**"जुनें कांबळें जें मळगांदलेसे।**
**अती जीर्ण बैसावया घातलेंसे॥**
**बरें आणिलें तोय त्या जान्हवीचें।**
**प्रिती क्षाळिले पाय त्या राघवाचे॥"**

त्यानें रानफुलांनीं रामांची पूजा केली व वनफळांचा त्यांना नैवेद्य अर्पण केला. नंतर त्रिवर्गास गुहानें परतीरास नेऊन पोहोंचविलें. श्रीराम प्रसन्न होऊन त्यांनीं गुहास वर मागावयास सांगितलें, तेव्हां—

**"पदपंकजीं ठाव दीनास द्यावा।**
**सखा आपुला मित्र ऐसा म्हणावा॥**
**पुन्हा मागुतें याचि पंथेंचि यावें।**
**दिनानाथ सनाथ मातें करावें॥**
**जयश्री सवें साजरी ते पहावे।**
**असे आर्त माझें असें पूरवावें॥"**

'कौल' आणि 'श्रीरामगुहसंवाद' ह्या वेणाबाईकृत दोन प्रकरणांविषयीं इतकें लिहून श्री. देव म्हणतात, "या दोन प्रकरणांवरून माझा असा तर्क आहे कीं, रामायणांतील इतर कित्येक प्रसंगांसंबंधानें त्यांचीं अशींच आणखी कित्येक स्फुट प्रकरणें असावींत. याशिवाय 'गिरिधरां'[1]प्रमाणें त्यांनीं कांहीं रामायणें रचलीं असल्यास व तीं यापुढें[2] उपलब्ध व्हावयाचीं असल्यास ईश्वर जाणे! 'संकेतारामायणां'[3] पैकीं पहिलीं सहा कांडें वेणाबाईकृत असावींत अशी माझी कल्पना आहे."

---

१ हे वेणाबाईची शिष्या बाइयाबाई हिचे शिष्य, 'समर्थप्रतापा'दि ग्रंथांचे कर्ते. २ रा. देव यांनीं हा मजकूर लिहिल्यास २७ वर्षे झालीं, पण येवढ्या मुदतींत वेणाबाईचें एकही रामायण उपलब्ध झालेलें नाहीं. ३ 'समर्थप्रतापा'च्या आरंभीं रा. देव यांनीं दिलेला 'श्रीगिरिधर आणि त्यांची कविता' हा लेख पहा.

वर आलेल्या श्लोकांवरून वेणाबाईची पद्यरचना कशी थेट रामदासी पद्धतीची आहे हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. या रामदासी कवितेचें वैशिष्ट्य हें आहे कीं तिला छंदःशास्त्राचें, व्याकरणाचें, ऱ्हस्वदीर्घाचें, कशाचेंही बंधन नसावयाचें. असो. आतां वेणाबाईचा मुख्य ग्रंथ जो ' सीता-स्वयंवर ' त्याचा परामर्श घेण्यापूर्वीं तिचीं जीं थोडींशीं स्फुट पद्यें उपलब्ध आहेत, तीं येथें उतरून घेतां:—

**अभंग**

**आमुच्या वाटे नका जाऊं । नये ते वाटे तुम्हां लाऊं ॥ १ ॥**
**आम्ही पारिखे पारिखे । नहों लौकिकासारिखे ॥ २ ॥**
**अशी स्थिति जाली मोठी । पोटीं ब्रह्मांडांच्या कोटी ॥ ३ ॥**
**वेणीस्वामी आत्माराम । तेंचि आमुचें परंधाम ॥ ४ ॥**

**पद**

**धन्य होणें सफल जिणें रामगुणें होतें ॥**
**ध्यास पडे ज्यास त्यास सत्य कळों येतें ॥ ध्रु० ॥**
**काळ वेळ हे सफल हित करा कांहीं ।**
**सर्व काळ सुखवेळ राम भजा भाई ॥ १ ॥**
**काय जना कोण मना मानलें हें सार ।**
**रामवीण सर्व सीण दुःख अनिवार ॥ २ ॥**
**वळे पळे निमिष घडी जात लवलाहीं ।**
**आजि घडे तसें हेंचि उद्यांलागिं नाहीं ॥ ३ ॥**
**सर्व सोडिं राम जोडीं भजनीं निःकाम ।**
**धन्य तुम्ही धन्य आम्ही गाऊं रामनाम ॥ ४ ॥**
**हाहि लोक परलोक त्यास सासुरवाडी ।**
**वेणी म्हणे भक्तजनां भजनें रामजोडी ॥ ५ ॥**

या पद्याच्या शेवटीं ' वेणी म्हणे ' असे शब्द आहेत. पण वेणाबाईच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या कांहीं कवितांच्या शेवटीं ' वेणीस्वामी ' असें नांव आहे. सीतास्वयंवराच्या कांहीं अध्यायांच्या शेवटीं ' वेणी ' असें नांव आहे व कांहीं अध्यायांच्या शेवटीं ' वेणीस्वामी ' हें नांव आहे. यावरून वेणाबाईनें स्वतःचा उल्लेख या दोन्ही नांवांनीं केला आहे असें दिसतें.

### अभंग

गुरु निशब्दाचीं बीजें । आम्हा प्राप्त आत्मकाजें ॥ १ ॥
आम्ही अबोल अबोल । अबोलें बोलूं बोल ॥ ध्रु० ॥
आमुची माया वांज जाली । परब्रह्मीं लया गेली ॥ २ ॥
शब्द आकाशीं निमाला । आत्माराम अवघा जाला ॥ ३ ॥
वेणीस्वामीचिया संगें । आम्ही राहों आत्मरंगें ॥ ४ ॥

भवस्वर्ग मनोभास । मनोभास केला नास ॥ १ ॥
आम्ही आत्माराम रामीं । रामीं राम परंधामीं ॥ २ ॥
आम्ही मन मागें केलें । मनासवें अवघें गेलें ॥ ३ ॥
वेणीस्वामियाचा संग । येकसरा मनोभंग ॥ ४ ॥

गुरुवाक्यप्रेमनौका । मायासागर तरलों देखा ॥ १ ॥
आम्ही स्वामीचे अंकित । रामनामें मुद्रांकित ॥ ध्रु० ॥
अहं ब्रह्म उपदेशिलें । अहं गेलें ब्रह्म ठेलें ॥ २ ॥
आली अनुभवाची खूण । खूण केली रामार्पण ॥ ३ ॥
वेणीस्वामी अवघा जाला । विज्ञानासी अंत आला ॥ ४ ॥

देह माझें मन माझें । सर्व नेलें गुरुराजें ॥ १ ॥
आम्ही गुरुनाथपंथी । ज्ञानमुद्रा दिधली हातीं ॥ ध्रु० ॥
कर्णीं चढली नाममुद्रा । मुखीं अगोचरी मुद्रा ॥ २ ॥
कान फाडुनि जोगी जालों । संतदर्शनासी आलों ॥ ४ ॥
वेणीस्वामींचें दर्शन । मायासंकेतनिर्शन ॥ ४ ॥

वरील अभंगांवरून वेणाबाईच्या पारमार्थिक अधिकाराची व अध्यात्मज्ञानाची थोडीशी कल्पना वाचकांस होईल असें वाटतें. 'अहं ब्रह्म उपदेशिलें । अहं गेलें ब्रह्म ठेलें' हा चरण मोठा बहारीचा आहे. पण या ठिकाणीं एक प्रश्न उद्भवतो तो हा कीं 'वेणीस्वामीचिया संगें । आम्ही राहों आत्मरंगें,' वेणीस्वामीचें दर्शन । मायासंकेतनिर्शन' इत्यादि ठिकाणीं आलेला 'वेणीस्वामी' हा शब्द कोणाचा वाचक आहे? हे अभंग वेणाबाईचे आहेत असें मानलें तर मला वाटतें, 'वेणीस्वामी' हा षष्ठितत्पुरुष

समास असून वेणाबाईंचे स्वामी जे श्रीरामचंद्र त्यांचा वाचक हा शब्द असावा. परंतु, 'समर्थप्रताप' ग्रंथाच्या प्रस्तावनेंत हे अभंग गिरिधरांचे असावे असें जें रा. देव यांनीं लिहिलें आहे तेंच मला अधिक संभवनीय वाटतें. मागाहून, 'श्रीसीतास्वयंवर' ग्रंथाची प्रस्तावना लिहितांना श्री. देव यांचें हें मत बदलून, हे अभंग वेणाबाईंचेच आहेत असें त्यांना वाटलें. पण तसें वाटण्याला कांहीं सबळ कारण आहे असें मला वाटत नाहीं.

आतां वेणाबाईंचा मुख्य व मोठा ग्रंथ जो 'श्रीसीतास्वयंवर' त्याकडे वळूं. रामायणांतील सीतास्वयंवर हें आख्यान आमच्या जुन्या मराठी कवींचें फार आवडीचें आख्यान होय. या आख्यानावर विठ्ठल, नागेश, आनंदतनय, वामन इत्यादि कवींनीं सुंदर काव्यें रचिलीं आहेत, परंतु तीं बहुतेक श्लोकबद्ध आहेत. ओवीबद्ध सीतास्वयंवर फक्त वेणाबाईनेंच रचलेला दिसतो. वेणाबाईंच्या ह्या ग्रंथाचे १४ समास असून ओवीसंख्या १५६८ आहे, म्हणजे एकनाथांच्या 'रुक्मिणीस्वयंवरा'पेक्षां हा ग्रंथ जरा लहान आहे. वेणाबाईचें काव्यकौशल्य आणि भाषाप्रभुत्व या ग्रंथांत उठावदार रीतीनें व्यक्त झालें आहे.

पहिल्याच समासांत विश्वामित्र ऋषि दशरथाकडे येऊन त्यांनीं आपल्या यज्ञाच्या रक्षणार्थ रामलक्ष्मणास पाठविण्याची विनंति केली तेव्हां दशरथाची काय स्थिति झाली व त्यानें कोणतें उत्तर दिलें हें वेणाबाई सांगतात—

**"विश्वामित्राचे उत्तरीं। रायासि भेदिलें जिव्हारीं।**
**जैसें वज्राचिया धारीं। हृदय विदारे॥**
**तनु कांपती थर्थरां। नेत्रीं लागल्या अश्रुधारा।**
**कांहीं धरूनियां धीरा। राजा बोलता जाला॥**
**म्हणे माग स्वर्गींचें बरवें। माग पातालींचें आघवें।**
**देईन पुरुषार्थवैभवें। दिशावलयांकित हे धरा॥**
**श्रेष्ठ स्वामी मुनिराज। रामावेगळें माग मज।**
**वज्र घेऊन सुरराज। देईन तुजसांगातें॥**
**यागरक्षणा पाहिजेती। देईन दिशांचे दिग्पती।**
**नवग्रहही तुजप्रती। यागरक्षणा देतों॥**

आणीक देतों मुनिराज । सूर्य आमुचा पूर्वज ।
वडील आणि तेजःपुंज । सर्वप्रकाशक तो नेई ॥

पुढें वसिष्ठांच्या सांगण्यावरून राजा दशरथ श्रीरामास विश्वामित्रांबरोबर पाठविण्यास तयार झाला तेव्हां राम कौसल्येचा निरोप घेण्यास गेला असतां त्यांचा जो संवाद झाला तो मनोरंजक आहेः—

नमस्कारिली निजजननी । उभा राहिला चापपाणी ।
वदे मातें ये क्षणीं । आज्ञा दिव्ही पाहिजे ॥
मुख न्याहाळी सुंदरा । पंकजनयना मनोहरा ।
प्राणाच्या प्राणा रघुवीरा । माझ्या कोठें जातोसी ॥
सुंदर बोले सुंदर वचन । यागरक्षणालागून ।
सभे रायासी मागोन । कौशिकें आम्हा घेतलें ॥
जीवलोण जगजीवना । उतरी कौसल्या नंदना ।
म्हणे माझ्या आनंदवर्धना । काय जालें त्या कौशिका ॥
रायासी मागावी संपत्ती । अमित्य सेना न्यावी होती ।
ऋषीचे भीडे भूपती । काय केलें ॥
वसिष्ठादिकींही सभेस । अनुमोदिलें ये गोष्टीस ।
काय केलें विचारास । तुज यागरक्षणा ॥
काय जाल्या त्यांच्या बुद्धी । कैंची मांडिली उपाधी ।
माझ्या सुंदरा गुणनिधी । कैसा धाडूं आश्रमा ॥
पाहतां रूपाचें बरवेपण । कोटी मदनाचें निंबलोण ।
मी वोवाळीन आपुले प्राण । दृष्टी घाली सुंदरा ॥

इतकें बोलून कौसल्येनें राजपुरोहित वसिष्ठमुनीस बोलाविलें व ते येतांच त्यांचें यथोचित आदरातिथ्य करून ती त्यांस म्हणाली—

"कौशिकाचिया यागासि । काय उणें होतें द्यावयासी ।
संपत्ती सेना रायापाशीं । दुजी तुळणा नसे ॥
नव्याणौ सहस्राशेवटीं । पुत्रमुख पाहिलें दृष्टी ।
रायासी आठवेना कां गोष्टी । राम आश्रमा धाडितां ॥

आणि तुम्ही पुरोहितीं। विचार सांगावा बरव्या रीती।
मुनी तोष पावे चित्तीं। आणि राम नेदावा ॥
कोटीच्या कोटी यागरचना। मुनी करूं द्या धन सेना।
आजि रायाच्या वैभवमाना। काय उणें असे ॥
रामं नेदीं न धर्डीं आश्रमा। म्हणोनि पाचारिलें तुम्हा।"
नमस्कारी म्हणे "क्षमा। हे गोष्टी करावी ॥
कौशिकाचें समाधान। बहुतां प्रकारें करून।
सर्वस्व हें राज्यदान। त्याच्या पायीं करा हो ॥
रामावेगळें द्या सर्वांसीं। ऋषी तोषवा मानसीं।
बरव्या प्रकारें कौशिकासी। प्राण आम्ही समर्पूं ॥"

त्राटिकावधाचा प्रसंग:—

पुढें लागलें घोर वन। शाळ ताळ निबिड बन।
कौशिक म्हणे हें वन। ताटिकेचें राघवा ॥
मरीच सुबाहु पुत्रेंसीं। येथें आहे ते राक्षसी।
मळकुंशळ देशासी। वसों नेदी सर्वथा ॥
तरी ये समईं महावीरा। ताटिका वधीं कोदंडधरा।
चापपाणी सीतावरा। जयो पाव ये काळीं ॥
कांक्षा धरिसी स्त्रीवधाची। तरी हे पीडक त्रैलोक्याची।
ईचिया वधांतीं धर्माची। अभिवृद्धि वाढेल ॥
धर्मस्थापका रविकुळटिळका। ताटिका मारीं रघुनायका।
मंगळ कीर्तीचा घोष निका। त्रिलोकीं ब्रीद गाजों दे ॥
महावीर सीतारमण। वदे आज्ञा हे प्रमाण।
धनुष्य टणत्कारूनि बाण। चंद्राकार काढिला।
धनुष्यटणत्काराचा घोष। अद्भुत दाटला कर्कश।
नादें उतटलें आकाश। ताटिका ऐकोनि धांविली ॥

---

१ रामास न पाठवितां. २ मी राम देत नाहीं व ऋषींच्या आश्रमासही पाठवीत नाहीं. ३ रामाशिवाय वाटेल तें घ्या. ४ माल आणि कोसल असे दोन देश. ५ स्त्रीवध कसा करूं अशी शंका घेशील.

अक्रा सहस्राची गजमाळा । कंठीं घातली अवलीळा ।
सिंह शार्दूल कर्णबिळा । कुंडलें वोविलीं ॥
ताडप्रमाण विशाळ । दंत दाढा ढिसाळ ।
शरीर अत्यंतचि स्थूळ । घोररूपी धांविली ॥
धाविनली त्या अवसरा । हाक फोडिली महाघोरा ।
ऊर्ध्वबाहु निशाचरा । राम सौमित्र देखोनि ॥
तंव तो वीरबाहो सुलक्षण । अभंग तें वज्रठाण ।
चंद्रार्क सोडिला बाण । ताटिकाहृदय फोडिलें ॥
ताटिकेचा गेला प्राण । पाताळीं सुस्नात बाण ।
रामभातां सुलक्षण । हंसरूपें प्रवेशला ॥

पुढें सीतेच्या स्वयंवरासाठीं श्रीराम व लक्ष्मण यांसह विश्वामित्र मिथिला नगरीस जात असतां वाटेंत, गौतमशापानें शिळा होऊन पडलेल्या अहल्येचा उद्धार श्रीरामानें केला त्या वेळीं तिनें केलेली रामस्तुतिः—

दीनबंधु पतितपावन । गौतम आश्रम पाहोन ।
शापशिळेसी वामचरण । अवचितांचि स्पर्शला ॥
तत्काळ उद्धार गोरटी । रामचरणीं घाली मिठी ।
म्हणे जय जय जी जगजेठी । बहुत दिवस कष्टलें ॥
स्त्रीदेहाचा समंधु । भोगीत होतें अपराधु ।
मजकारणें दीनबंधु । कोणेकडून आलासी ॥
चौखाणीवेगळा । देहे धरिला होता सीळा ।
मजकारणें दीनदयाळा । अरण्य शोधीत आलासी ॥
अवघ्याहून नीच यातना । जेथें उपायेचि चालेना ।
संकटींहूनि पावना । मातें मुक्त केलें ॥
मज पाषाणाचें अंतर । जाणोनि केला उद्धार ।
सर्वज्ञ नामाचा बडिवार । प्रचीतीसि मज आला ॥
रविवंशजा रघुनंदना । जन्मोजन्मीं उपासना ।
तुझेचि ध्यानभजना । पात्र करीं मज स्वामी ॥

विश्वामित्रांबरोबर रामही सीतास्वयंवरास आला आहे हें ऐकतांच जनकास मोठा आनंद झाला —

राम ऐसें पडतां कानीं । जनक संतोषला मनीं ।
म्हणे माझीये नंदिनी–। लागीं तो पात्र होय ॥
अति सत्वरें घेतली पूजा । सामोरा आला जनक राजा ।
सौमित्रेंसीं कौसल्यात्मजा । देखोनि विस्मय पावला ॥
थोर पस्तावला मनीं । म्हणे नसत्या साभिमानीं ।
कैसा पडलों जाउनी । धनुष्यपण वेर्थ केला ॥
त्रिभुवनसुंदर हें रूपडें । माझी कन्या त्याच्या पाडें ।
परंतु पणासी न मोडें । सत्य प्रतिज्ञा माझी ॥
असेल माझी क्रिया बरी । भक्ति वैराग्य तपें खरीं ।
विदेह नाम सत्योत्तरीं । राम जावाई जोडेल ।

श्रीरामस्वरूपवर्णन :–

सकळ पाहती स्वानंदघन । दिव्यांबरें परिधान ।
मुगुट किरिटीं विराजमान । कुंडलें कर्णीं झळकती ॥
चरणीं नेपुरांचा गजर । अंदु तोडराचा झणत्कार ।
पृष्ठीं भाते मनोहर । अमोघ शरीं दाटले ॥
चित्रविचित्र रत्नमणी । च्यापीं झणत्कारिती किंकिणी ।
आजानुबाहो चूडामणी । करीं कोदंड मिरवत ॥
गौरवर्णी सुमित्राबाळ । रामतनु दूर्वादळ ।
जन बोलती तमाळनीळ । जानकी वर हा साजे ॥
तंव त्या सुंदरालागून । कनकताटीं विराजमान ।
कितीयेक वधूजन । आरत्या वोवाळूं आल्या ॥
कितीयेक बोलती । आमुची सीता भाग्यवंती ।
हा वर मदनमूर्ती । तेचि आतां लाधेल ॥

सीतास्वयंवरास कोणकोणत्या देशांचे राजे आले होते त्यांची जी यादी वेणाबाईनें दिली आहे ती पाहण्यासारखी आहे :—

मागधदेशी राजे थोर । कंकणदेशी महावीर ।
सौराष्ट्र मार्वाड अपार । शाल्यदेशी आले ॥

कैकट आणि कासीविरी । सोरट आले गजभारीं ।
तारुत बंगाळाची थोरी । तेलंग द्राविड आले ॥
अंगदेशी वोड्यादेशी । गौड आले संभ्रमेसी ।
धटदेशी बर्बरदेशी । मऱ्हाष्ट राजे आले ॥
गुजरदेशी जाबाळदेशी । पांचाळदेशी शृगाळदेशी ।
सिंधुदेशी विकटदेशी । मल्याळदेशी आले ॥
बसीहाळदेशी गौणदेशी । बगाळदेशी माळवदेशी ।
कौशाळदेशी खानदेशी । वराडदेशी आले ॥
त्रिपाळदेशी बागलाणी । त्रिशंकदेशाची दाटणी ।
ढकदेशी ते क्षणीं । कर्नाटक आले ॥
बिलगडदेशी दरावती । चिडदेशी आले किती ।
मीरदेशी सभेप्रती । केदारदेशी आले ॥
सप्तसागरींचीं बेटें । तेथील राजयांचीं थाटें ।
रावणादि अचाटें । वैभवेंसी आले ॥

जनकानें आपल्या सेवकांकडून शिवधनुष्य सभेंत आणविलें व तें जमलेल्या राजेलोकांस दाखवून तो म्हणाला, ' हें धनुष्य वांकवून त्याला जो बाण लावील त्याला मी माझी मुलगी देईन. ' हें ऐकतांच लंकापति रावणानें काय केलें ?

वचन होतां तें श्रवण। हरुषें उठिला रावण ।
सभा लक्षून कुलक्षण । काय बोलता जाला ॥
मिथिळाहातीं घेईन पूजा । मी वरीन जनकात्मजा ।
धनुष्य देखोनि माझ्या भुजा । स्फुरण करिती वीर हो ॥
म्या हिंदोळिला कैलास । समुद्र केला कासावीस ।
वोढून काढीन आतां शेष । वराह उचलीन वीस भुजीं ॥
तेथें कायेसें हें पिनाक । मज आणि याचा धाक ।
इंद्रधनुष्याचा गर्मक । तृणतुच्छ म्या केला ॥

---

१ गर्व.

इतकी वल्गना करून रावणानें धनुष्यास हात घातला, परंतु—

त्रिंबक धनुष्य तें पवित्र । रावणकर अपवित्र ।
स्पर्श करितां दशवंगत्र[1] । थरथरां कांपतु ॥
जानकी ते रामकांता । आणि सर्वशक्ति ते तत्त्वता ।
रावणा क्षोभली आदिमाता । शक्ति वोढून घेतली ॥
धनुष्य उचलूं गेला लीळा । तंव तें आटोपेना बळा ।
कांपों लागला चळचळा । गुडघे मांड्या टेंकितु[2] ॥
मेटें घालून सांवरी । तंव तें आदळलें उरीं ।
आडोंनी धरेवरी । किरविंल[3] जैसा पसरला ॥
ऊर दडपिला धनुष्यें । श्वास टाकाया संधी नसे ।
हातपाय झाडीतसे । फडफडां धरणीसी ॥
मुखीं रक्त[4] लोंढे खोटी । फिरती नेत्र चक्रवोंटी[5] ।
धनुष्य बळें हृदय लाटी । वथा मोठी रावणा ॥
कांहीं उपाव न दीसे । प्राणसंकट मांडलेंसे ।
दांत खाऊन बोलतुसे । धांवा धांवा बळिये हो ॥
रावणगर्वाचें वोडंबरं[6] । त्रिंबकधनुष्यें केला चूर ।
म्हणे मेलों उठा वीर । काय अंत पाहतां ॥
रावणाची अवकळा । दुःख देखोन भूपाळां ।
कियेकां वाटली सुखवेळा । किती विस्मयो पावले
किती बोलती नृपवर । म्हणती रावणा लागला घोर ।
आतां कोण आहे वीर । धनुष्य वोढून टाकिता ॥
तंव ते मिथिळाचे प्रधान । समस्तहि गजबजून ।
उभे राहिले विराजमान । काये बोलती जनकासी ॥
म्हणती राया चक्रवर्ती । समस्त आणिले भूपती ।
येक येक वीर त्रिजगती । जिंकिती ऐसे आले ॥

---

१ दशमुख रावण. २ गुडघे टेंकून. ३ किरडूं पसरावें त्याप्रमाणें. ४ रक्ताच्या गुळण्या. ५ तोंडांत रक्ताच्या गुळण्या येऊन श्वासनिरोध झाल्यामुळें रावणाचे डोळे चक्रवाताप्रमाणें गरगर फिरूं लागले. ६ अवडंबर, बाऊ.

**हे आवघेचि क्षेत्रधर्मी । यामध्यें हा पराक्रमी ।**
**त्या रावणाच्या भुजा भूमी । धनुष्याखालीं आडकल्या ॥**
**तरी त्रिभुवनजयश्रीमंगळा । राया जानकी दिव्य बाळा ।**
**पण धनुष्याची अर्गळा । कोणा माळा घालील ॥**

पुढें विश्वामित्रांच्या आज्ञेनें श्रीरामानें तें धनुष्य उचलून रावणाची सुटका केली तो प्रसंग वेणाबाईनें फार हृदयंगम रीतीनें वर्णिला आहे :—

**तंव तें भारी ठाणधीर । सभ्य थिर जें गंभीर ।**
**वामचरणांगुष्ठाचें अग्र । तेणें च्याप लोटिलें ॥**
**ब्रह्मांडतुळणेचें च्याप । आणि अनंत ब्रह्मांडांचा हा बाप ।**
**धनुष्यभयाचा खटाटोप । तृणतुच्छ जाला ॥**
**सरळ सुंदर बाहुदंड । लीळें उचलिलें कोदंड ।**
**रामें चढवितां ब्रह्मांड । डगमगूं लागलें ॥**
**ते समयींचा कर्कराट । च्याप आर्डानें थरथराट ।**
**सकळां मांडलें संकट । धीर धरून पाहाती ॥**
**लीळा लवविलें च्याप पाणी । तेणें महीपाळांच्या मानहाणी ।**
**संध्यारागाच्या कमळणी । धरा लक्षिती तैसे ॥**
**सीत चढवितां रघुनंदनें । उत्फुल्ल ऋषींचीं आननें ।**
**हरुष रोमांच स्फुराणें । तनु उदित जनकेसी ॥**

* * *

**रामें वोढितां कोदंड । मध्येंचि जालें दुखंड ।**
**ध्वनी दाटलें ब्रह्मांड । नभ कर्कश गर्जतसे ॥**
**मेरुमांदारसिखरें । घडघडिलीं ते अपारें ।**
**सप्तपाताळ दिगांतरें । नादें डोले वसुमति ॥**
**खळबळिले सप्तसागर । चंद्रागीर द्रोणागीर ।**
**तेव्हां खचले अपार । नक्षत्रझडी बैसली ॥**

वेणाबाईच्या सीतास्वयंवराचे १४ समास असून त्यांत १५६८ ओव्या आहेत, तेव्हां त्यांतून असे जरी आणखी कितीही उतारे दिले तरी समग्र ग्रंथाच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना वाचकांस होणार नाहीं; त्यासाठीं तो

सबंध ग्रंथच वाचला पाहिजे. "सीमंतपूजन, हळद, पत्रिकापूजन, देवकप्रतिष्ठा, रुखवत, तेलवण, पायघड्या, कलशपूजा, गणेशपूजा, दागिन्याचें वर्णन, मधुपर्क, लाज्याहोम, सुनमुख, उखाणे, हळदी उटणें, अक्षवाणें, भोजन पक्वान्नांचीं नांवें, साडे समर्पण, वरात, लक्ष्मीपूजन, वगैरे लहान मोठ्या सोहळ्याचें वर्णन" फार बहारीचें आहे. ह्या 'सीतास्वयंवरा' विषयीं श्री. शं. श्री. देव लिहितात, "सीतेचें स्वयंवर, वेणाबाईच्यापूर्वी व नंतर, पुष्कळांनीं वर्णिलें आहे, पण वेणाबाईच्या ग्रंथाची योग्यता कांहीं निराळी आहे. स्वयंवरासारख्या प्रसंगाची आवड स्वभावतः स्त्रियांना असावयाची आणि म्हणून त्यांच्या लेखणींतून तो प्रसंग जसा उतरेल तसा इतरांच्या उतरणार नाहीं, असें म्हणण्यांत कोणाचा उपमर्द करण्याचा हेतु असूं शकणार नाहीं; कारण इतरांचींही स्वयंवरें आपआपल्या परीनें उत्कृष्ट नाहींत, असें कोण म्हणेल? वेणाबाईच्या स्वयंवरांत प्रत्येक लहानमोठ्या प्रसंगाचें जसें यथासांग वर्णन आहे, तसें दुसऱ्या एकाद्या ग्रंथांत असल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं. या माझ्या म्हणण्याचा कोणीही विपरीत अर्थ करूं नये. माझ्या म्हणण्याचा भावार्थ इतकाच कीं, हा असला प्रसंग यथासांग वर्णन करण्याचा अधिकार जसा एकाद्या स्त्रीला असतो तसा तो पुरुषाला नसतो. श्रीएकनाथांचा रुक्मिणीस्वयंवर ग्रंथ वेणाबाईच्या सीतास्वयंवराशीं ताडून पाहिला म्हणजे माझ्या म्हणण्याची सत्यता वाचकांस सहज पटेल. रुक्मिणीस्वयंवर ग्रंथ सर्वोत्कृष्ट आहे हें काय कोणी कोणास सांगावयास पाहिजे? पण असें असूनही जें एकनाथांच्या ग्रंथांत नाहीं तें वेणाबाईच्या ग्रंथांत आहे व उलटपक्षीं जें सीतास्वयंवरांत नाहीं तें रुक्मिणीस्वयंवरांत आहे. रुक्मिणीस्वयंवराचा प्रसंग वेगळा आहे. तो सोडून दिला तरी प्रत्यक्ष लग्नसोहळा एकनाथांनीं त्रोटक वर्णिला आहे, तो वेणाबाईनीं साद्यंत वर्णिला आहे व एकनाथांनीं अथपासून इतिपर्यंत आपली अध्यात्मदृष्टि अढळ ठेवली आहे तर वेणाबाईनीं आपली भक्तिप्रेमाची दृष्टि कोठेंही ढळूं दिली नाहीं."

श्री. देव यांचें हें म्हणणें मान्य होण्यासारखेंच आहे, पण प्रत्यक्ष लग्नसोहळ्याचें नाथांनीं केलेलें वर्णन त्रोटक आहे हें विधान तितकेंसें बरोबर नाहीं; वेणाबाईच्या वर्णनापेक्षां नाथांचें वर्णन जरा त्रोटक आहे इतकेंच फार तर म्हणतां येईल. दुसरी गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं नाथ

हे मोठे व्युत्पन्न असल्यामुळें त्यांची भाषा जशी प्रगल्भ आणि संपन्न आहे तशी वेणाबाईची नाहीं. मात्र, स्त्रियांनाच ज्या गोष्टींचा अनुभव अधिक अशा गोष्टी विस्तारेंकरून सांगण्यांत वेणाबाईनें विशेष कौशल्य दाखविलें आहे. उदाहरणार्थ, सीतेस रामाच्या स्वाधीन करतांना जनक आणि जनक-पत्नी यांच्या मनाची स्थिति कशी झाली याचें वेणाबाईनें केलेलें वत्सलरसपूर्ण वर्णन पहा:—

**करीं दुहिता मिथिळापति। जानकी निरवी भूपति।**
**कन्यास्नेहाची थोर प्रीति। नेत्रोदक चालिलें॥**
**कनकपुतळी धरूनि हातीं। राजा निरवी अयोध्यापती।**
**ते समई गोत संपत्ति। सभेसहित गहिंवरे॥**
**जानकीगुणें हृदय कृपण। राजा निरवितां उच्चारण।**
**अष्ट वर्षे केलें म्या पाळण। आतां तुम्ही करावें॥**
**माझ्या प्राणाची प्राणकळा। सुखदायक सुसीळा।**
**परम स्नेहें भूपाळा। ईचें पाळण करावें॥**
**सकळ कीर्तीची गजगजा। निरोपम्य हे अवनिजा।**
**ईचें पाळण रायें वोजा। बहु प्रकारें करावें॥**
**कौसल्ये निरवी जनक बाळा। जळ वाहे नेत्रांजळा।**
**म्हणे माझी हे सुसीळा। पाळण तुम्ही करावें॥**
**माझ्या प्राणाची आवडती। जीवनकळा हे सुमति।**
**ईचें पाळण बरव्या रीती। वडिलीं केलें पाहिजे॥**

इतकें बोलून जनकानें सीतेसही दोन उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या:—

**श्रेष्ठवचनपरिपाळण। तुटों नेदावें अनुसंधान।**
**रामचरणीं अनन्य। कदां वियोग नसावा॥**
**तुजकरितां जालों मान्य। तिहीं लोकीं धन्य धन्य।**
**राम जावाईस्वें पूजन। तुझेन योगें साधलें॥**
**म्हणे माझी येश कीर्ति। तां वाढविली सुमति।**
**रामचरणाची प्राप्ति। तुजकरितां मज जाली॥**
**पतिव्रताधर्माचे पाळणीं। सर्वां श्रेष्ठ सुलक्षणीं।**
**आवो कन्ये रामचरणीं। अनन्य सेवे असावें॥**

असाच उपदेश सीतेला तिच्या आईनेंही केला :—

तैसीच जानकीची जननी । म्हणे सुंदरे विळासिनी ।
कैसें असावें तुजवांचुनी । राज्य उदास जालें ॥
तुजकरितां बडिवार । थोर जाला होता विस्तार ।
तो हा समस्त जोजार– । आमुचा तां वारिला ॥
आतां आम्ही उदासीन । सेविलें निरंजन वन ।
तूं सुबुद्धि मनमोहन– । सहित राज्य करावें ॥
तुझेनि गुणें जालों मान्य । आमुचा वंश केला धन्य ।
आतां रामपदीं अनन्य । सेवे तत्पर असावें ॥

वेणाबाई शिष्यांना गुरूपदेश देत असे हें मागें सांगितलेंच आहे. गिरिधरस्वामी ‘ समर्थप्रतापां ’ त लिहितात :—

वेणुबाईपासूनि कितेक संत जाले ।
उत्तरभूमीस बहुधा गेले ।
त्रिवेणी अंतर्वेदीस राहिले ।
अयोध्या समीप करूनियां ॥

वेणाबाईसंबंधानें गिरिधरांनीं आणखी कांहीं माहिती दिली आहे ती येणेंप्रमाणें :—

वेणाबाई मुख्य भक्तिसंस्थान
सदा सर्वदा समर्थध्यान ।
बाहो क्षेत्रीं समर्थांसी जालें हनुमंतदर्शन ।
श्रीरामलिंगीं देवालयीं ते वेळीं ॥
पूर्वीं पंचवटिकेसी श्रीसमर्थआज्ञे अनुष्ठानें केलीं ।
देवद्वारीं वांज निंबोणीसी अक्षा निंबें आलीं ।
श्रीरामें अकरा दिवस येकेक सेवविलीं ।
अतिरुद्रसंख्या परमार्थ दिधला ॥
दासबोध ग्रंथराजश्रवणें मुमुक्षु लोक केला ।
श्रीगुरुचरणीं प्रांत सेवेसी लाविला ।
गुरुत्वाचा दंभदाभा न धरिला ।
वेणी अनन्य श्रीचरणीं ॥

खालील ओव्यांतही वेणाबाईचा उल्लेख आहे:—

**समर्थदेवें वेणाबाईसी वरदानें दिधलीं ।**
**सीतास्वयंवरें रामायणें वदविलीं ।**
**रामकथा ब्रह्मांड भेदूनि नेली**
**पैलिकडे समर्थें ॥**
**मंगलरामायणें छंदोरामायणें ।**
**संकेतरामायणें लवकुशरामायणें ।**
**सुंदररामायणें अब्दरामायणें ।**
**भाषारामायणें वदविलीं ॥**
**एवं वेणाबाईचें मुख्य आख्यान ।**
**निवेदन केलें वर्तमान ।**
**समर्थचरणीं वेणी त्रिवेणी विद्यमान ।**
**सज्जनपर्वतामाझारी ॥**

—श्रीसमर्थप्रताप, समास ११ वा.

श्रीसमर्थांनीं वेणाबाईस वरदान देऊन तिजकडून सीतास्वयंवर, मंगलरामायण, छंदोरामायण, संकेतरामायण, लवकुशरामायण, सुंदररामायण, अब्दरामायण, भाषारामायण इत्यादि ग्रंथ लिहविले, असा वरील ओव्यांचा अर्थ होतो. परंतु सीतास्वयंवराशिवाय वेणाबाईचा दुसरा कोणताही मोठा ग्रंथ उपलब्ध नाहीं. अब्दरामायण, मंगलरामायण, सुंदररामायण, व संकेतरामायण अशीं पांच रामायणें उपलब्ध आहेत खरीं, परंतु तीं वेणाबाईकृत नसून वरील माहिती देणारे तिचे प्रशिष्य गिरिधर यांनींच रचलेलीं आहेत. पण भाषारामायण व लवकुशरामायण हीं दोन रामायणें कोठें आहेत व तीं कोणीं रचलीं आहेत? जीं रामायण गिरिधरांचीं म्हणून रा. देव यांनीं सांगितलें आहे तींच तर कदाचित् वेणाबाईचीं नसतील?

---

# बाइयाबाई ऊर्फ बयाबाई रामदासी

बाइयाबाईची फारशी माहिती रामदासी वाङ्मयांत सांपडत नाहीं. ही वेणाबाईची शिष्या. 'समर्थप्रताप'कर्ते गिरिधर हे बाइयाबाईचे शिष्य होत. ते 'समर्थप्रतापा'च्या ११ व्या समासांत हिच्यासंबंधानें लिहितात :—

**मरीचि क्षेत्रीं वेणाबाई संस्थान बाइयाबाई।**
**तीन वर्षें तन्मयता समाधि देहीं।**
**देहीं देहभान आहे कीं नाहीं।**
**तीर्थ पयपान केलें षण्मासें ॥**
**बाइयाबाईसी कुमारीदेहींच श्रीरामें प्रसाद दिधला।**
**दह्हींभात नैवेद्य दावितां ताटीं राम जेविला।**
**हा कोण वो ताटीं जेवितो म्हणतां अदृश्य राम जाहाला।**
**देवगृहामाझारीं ॥**
**मग लग्न जाहाल्या श्रीरामभक्ति।**
**भौतिक दैवतें देव्हारींचीं राममंत्र जपतां पळती।**
**मग आपघर त्यागूनि बापघरीं केली वस्ती।**
**श्रीगुरुसेवन केलें साक्षात्कारें ॥**
**हातीं पुस्तक उदास वनीं दृश्य मार्ग चुकतां।**
**अदृश्य शून्य दरकुटीं पडतपडतां।**
**श्रीरामें हातीं धरूनि वोढिलें तत्त्वता।**
**सगुण स्वरूप देवें प्रगटिलें ॥**
**पीतांबरधारी दोघे सांवळे सुंदर गौरवर्णी।**
**कोदंडपाणी मुकुट माथां कुंडलें कर्णीं।**
**सुमनगंधमाळा देव सांठविले अंतःकरणीं।**
**अभिवंदनें गुप्त जाले वरदायक ॥**

**ऐसें बाइयास्वामीचें दर्शन आख्यान ।**
**अंतर्बाह्य रामरूपें अखंड दर्शन ।**
**कित्येक जीव उद्धरिले जाण ।**
**चौऱ्यासीं वर्षें परमार्थ केला ॥**

ह्या ओव्यांवरून असें दिसतें कीं मिरज येथील वेणाबाईच्या मठाचे अधिकार बाइयाबाईकडे असावे. त्याचप्रमाणें ती तीन वर्षें समाधिस्थितींत असून तेवढ्या अवधींत तीर्थ आणि दूध यांवर ती जिवंत राहिली. ती कुमारी असतांच श्रीरामाची तिजवर कृपा झाली; व ती दहींभाताचा नैवेद्य रामास दाखवीत असतां राम ताटांत जेऊं लागला. 'ताटांत कोण जेवतो ?' असें तिनें म्हणतांच राम अदृश्य झाला. ही गोष्ट तिच्या माहेरीं देवघरांत घडून आली. पुढें तिचें लग्न झालें तरी आपली रामोपासना तिनें चालू ठेवलीच होती. पुढें आपलें सासर सोडून ती आपल्या बापाच्या घरीं येऊन राहिली व तिनें साक्षात्कारपूर्वक गुरुसेवा केली. ती एकदां हातीं पुस्तक घेऊन रानांत उदासवाणी फिरत असतां वाट चुकली व कांट्याकुट्यांत सांपडली. तेव्हां श्रीराम तेथें प्रगट होऊन त्यानें तिला हातीं धरून बाहेर काढलें व सगुणरूपानें दर्शन दिलें. पीतांबर धारण केलेले व ज्यांच्या हातीं धनुष्य-बाण असून डोक्यावर मुकुट व कानांत कुंडलें आणि गळ्यांत सुगंधी पुष्पहार आहेत असे दोन पुरुष तिनें पाहिले व तिनें त्यांना अंतःकरणांत सांठवून नमस्कार करतांच, तिला वरदान देऊन ते गुप्त झाले. बाइयाबाईनें ८४ वर्षें परमार्थांत घालविलीं व अनेक जडमूढांचा उद्धार केला.

बाइयाबाईविषयीं, तिचेशिष्य गिरिधर यांनीं ही येवढीच माहिती 'समर्थ-प्रतापां'त दिलेली आहे; व ती तर सगळी चमत्कारांनीं भरलेली आहे. पण गिरिधरांसारखा सत्पुरुष जाणूनबुजून खोटी माहिती देईल असेंही म्हणतां येत नाहीं. या माहितींत बाइयाबाईचें जन्मस्थान, सासरचें गांव, जन्मकाल, मृत्युतिथि इत्यादिकांचा उल्लेख नाहीं.

बाइयाबाईची जी काय थोडीशी कविता उपलब्ध आहे ती सगळी भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या शके १८३३ च्या अहवालांत छापली आहे. या सर्व पद्यांच्या शेवटच्या चरणांत बाइयाबाईचें 'बया' हें नांव आहे,

पण कांहीं पद्यांत नांवच नाहीं. यामुळें, ज्यांत तिचा नामोल्लेख नाहीं तीं पद्यें तिचींच आहेत कीं काय हें नक्की सांगतां येत नाहीं. बाइयाबाईची ही येवढीच कविता उपलब्ध असल्यामुळें ती सगळीच येथें उतरून घेतों.

**पदें**

**हा गुरुराजचि साचा । सिंधु आनंदाचा ॥ ध्रु० ॥**
**सा च्याराला अंत न लागे । कुंठित जाल्या वाचा ॥ १ ॥**
**जाणिव टाकुनि नेणिव ग्रासुनि । येथेंचि लाग तयाचा ॥ २ ॥**
**भास निराभास होउनियां एक । हाचि भास जयाचा ॥ ३ ॥**
**गुरु हा विश्वंभर दास बयावर । घाली पदर कृपेचा ॥ ४ ॥**

या पद्यांत 'गुरु हा विश्वंभर' असे शब्द आहेत, त्यांवरून या बयाबाईचे 'विश्वंभर' नामक कोणी गुरु होते, कीं रामदासस्वामीचाच विश्वंभर शब्दानें तिनें उल्लेख केला आहे, हें समजत नाहीं. पण बयाबाईचे गुरु रामदास नसून वेणाबाईचा अनुग्रह तिला होता हें गिरिधरांनीं स्पष्टच सांगितलें आहे. तेव्हां हे 'गुरु विश्वंभर' कोण? कीं ही दुसरीच एखादी बयाबाई होऊन गेली?

**क्या कहुं रे गुरुनाथकी बातमे ।**
**मस्तभया है दिल मेरा रंगमें ॥ ध्रु० ॥**
**लाल रंगमें सफेद खुला है ।**
**कोइ नहि जाने आप भुला है ॥ १ ॥**
**जब सद्गुरुके पग लीन होना ।**
**रंगातीत रंग आपहि होना ॥ २ ॥**
**रामदासगुरुपगकी दासी ।**
**दास बया फिरे देसबिदेसी ॥ ३ ॥**

**जायो सखीरी जहां गुरु बैठा ।**
**जिसके दिलमे येहि जग पैठा ॥ ध्रु० ॥**
**बाग रंगोली मेहेल बना है ।**
**मेहेलके बीच मे झुलना खुला है ॥ १ ॥**

इस झुलनेपर झुलो रे भाई ।
जननमरनकी भूल न आई ॥ २ ॥
दास बया कहे गुरु मैयाने ।
मुझकू सुलाया सोहि झुलने ॥ ३ ॥

अल्ला हे बेफिकीर मे कहां जावो रे ।
जाहा ता वोहि खडा येहि मेरे नैनो रे ॥ ध्रु० ॥
नजरके सदरमे खल्के हजर होरी ।
रात दिन जाहा नही सोहि खुदा पायो रे ॥ १ ॥
जी लिया जान लिया मेरा मुजाका नही ।
जब तो बेमान हुवा अरज कुछ सुनता नहि रे ॥ २ ॥
पलपलके खेल न्यारे जिसके हजारो हुवे ।
रंगातीत मेरा सांई दास बयाको मिला रे ॥ ३ ॥

या गुरुनें मज वेडचि लाविलें ।
अहो मन हें तत्पदीं तन्मय जालें ॥ ध्रु० ॥
सांवळी सुरत नयनांत बैसली ।
पाहतां पाहणें समूळचि गेलें ॥ १ ॥
पश्चिमपंथ हे अवघड वाट ।
ब्रह्मगिरीच्या शिखरीं नेलें ॥ २ ॥
सत्रावीचा पाजुनि पान्हा ।
नेऊनियां निर्जीं निजविलें ॥ ३ ॥
रामदास गुरुराजकृपेनें ।
दास बया हें मीपण गेलें ॥ ४ ॥

धांवत येउनि सद्गुरुमाय निजपान्हा देई ।
तुझिया विरहानळानें व्याकुळ जीव जाला पाहीं ॥ ध्रु० ॥
इंद्रनिळाची किळा गाळुनी शाममूर्ति घडिली ।
अष्टदिशांला प्रभा फांकुनि दश अंगुळ उरली ॥

यमुनातीरीं कुंजवनामधिं वाजवितो मुरली।
याला पाहतां चित्तवृत्ति हे सखये घाबरली॥
चाल॥ मग दृढतर निश्चय मनांत हा केला।
खरि आग लाविली या साही ईषणेला।
निर्धूत होउनी शरण गेल्यें पायांला।
चिद्‌ग्रंथीची गांठ सुटुनियां मिठि पडली पायीं॥ १॥
या समयीं कां दूर टाकिलें खरें सांग मजला।
हीन दीन मतिमंद आळशी म्हणुनि त्याग केला॥
अर्वाकानें फार बोलिलें हाचि त्रास जाला।
पदकमलाचा वियोग मजवर हा पडला घाला॥
चाल॥ आतां क्षमा करावी कर जोडुनि विनविल्यें।
निज चरणिं अखंडित ठाव द्या मागल्यें।
नीर नयनीं वाहे तुजलागीं बाहल्यें।
उदास दिसती दाही दिशा आतां धीर नाहीं॥ २॥
चराचराला व्यापुनियां तूं ऊर्वरीत असशी।
नानात्वाचा ग्रास करुनियां त्या निजपदिं रमशी।
सहज लीलेकरूनियां टक सच्छिष्या देशी।
तेथिल निज बोलायाला तें नये हो मजशी॥
चाल॥ तेथें च्यार सहा अठरा मौनावले।
गति कुंठित जाल्या तेथुनियां परतले।
त्या चिद्गगनीं मग दास बया मावळे।
बहु जन्मांची पुण्यसंपत्ति फळली या समयीं॥ ३॥

लागुन गेलं लगन हो। या गुरुला निज नयनीं पाहतां॥ ध्रु०॥
मी ममता हें वसन टाकितां। जनांत जालें जघन हो॥ १॥
चाहो शून्यांच्या वर मी नेलें। तेथेंच जालें मगन हो॥ २॥
परपुरुषाची मिठी सुटेना। आतां कशि येऊं बाई फिरून हो॥ ३॥
दास बया म्हणे गुरुराजानें। दाखविलें चिद्गगन हो॥ ४॥

## श्लोक

मुक्ताफळें विघुरलीं गुरूच्या प्रबोधीं ।
सच्छिष्य हृदयीं धरितात आधीं ॥
ते राजहंस सरोवरींचे निवासी ।
निजमुक्तचारा मिळतो तयांसी ॥
परि तेथ काग आला तरि तो विभागीच नाहीं ।
निजमुक्तचारियाची त्याजला प्राप्ति काई ॥
अशुभ सेवनानें जन्म त्याचाच गेला ।
देखुनी मुक्ताला जल्पुनीयांच गेला ॥

ह्या श्लोकांची रचना अगदींच शिथिल आहे.

## ओव्या

सद्गुरुचरणमकरंद । सेउनी मस्त जाला भ्रमर ।
त्या गुरुपुत्राला नमस्कार । वारंवार करीतसें ॥
सद्गुरुमाउली कृपाळ । पाजिली विषाची गरळ ।
मरोनियां जालों अचळ । निजानंदीं राहिलों ॥
शब्दान्वयें करूनि । प्रगट जाला वासरमणि ।
निजगुह्य सूर्यकमळणी । विकासातें पावली ॥
चंद्रकिरणींचें अमृत । पिऊनियां जाली तृप्त ।
मग तेथील आमोद देत । बोधभ्रमराकारणें ॥
आमोद सेउनी मस्त जाला । वाच्यांश सर्वही राहिला ।
अनिर्वाच्य पद पावला । जाणिवे नेणिवेरहित ॥
त्या निजसुखाची लहरी । प्रगट झाली चित्सागरीं ।
ते हे ब्रह्मसृष्टि खरी । प्रत्ययानें पाहावी ॥

वरील श्लोकांत व ह्या ओव्यांत बाह्याबाईचें नांव नांहीं. शिवाय ‘ जालों,’ राहिलों’ हीं वरील ओव्यांतलीं क्रियापदें पुल्लिंगी आहेत, स्त्रीलिंगी नाहींत.

## आर्या

तव वागमृतवृष्टी होतां हें मनमयूर आनंदे ।
चरणीं ठेउनि दृष्टी नयनींचे बिंदु टाकि स्वानंदें ॥

बिंदुरुप जग पहातां बिंदू सिंधू अखंड हा भरला ।
आहे नाहिंपणानें नाहीं आहे भरूनियां उरला ॥
भरला उरला हे बा वचनोक्ती सर्व कुंठुनी गेल्या ।
वृत्तिप्रवेश नाहीं निवृत्ती तेथ येउनी रमल्या ॥
ज्याच्या स्वरुपीं रमतां देहवृत्ति कांहीं नाहीं हो उरल्या ।
मिळल्या एकपणानें जाणिव हे ग्रासुनी तिथें उरल्या ॥
श्रीमुखचंद्र पहातां लवती या पापण्या न सोसवती ।
स्वसुखें स्वपतिशिं रमतां त्या समयीं अन्य हे नसो सवती ॥
रमतांना एकांतीं द्वैताचा टाकुनी दिला पदर ।
बोधरसानें भरुनी निजवदनीं लाविला असे अधर ॥
बोधरसातें सेउनि मस्तपणानेंच राहतो विजनीं ।
तो हा सद्गुरुराजा स्वच्छंदेंकरुनि क्रीडतो स्वजनीं ॥
ज्याच्या स्वरुपा पहातां भ्रम गेला तीन पांच हा साचा ।
तो हा सद्गुरुराया स्वसुखची घडीव आहे हो साचा ॥
सूर्यविकासित रमतो मस्तचि जाला पराग सेवोनी ।
उगमीं आसन ज्याचें स्वच्छंदेंकरुनि राहतो विजनीं ॥
चंद्राची सूर्याची गति कुंठित मग तेथेंचि राहतसे ।
व्यतिरेकाच्या मार्गे स्वानंदाला पिवोनि राहतसे ॥
व्यतिरेक पूर्ण जाला पूर्णाला पूर्ण भरति हे आली ।
अन्वयसागर भरला जरि गुरुनें आत्मदृष्टि हे दिधली ॥
गुरुरूपचि तूं असती हरि बा तुजला अखंड नमित असें ।
दास बया हे त्यजुनी श्रीचरणीं मस्तकास ठेवितसे ॥
श्रीज्येष्ठ शुद्ध नवमी नवमीच्या निजघरींच राहतसे ।
समजुनियां उमजावें अक्षर पत्रीं लिहून धाडितसें ॥
श्रीकारा आकारा मिळणी होतांच भ्रांति हे गेली ।
ॐकाररूप जाला जरि गुरुनें आत्मदृष्टि हे केली ॥
आतां बोलूं काये बोलाया मार्ग राहिला नाहीं ।
मौन्यगर्भीचें निजसुख सद्गुरुराजेंचि दाविलें देहीं ॥

देही असतां विदेही केलें मजला गुरू समर्थानें।
त्याचीया उपकारा देउनियां काय व्हावें अर्थानें ॥

यांतील बहुतेक आर्यांची रचना अगदींच सामान्य आहे.

## पदें

काय सांगू बाई तरी कपटी मोठा कान्हा ॥ ध्रु० ॥
जात होत्यें यमुनातीरीं । अडवुनियां धरितो करीं ।
घुंगटपट काढुनियां हळुच लागे काना ॥ १ ॥
ठमक ठमक करूनी चाले । अवांच्य शब्द बोले ।
नैनीं नैन एक करी भिईनाच कोणा ॥ २ ॥
गोकुळांत धूम केली । वृत्ति चोरुनियां नेली ।
दास बया धन्य म्हणे गुरुराज राणा ॥ ३ ॥

ध्याइये गुरुपग अघमोचन । सुखदायक भवाब्धितारन ॥ ध्रु० ॥
चिद्गगनमे आसन खूला । जापर सद्गुरुराज रमीला ।
सूर्य चंद्र दो दिवटि जलत है । जब देखा तब डुब गई तन ॥ १ ॥
जाकी सत्ता जगमो भरि है । जा देखो तहां ठाड रही है ।
सो सद्गुरुकिरिपासो मिलती । सब छांडके पग जा सरन ॥ २ ॥
लिखा पढा कछु संग नहि आवे । अंतकालमे सबही जावे ।
जोरू लडके महल मजालस । यहां रहती फेर आपहि जाना ॥ ३ ॥
दिलका मेहर मिलगया दिलको । तारनवाला गुरु है सबको ।
दास बया कहे कछु नहिं देखा । जब देखा तब उलटा नयन ॥ ४ ॥

या कवितांवरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल कीं बाइयाबाईची कविता रामदासी थाटाची नसून, तिची घाटणी अगदीं स्वतंत्र आहे. तिच्या इतर पद्यांपेक्षां तिचीं पदेंच फार बहारीचीं आहेत; व तिच्या मराठी पदांइतकींच तिचीं उर्दू पदेंही सुंदर आहेत. या पद्यांवरून तिचा पारमार्थिक अधिकारही प्रतीत होतो. वरील पद्यांत बाइयाबाईनें वेणाबाईचा उल्लेख कोठेंही केल्याचें दिसत नाहीं; आपले गुरु रामदासस्वामी असेंच म्हटलें आहे. बाइयाबाईची आणखी बरीच कविता असण्याचा बळकट संभव आहे, कारण, तिनें

आपल्या ८५ वर्षांच्या दीर्घ आयुष्यांत येवढी थोडी कविता लिहिली असेल हें शक्य दिसत नाहीं. कै. वि. का. राजवाडे यांनीं बाइयाबाईच्या कविते-विषयीं पुढील अभिप्राय व्यक्त केला आहे :–" बाइयाबाईच्या कवितेवरून रामदासचरित्रावर कांहीं प्रकाश पडतो. रामदास वर्णानें काळेसांवळे होते हें पांचव्या पैदावरून कळतें. रामदासांवर बयाबाईची गुरुभक्ति अपरंपार होती. इतकी कीं पतिव्रतेची पतीवरही तितकी नसेल. त्यामुळें दुष्ट लोकांना चकाट्या पिटण्यास वाव होत असावी असें वाटतें. बयाबाई गुरुभक्तीनें इतकी परिपूर्ण भरली कीं, स्त्रीपुरुषलिंगभेद ती पूर्ण विसरली व गुरुमाउलीला आई, नवरा, बाप, परमेश्वर, कान्हा, वगैरे शब्दांनीं आळवूं लागली. ह्या प्रेमालाच यूरोपांत Platonic love गतकालीं म्हणत. आत्म्याआत्म्याचें जें ऐक्यप्रेम तें Platonic love होय. तसलें प्रेम रामदास शिष्यांच्या व शिष्यिणींच्या ठायीं उत्पन्न करीत. तेव्हां हा पुरुष असामान्य सामर्थ्याचा होता हें उघड आहे. बयाबाईनें आर्या केल्या आहेत त्यावरून शिवकालीं महाराष्ट्रांत आर्या रचण्याची चाल होती हें स्पष्टच होतें. "

बयाबाईची मराठी भाषा मात्र समर्थकालीन भाषेपेक्षां बरीच अर्वाचीन दिसते. त्याचप्रमाणें उर्दू भाषेचें इतकें चांगलें ज्ञान तिला कसें झालें असेल समजत नाहीं. कदाचित् उत्तर हिंदुस्थानांत बरेच दिवस तिचें वास्तव्य झालें असावें.

बाइयाबाईचे शिष्य गिरिधर. त्यांनीं त्रिंबक, यशवंत व बलभीम या आपल्या तीन बंधूंसह बाइयाबाईचा अनुग्रह घेतला होता. गिरिधरांनीं पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. त्यांची अधिक माहिती ' श्रीसमर्थप्रताप ' या ग्रंथाच्या आरंभीं श्री. शं. श्री. देव यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेंत दिली आहे ती जिज्ञासूंनीं पहावी.

---

१ भारत-इतिहास-संशोधक मंडळ, अहवाल शके १८३३, पृष्ट ९०.

२ 'सांवळी सुरत नयनांत बैसली०'